# नवें शिक्षण

( सोविएत रशियांतील शिक्षणव्यवस्था )

लेखक

अ. रा. कामत

किंमत सहा रुपये

प्रकाशक—
रा. ज. देशमुख
देशमुख आणि कंपनी
१९१ शनवार, पुणें २.


२. मुखपृष्ठावरील चित्र दीनानाथ दलाल यांचें आहे.
३. आंतील व वरचे ब्लॉक डी. डी. नेरॉय यांनीं केले आहेत.
४. अखिल भारतीय सोव्हिएट मित्रमंडळ यांच्या कृपेनं चित्रें मिळालीं.

प्रथमावृत्ति १९४६
डिसेंबर

मुद्रक—
विठ्ठल हरि बर्वे
आर्यभूषण मुद्रणालय,
९१५।१ शिवाजीनगर, पुणें ४.

## प्रस्तावना

एक दोन महिन्याच्या अर्भकापासून तीन वर्षाच्या वयोमर्यादेंतलीं हजारों अर्भकें शिशुगृहांत दिवसभर राहून तेथें तज्ज्ञ वैद्यांच्या देखरेखीखालीं आरोग्यसंपन्न होत आहेत आणि शिक्षणशास्त्रपारंगत मानसशास्त्रज्ञांच्या सहवासांत आयुष्यभर टिकणाऱ्या संवयींचे धडे घेत आहेत. तीन ते आठ वर्षांपर्यंतचीं हजारों बालकें शिक्षिकांच्या नजरेखालीं, खेळण्याच्या आणि शिक्षणाच्या सर्व साहित्यसामग्रीनें संपन्न अशा बालकमंदिरांतून समाजोपयोगी विचार, संवयी आणि इंद्रियक्रिया यांचें शिक्षण घेत आहेत. हजारों प्राथमिक शाळांतून लक्षावधि मुलें बौद्धिक, शारीरिक, कलाविषयक, हस्तव्यवसायात्मक आणि समाजसेवाप्रधान असें प्राथमिक शिक्षण घेत आहेत. आधुनिक यंत्रसामुग्रीनें संपन्न अशा प्रयोगशाळांतून, ( कारखान्यांतून व धंदेशिक्षणाच्या शाळांतून ) लक्षावधी तरुण-तरुणी शास्त्राचा व उद्योगधंद्यांचा अभ्यास करीत आहेत. विद्यापीठांतून आणि संशोधन संस्थांमधून हजारों विद्वान् संशोधक जगाच्या कोनाकोपऱ्यांतून आणलेलें ज्ञान संपादन करीत आहेत, व नवीन नवीन ज्ञानसंशोधन करून जगाला ज्ञानसंपन्न करीत आहेत. दिवसभर कारखान्यांत काम करून बाहेर पडलेले कामगार स्त्री-पुरुष सायंकाळीं व रात्रीं काखेंत पाटीदप्तर घेऊन रात्रींच्या शाळा-महाशाळांकडे चालले आहेत. ग्रंथालयांतून

हजारों वाचक शास्त्रीय व राजकारणीय ग्रंथांचें परिशीलन करीत आहेत, प्रत्येक शहरांतील विविध प्रकारच्या स्थायी प्रदर्शनांतून, संग्रहालयांतून, तज्ज्ञांच्या मार्गदर्शकत्वाखालीं शेंकडों लोक उपयुक्त निरीक्षणें करीत आहेत. नाट्यगृहें आणि चित्रपटमंदिरें लाखों लोकांची करमणूक करून उपयुक्त ज्ञान देत आहेत आणि सुसंस्कृत अभिरुचि वाढीस लावीत आहेत. कारखाने, शेतें, जहाजें इत्यादि अनेक ठिकाणीं जिज्ञासू सभासदांच्या संघाच्या बैठकी चालू असून तेथें संस्कृति-समाज-राजकारणाची चर्चा चालली आहे.

हिंदुस्थानांत अशा प्रकारचें चित्र किती वर्षांनीं दिसेल ? जन्मलेल्या अर्भकापासून तों थेट वृद्धांपर्यंत समाजांतील प्रत्येक घरांतील स्त्री-पुरुष आस्थापूर्वक कांहीं ना कांहीं शिक्षण घेऊन ज्ञानवर्धन करीत आहेत असें चित्र आज सोव्हिएट रशियामध्यें तरी पहावयास सांपडतें. हिंदुस्थानांतील शिक्षणशास्त्रज्ञ, शिक्षणमंत्री, शिक्षणाधिकारी, स्थानिक स्वराज्यांतील शाला समितीचे सभासद, प्राध्यापक आणि अध्यापक इत्यादि विविध नात्यांनीं ज्यांचा संबंध भारतीय शाला आणि शिक्षण यांचेशीं येतो, त्यांनीं त्यांनीं रशियांतील शिक्षणपद्धतीचा अभ्यास करणें अत्यंत आवश्यक आहे. शिक्षणांत अग्रेसरत्व मिळविलेल्या जर्मनी, अमेरिका, फ्रान्स, इंग्लंड इत्यादि विविध देशांतून अद्ययावत् झालेली सर्व प्रगति, सर्व प्रयोग व सर्व तत्त्वज्ञान यांचा अभ्यास करून, या संकलित ज्ञानाला स्वतःच्या विधायक बुद्धीची जोड देऊन व राजकीय तत्त्वज्ञानाप्रमाणें मुरड घालून रशियानें आपली शिक्षणपद्धति निर्माण केली आहे. जी प्रगति इतर पुरोगत राष्ट्रांनीं शेंदीडशें वर्षांत केली ती रशियानें विशिष्ट तंत्रांचा उपयोग करून अवघ्या पंचवीस वर्षांत केली. त्यामुळें काळाशीं स्पर्धा करून किमान कालावधींत जगाच्या बरोबर येऊं इच्छिणाऱ्या भारतासारख्या देशानें रशियन शिक्षणपद्धतीचीं तंत्रें आणि तपशील यांचा बारकाव्यानें अभ्यास करून आपला शैक्षणिक प्रगतीचा स्वतंत्र मार्ग आंखला पाहिजे.

प्राध्यापक अ. रा. कामत यांनीं रशियन शिक्षणपद्धतीवर हा तपशीलवार व विस्तृत ग्रंथ लिहून शिक्षणाच्या विस्ताराचा व पुनर्घटनेचा विचार आणि कार्य करणाऱ्या लोकांची फार मोठी सेवा केली आहे. स्वातंत्र्याच्या देहलीवर पदार्पण करून नवीन युगांतील आपल्या राष्ट्राच्या शिक्षणाकडे पाहाणाऱ्या भारताला हा ग्रंथ अगदीं योग्य वेळीं उपलब्ध करून दिल्याबद्दल प्रा. कामत यांचें समाजानें अभिनंदन केलें पाहिजे व त्यांच्या ग्रंथाचें अगत्यपूर्वक स्वागत केलें पाहिजे.

रशियन राज्यक्रांतीनंतर स्थापन झालेल्या सोव्हिएट शिक्षणपद्धतीचा अद्ययावत वृत्तांत वाचकांना या ग्रंथांत सांपडेल. अगदीं अलीकडील काळांत रशियानें आपल्या उपक्रमांत काय फेरबदल केले आहेत त्यांचीही मुद्देसूद माहिती या ग्रंथांत मिळेल व शिक्षणतज्ज्ञांच्या पूर्वीच्या ज्ञानांत भर पडेल. सोव्हिएट शिक्षणतज्ज्ञांची मनोवृत्ति प्रयोगनिष्ठ आणि परिवर्तनशील आहे. पूर्ण विचारांतीं सुरू केलेले उपक्रम अनुभवांनीं चुकीचे व सदोष दिसल्यास जगाच्या टीकेची पर्वा न करतां त्यांत दुरुस्ती केलेली दिसून येते. बारा वर्षांपूर्वी नास्तिक्य बुद्धीच्या प्रसाराची योजना आंखणाऱ्या रशियानें आतां ख्रिस्ती धर्मगुरूंच्या शिक्षणाचा अभ्यासक्रम आंखला आहे (पान २१०). प्रारंभापासून सार्वत्रिक व सर्वकालिक सह–शिक्षणाचा पुरस्कार करणाऱ्या या शिक्षणतज्ज्ञांनीं आतां बारा ते अठरा वर्षीय मुलांमुलींच्या मिश्र शाळा बंद करून अलग–शिक्षणाला प्रारंभ केला आहे (पानें २५५–२५९). एकेकाळीं मोफत शिक्षण होतें तेथें आतां ऐपतदारांना शुल्कदान (फी) आवश्यक झालें आहे (पानें २४३–२४५). या प्रवृत्तीपासून हिंदी लोकांनीं दोन बोध घेण्यासारखे आहेत. रशियन शिक्षणपद्धतीचा किंवा जगांतील इतरही अग्रेसर शिक्षणपद्धतींचा सूक्ष्म अभ्यास केला तरी स्वतः विचार करून आपल्या परिस्थितीला योग्य अशी पद्धति व तंत्रें आपलीं आपणच निर्माण केलीं पाहिजेत. तीं रशिया–अमेरिका–इंग्लंड यांचेकडून दत्तक घेऊन चालणार नाहीं. दुसरें असें कीं, अनुभवानंतर एखादा उपक्रम सदोष दिसला तर प्रयोगनिष्ठ दृष्टि ठेवून त्यांत सुधारणा करण्याची आपली तयारी पाहिजे.

रशियन व हिंदी परिस्थिति यांत अनेक बाबतींत साम्य असल्यानें हा ग्रंथ वाचतांना हिंदी परिस्थितीबाबत विचार अवश्यमेव मनांत येतात. ग्रंथकारानें ठिकठिकाणीं असे तुलनात्मक विचार मांडले आहेत. चालू राजकीय प्रश्नाच्या दृष्टीनें कांहीं माहिती उपयुक्त आहे. एकशेंपन्नास भाषांचा प्रश्न रशियानें कसा हाताळला (पान १७२,१७३), विविध संस्कृतींच्या समाजांना व प्रदेशांना सांस्कृतिक संरक्षण व अभय देऊन त्यांना एका राज्यव्यवस्थेंत कसें गोवलें (पान १८२) इत्यादि माहिती वाचनीय आहे. औद्योगिक बाल्यावस्था लौकर ओलांडून अल्पावधींत प्रगति करण्याला शिक्षणाचें सहाय्य कसें घेतां आलें, तो वृत्तांत बोधप्रद आहे (पानें २४३–२४५).

इंग्लंड–अमेरिका–जर्मनी इत्यादि राष्ट्रांनीं शेंदीडशें वर्षांत जी शैक्षणिक प्रगति केली ती अवघी पंधरा ते वीस वर्षांत रशियानें केली नसती तर गेल्या महायुद्धांत जर्मनीच्या रणगाड्याखालीं त्याचा चक्काचूर झाला असता व आज मॉस्को नभोवाणीवरून हिटलरचीं भाषणें ऐकण्याचा प्रसंग न्यूयॉर्क–लंडन–दिल्ली येथील राज्यकर्त्यांवर आला असता. रशियानें जी प्रगति पंधरा वीस वर्षांत केली ती त्यापेक्षांही कमी कालावधींत, म्हणजे पांच दहा वर्षांत हिंदुस्थाननें केली नाहीं तर अपरिहार्य अशा भावी महायुद्धांत काय अवस्था होईल याची कल्पनाच करवत नाहीं !

आतां मनांत असा विचार येतो कीं आपल्या नूतन प्रतिष्ठित सरकारनें शिक्षणाबाबत सध्यांचेंच धोरण व मंद चाल ठेविली तर एवढी मजल मारायला किती तरी वर्षें लागतील ! सरकारी उत्पन्नाचीं साधनें नाहींत त्यामुळें द्रव्यबळ मर्यादित. द्रव्यबळ कमी म्हणून योजनाही मर्यादित. सध्यां फक्त प्राथमिक शिक्षणाचा प्रसार करावयाचा. माध्यमिक, औद्योगिक, महाविद्यालयीन, संशोधनात्मक, शिक्षणाकरितां पैसा नसल्यानें चालचलाऊ मदत करावयाची. अशा धोरणानें व गतीनें देश चालला तर रशियाबरोबरीनें यायला पन्नास वर्षें लागतील आणि तोंपर्यंत रशियाचीहि प्रगति कल्पनातीत होईल ! देशांतील उत्पन्नाच्या बाबींवर स्वामित्व मिळवून किंवा नियंत्रण ठेवून त्यांपासून होणारें अधिकाधिक उत्पन्न सरकारी तिजोरींत आल्याशिवाय समाधानकारक आणि अग्रगामी अशा शिक्षणपद्धतीचा पाया सरकारला घालतां येणार नाहीं. शिक्षणप्रगतीला लागणारा पैसा खर्च करण्याकरितां सरकारी उत्पन्नाचीं साधनें वाढलीं पाहिजेत आणि सरकारनेंहि प्राथमिक शिक्षण व इतर शिक्षण यांत सख्खा-सावत्र असा दुजाभाव न ठेवतां सर्व शिक्षणाची पुनर्घटना व प्रगति यांची योजना आंखली पाहिजे. समाजांतील यच्चयावत् व्यक्ति भारतीय शिक्षणाच्या संस्काराखालीं आणणें आणि समाजांतील हरएक साधनाचा उपयोग शिक्षणप्रसाराकरितां करणें असें मोठें कार्य आजच्या विद्याखात्यापुढें वाढून ठेविलें आहे. या कामाला आपण पुरे पडलों तरच जगांत जगायला समर्थ होऊं, नाहींतर कायमचे मागें पडूं.

शिक्षणाशीं संबंध असणाऱ्या प्रत्येक व्यक्तीच्या दृष्टीखालून असा ग्रंथ गेला पाहिजे. शिक्षणविषयक कायदे मंजूर करणाऱ्या कायदेमंडळाच्या सभासदांना

या ग्रंथांतील माहिती उपयुक्त वाटेल. स्कूलबोर्डें चालविणाऱ्या मेंबरांनाही हें पुस्तक सुबोध आणि उपयुक्त वाटेल. "सोव्हिएट शिक्षणाचे विशेष" हें प्रकरण सर्वांनाच मनोरंजक वाटेल. सातव्या प्रकरणांतील वृत्तांत महाविद्यालयांतील प्राध्यापक महा-प्राध्यापकांनीं वाचल्यास गैरशिस्त तरुणांमध्यें शिस्त कशी राखावी याची त्यांना कल्पना येईल. नववें प्रकरण प्राथमिक व माध्यमिक शिक्षकांना स्वतःचे व्यवसायाचे दृष्टीनें उपयुक्त वाटेल. सनातनी वाचकांना धर्मगुरूंचें शिक्षण आणि सहशिक्षणाच्या उपक्रमांतील फेरबदल वाचून समाधान वाटेल. सारांश सामान्य वाचकांपासून तों विद्याधिकाऱ्यांपर्यंत सर्वांनाच या ग्रंथांतील माहिती मनोरंजक व उपयोगी वाटेल.

ग्रंथ लिहिण्याकरितां अद्ययावत् साधनें मिळविण्याची लेखकानें पुष्कळच खटपट केली आहे. रशियन लेखकांचे इंग्रजी अनुवाद व अमेरिकन, इंग्लिश लेखकांचे ग्रंथ यांचे आधारानें माहिती घेतलेली आहे. प्रा. कामत यांना हिंदी शिक्षणाचे दृष्टीनें रशियन शिक्षणपद्धतीचा अभ्यास करण्याकरितां सरकारनें शिष्यवृत्ति देऊन पाठवावें व परत आल्यावर विद्याखात्यानें त्यांचा उपयोग करून घ्यावा. परत आल्यावर लेखकानें काढलेली या ग्रंथाची दुसरी आवृत्ति अधिकच वाचनीय होईल हें सांगणें नकोच.

शिक्षणपद्धतीची सम्यक् कल्पना येण्याकरितां त्या देशाच्या सामाजिक, आर्थिक व राजकीय परिस्थितीची वाचकाला नीट माहिती पाहिजे. त्याकरितां एखादा छोटासा ग्रंथ लेखकानें लिहिल्यास आम्ही त्याचें जिज्ञासेनें स्वागतच करूं.

१ जानेवारी १९४७ *गजानन श्रीपत खेर.*

## *लेखकाचे दोन शब्द*

सोव्हिएत रशियाच्या जीवनाच्या विविध अंगांचा अभ्यास करून त्यांचा परिचय येथील जनतेस करून देणें हें *सोव्हिएत मित्रमंडळाच्या* अनेक कार्यांपैकीं एक कार्य आहे. यास अनुसरून सुमारें दीड वर्षांपूर्वी मीं सोव्हिएत शिक्षण हा विषय अभ्यासासाठीं निवडला होता. वाचन होतां होतां यावर लहानसें पुस्तक लिहावें अशी कल्पना मनांत घोळूं लागली. पुढें बरीच नवीन माहिती जमली. मराठींत या विषयावर सविस्तर असें पुस्तक नाहीं. मिसेस किंग या अधिकारी लेखिकेनें लिहिलेलें इंग्रजींतील उत्तम पुस्तकहि आतां दहा वर्षांचें जुनें झालें. त्यापुढील काळांत सोव्हिएत जीवन अधिक समृद्ध झालें; आणि त्यानंतर घनघोर महायुद्धाच्या दिव्यांतूनहि सोव्हिएत देश पार पडला. तेव्हां या विषयावर विस्तारानें लिहिणें अप्रस्तुत होणार नाहीं असें वाटून हें पुस्तक लिहिलें आहे. अशा रीतीनें या पुस्तकाच्या कल्पनेचें श्रेय *सोव्हिएत मित्रमंडळासच* आहे.

दोनतीन गोष्टींचा उल्लेख आधींच केल्यास वाचकांच्या दृष्टीनें सोयीचें होईल असें वाटल्यावरून तसें करीत आहे. कांहीं ठिकाणीं पुनरावृत्ति झालेली आढळेल. प्रत्येक प्रकरण शक्यतों स्वयंपूर्ण असावें ही दृष्टि पुढें ठेवली होती, तेव्हां तो दोष टाळतां आला नाहीं. कांहीं बाबतींत आंकडेवारी बरीच जुनी आहे. कारण १९३९ सालानंतरच्या युद्धकालांत फारशी तपशीलवार माहिती प्रसिद्ध झालेली आढळली

नाहीं. अलीकडेच पुन्हां नवी आंकडेवारी येऊं लागली आहे. तसेंच सोव्हिएत शिक्षणाचें शिक्षणशास्त्राच्या दृष्टीनें या पुस्तकांत सूक्ष्म विवेचन केलेलें नाहीं. कारण सध्यांच्या टंचाईच्या काळांत पुस्तकाचा विस्तार वाढविणें योग्य वाटलें नाहीं.

पुण्याचे सुप्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ *डॉ. ग. श्री.* खैर यांनीं पूर्वीची ओळख नसूनहि, केवळ शिक्षणाविषयींच्या आस्थेमुळें, माझ्या विनंतीस मान देऊन पुस्तक नजरेखालीं घातलें आणि प्रस्तावना लिहिली. याबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों.

पुस्तक तयार होत असतांना अनेक मित्रांनीं वेळोवेळीं साहाय्य केलें. अखिल भारतीय सोविएत मित्रसंघाचे चिटणीस श्री. जांभेकर यांनीं सुंदर चित्रें देऊन लेखकास उपकृत केलें आहे. श्री. देशमुख यांनीं पुस्तकाच्या सौष्ठवांत आपुलकीनें लक्ष घातलें. तसेंच आर्यभूषण प्रेसचे कामगार श्री. बडधे यांनींहि छपाईच्या कामीं उपयुक्त सूचना केल्या आणि बरीच मेहनत घेतली. या सर्वांचा मी आभारी आहें.

फर्ग्युसन कॉलेज, पुणें. *अ. रा. कामत.*

# अनुक्रमणिका

# सोविएत शिक्षणाचें स्थूल समालोचन १

अवघ्या पंचवीस वर्षांच्या अवधींत सोविएत देशामध्यें शिक्षणक्षेत्रांत विलक्षण प्रगति झाली आहे. सोविएत शिक्षणाचा हा विकास आणि त्याचें आजचें स्वरूप यांची यथार्थ कल्पना येण्यासाठीं झारशाहीच्या काळांतील शिक्षणाची माहिती असणें आवश्यक आहे.

## १ झारशाहींतील शिक्षण

झारशाहीच्या अनियंत्रित राजसत्तेच्या अमदानींत रशियांतील शिक्षण अत्यंत मागासलेलें होतें. इंग्लंड, जर्मनी, अमेरिका इत्यादि पाश्चात्य देशांत बहुतेक सर्व लोक साक्षर होते; या सर्व राष्ट्रांत प्राथमिक शिक्षण सक्तीचें करण्यांत आलेलें होतें. पण रशियांत मात्र १९१४ सालीं साक्षरतेचें प्रमाण शेंकडा २८ इतकें कमी होतें. रशियन साम्राज्यांत असलेल्या इतर अंकित राष्ट्रांतील साक्षरतेचें प्रमाण यापेक्षां किती तरी कमी होतें. उदाहरणार्थ, ताजिकिस्तान राष्ट्रांत साक्षरतेचें मान शेंकडा ०·५, उज्बेकिस्तान शेंकडा १, कझाकिस्तान शेंकडा २. रशियांतील शिक्षणाचा त्याकाळचा मागासलेपणा पुढील आंकडयांवरून स्पष्ट होईल.

शाळेंतील विद्यार्थ्यांचें एकंदर लोकसंख्येशीं शेंकडा प्रमाण

| साल | देश | शेंकडा प्रमाण |
|---|---|---|
| १९०४ | अमेरिका | २३ |
| ,, | जर्मनी | १९ |
| ,, | इंग्लंड | १६ |
| ,, | फ्रान्स | १५ |
| १९१४ | रशिया | ४·७ |
| १९४१ | ब्रिटिश हिंदुस्तान | ४·८ |

रशियांतील प्राथमिक शिक्षणावर त्याकाळीं धर्मगुरु व धर्मसंस्था—पाद्री व चर्च—यांचा विलक्षण पगडा होता. १८६० सालापर्यंत सर्व प्राथमिक शाळा चर्चकडून चालविल्या जात असत. त्या सालीं प्रथमच म्युनिसिपालिट्या व इतर स्थानिकस्वराज्यसंस्थांनीं आपल्या नियंत्रणाखालीं प्राथमिक शाळा उघडण्यास सुरवात केली. पण अशा रीतीनें चर्चच्या शिक्षणावरील वर्चस्वाला धक्का लागणें एकतंत्री राजसत्तेच्या हिताचें झालें नसतें. म्हणून चर्चच्या अप्रत्यक्ष नियंत्रणाखालीं सरकारनें स्वतांच प्राथमिक शाळा उघडल्या. प्राथमिक शाळांचा अभ्यासक्रम ठरविणें, सर्व शाळांसाठीं तपासनीस नेमणें इत्यादि बाबतींत सरकारनें धर्मसंस्थांचें शिक्षणावरील दडपण फारसें कमी होऊं दिलें नाहीं. धार्मिक शिक्षणाला अभ्यासक्रमांत किती अवास्तव महत्त्व देण्यांत येत असे याची कल्पना प्राथमिक शाळांच्या त्याकाळच्या वेळापत्रकावरून सहज येऊं शकते. आठवड्यांतील २७ तासांची पुढील प्रमाणें विभागणी करण्यांत येत असे.

| | | | |
|---|---|---|---|
| *रशियन भाषा* | *८ तास,* | *अंकगणित* | *५ तास* |
| *लेखन* | *२ तास,* | *धार्मिक शिक्षण* | *१२ तास* |
| | | *एकूण* | *२७ तास* |

रशियन साम्राज्यांत रशियन भाषा न बोलणारीं अनेक राष्ट्रें, प्रदेश, लोकसमूह व जमाती होत्या; आणि त्यांच्या स्वतांच्या सुमारें १५० निरनिराळ्या भाषा अस्तित्वांत होत्या. परंतु या सर्व प्रजेवर रशियन ही राज्यकर्त्यांची भाषा लादण्यांत आली होती. सर्व ठिकाणीं सर्व शिक्षण रशियन भाषेंतून देण्यांत येत असे. ही

परिस्थिति केवळ मध्य आशियांतील ताजिकिस्तानसारख्या मागासलेल्या राष्ट्रांत होती असें नव्हे. यूक्रेनियन भाषेंत विपुल वाङ्मय उपलब्ध होतें; पण यूक्रेन देशांतही हीच जुलमी पद्धति चालू होती. १९०५ सालानंतर उदारमतवादी कार्यकर्त्यांच्या खटपटींना यश येऊन मागासलेल्या अंकित राष्ट्रांत कांहीं शाळा सुरू झाल्या. उद्देश असा कीं, या मागासलेल्या जनतेला, अल्प प्रमाणांत कां होईना, पण शिक्षणाचा फायदा मिळावा. परंतु शिक्षणाचें माध्यम रशियन भाषाच होती! मातृभाषेंतून शिक्षण घेण्याचा हक्क व तरतूद कोणत्याही अंकित राष्ट्रांत नव्हती.

प्राथमिक शिक्षणाची अनवस्था ही अशी होती, मग दुय्यम व उच्च शिक्षणाची सोय अतिशय तुटपुंजी होती हें सांगणें नकोच. दुय्यम व उच्च शिक्षणाचा फायदा धनिक व मध्यम वर्गाशिवाय इतर वर्गांतील मुलांना मिळूं नये असा कटाक्ष बाळगण्यांत येत असे. रिकामटेकड्या सुखवस्तु वर्गाला "सुसंस्कृत" करणें आणि या वर्गासाठीं आवश्यक असलेला सरकारी नोकर, डॉक्टर, वकील वगैरे पांढरपेशा मध्यमवर्ग तयार करणें हेंच उच्च शिक्षणसंस्थांचें ध्येय बनलें होतें. शाळा कॉलेजांत शिस्तीचे नियम अत्यंत जुलमी व चीड आणणारे असत. सभास्वातंत्र्य, भाषणस्वातंत्र्य व संघस्वातंत्र्य यांची विद्यार्थ्यांना सक्त मनाई होती. इतकेंच काय पण भौतिक शास्त्रांचा पद्धतशीर अभ्यास झाला तर शास्त्रीय दृष्टिकोन विद्यार्थ्यांच्या मनावर बिंबविला जाईल या भीतीनें विद्यार्थ्यांना शास्त्राभ्यासापासून परावृत्त करण्यांत येत असे. अशा परिस्थितींत कांहीं अपवादवजा सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ व साहित्यिक सोडल्यास बहुसंख्य सुशिक्षित वर्गाचा शैक्षणिक दर्जा कमी प्रतीचा होता यांत नवल नाहीं.

पण याच वेळीं या उच्चशिक्षणसंस्थांत शिक्षण घेणाऱ्या कांहीं विद्यार्थ्यांनीं लहान लहान क्रांतिकारक गट बनविले होते; आणि जुलमी झारशाहीच्या अनियंत्रित सत्तेला उलथून पाडण्यासाठीं ते आटोकाट प्रयत्न करीत होते. कित्येक शिक्षणसंस्था या गुप्त क्रांतिकारकांचीं केंद्रें बनलीं होतीं. कित्येक विद्यार्थी व प्राध्यापक यांना राजद्रोहाच्या आरोपावरून कडक शिक्षा ठोठावण्यांत आल्या व अनेकांना सायबेरियांत हद्दपार करण्यांत आलें. लेनिन व झारच्या खुनाचा प्रयत्न केल्याबद्दल फांशीं गेलेला लेनिनचा थोरला भाऊ हे विश्वविद्यालयीन शिक्षण घेत असतांनाच क्रांतिकारक चळवळींत सामील झाले होते.

झारशाहीला शिक्षणाचें किती वावडें होतें याची कल्पना त्यावेळच्या शिक्षण-मंत्र्यांच्या पुढील उद्गारांवरून येते. "आम जनतेला शिक्षण देण्याचा परिणाम केव्हांही अनिष्टच होईल." "शेतकरीवर्गाला शिक्षण देणें धोक्याचें आहे; कारण शिक्षणामुळें स्वतांच्या जीवनाविषयीं शेतकऱ्यांमध्यें असंतोष निर्माण होईल." "गाडीवाले, धोबी, आचारी, पाणके यांच्या मुलांना शिक्षण देण्याची आवश्यकता नाहीं." "पालकांच्या श्रीमंतीच्या मानानें मुलांना शिक्षण दिलें जावें." "शिक्षण सार्वत्रिक झालें तर गरीब व मध्यम वर्गांतील मुलांचा लोंढा शाळेंत येईल व त्यामुळें धनिक वर्गांतील मुलांचें नुकसान होईल. असें होऊं नये याबद्दल दक्षता बाळगण्यांत यावी."

यावरून ही गोष्ट स्पष्टपणें दिसते कीं, शिक्षणाचा सर्वत्र प्रसार झाला तर आपल्या निरपवाद सत्तेला मोठाच धोका निर्माण होईल अशी भीति एकतंत्री राज-सत्तेला वाटत होती. अर्थात् सार्वत्रिक शिक्षणासाठीं सुरू असलेला लढा हा एकतंत्री सत्तेविरुद्ध लोकशाही स्वातंत्र्याकरितां चालू असलेल्या व्यापक लढ्याचा एक महत्त्वाचा भाग होता; आणि या महान् लढ्यांतील यशापयशावर शिक्षणक्षेत्रांतील प्रगतीचें भवितव्य अवलंबून होतें.

## २ क्रांतीनंतर

अखेर १९१७ सालीं रशियन जनतेनें उठाव करून झारशाही उलथून पाडली व कम्यूनिस्ट पक्षाच्या नेतृत्वाखालीं नवीन सोविएत सरकार स्थापन केलें. क्रांतीनंतर पहिलीं कांहीं वर्षें या नवीन सरकारला आपली सर्व शक्ति अंतर्गत यादवी आणि परकीय आक्रमण यांचा बीमोड करण्याकडे लावावी लागली. आधींच खिळखिळी झालेली झारशाहींतील आर्थिक व्यवस्था दीर्घकाल चाललेल्या महायुद्धामुळें साफ कोलमडून पडली होती. अर्थात् नवीन सरकारपुढील दुसरा महत्त्वाचा प्रश्न या विस्तीर्ण देशाची आर्थिक घडी बसविणें हा होता. अशा प्रतिकूल परिस्थितींतही सोविएत सरकारनें शिक्षणाकडे दुर्लक्ष केलें नाहीं.

नोव्हेंबर क्रांतीनंतर अवघ्या चार दिवसांनीं लेनिन व लूनाचार्स्की ( पहिले सोविएत शिक्षणमंत्री ) यांनीं नव्या शिक्षणविषयक कार्यक्रमाविषयीं पहिली घोषणा केली. या कार्यक्रमाचे चार मुख्य विशेष होते.

१. शिक्षण सार्वत्रिक व मोफत करण्यांत आलें.

२. धर्मसंस्थांचें शिक्षणक्षेत्रांतून उच्चाटन करण्यांत येऊन सर्व शिक्षणसंस्थांची जबाबदारी व नियंत्रण सरकारनें आपल्या हातीं घेतलें.

३. स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीनें शिक्षण घेण्याचा हक्क मिळाला.

४. सर्व राष्ट्रांतील व सर्व जमातीच्या नागरिकांना रशियनांच्या बरोबरीनें आपल्या मातृभाषेंतून शिक्षण घेण्याचा हक्क मिळाला.

एवढ्या व्यापक योजनेची एकदम अंमलबजावणी करणें सोविएत सरकारला पहिलीं कांहीं वर्षें अशक्यच होतें. एकतर या वर्षांतील कांहीं काळ अत्यंत धामधुमीचा होता. तसेंच देशाच्या आर्थिक अनवस्थेंत दुष्काळामुळें अधिकच भर पडली होती. हा प्रचंड कार्यक्रम तडीस नेण्यासाठीं मोठ्या प्रमाणावर शाळा उघडणें आवश्यक होतें. पण देशाच्या त्यावेळच्या परिस्थितींत इमारती, पुस्तकें, उपकरणें यांची मोठीच वाण होती. शिक्षक, प्राध्यापक व बुद्धिजीवि वर्ग एकंदरींत क्रांतीविषयीं उदासीन होता; कांहीं उघड उघड क्रांतिविरोधी होते. त्यांच्या हातून या शिक्षणयोजनेची अंमलबजावणी होणें कठीण होतें. तरीसुद्धां क्रांतीचा पाठपुरावा करणारे कांहीं शिक्षक, उत्साही तरुण वर्ग व शाळकरी मुलें यांनीं या कामीं नेटानें पुढाकार घेऊन कित्येक नवीन गोष्टींना ताबडतोब हात घातला. राष्ट्रव्यापी साक्षरतेच्या मोहिमेला स्वयंस्फूर्तीनें सुरवात झाली. शारीरिक शिक्षणाकडे योग्य लक्ष पुरविलें जावें या हेतूनें एक मध्यवर्ती संस्था स्थापन करण्यांत आली. स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीनें शिक्षण घेतां यावें यासाठीं सर्व शिक्षणसंस्थांत सहशिक्षण चालू झालें. पूर्वी रशियन साम्राज्याच्या टांचेखालीं दडपण्यांत आलेलीं व आतां स्वतंत्र झालेलीं राष्ट्रें, लोकसमूह व जमाती यांतील जनतेला मातृभाषेंतून सर्व शिक्षण देण्यासाठीं नवीन शाळा व कॉलेजें उघडण्यांत आलीं. मधल्या अशांततेच्या कालांत कित्येक कुटुंबें व घरें उध्वस्त झालीं होतीं. ना आईबाप ना घर अशा स्थितींत लक्षावधी निराश्रित मुलें देशोधडीस लागलीं होतीं. तीं टोळ्याटोळ्यांनीं हिंडत व चोऱ्यामाऱ्या करून कशीतरी आपली गुजराण करीत. त्यांना योग्य मार्गावर आणून व शिक्षण देऊन उद्योगधंद्यास लावणें अतिशय आवश्यक होतें. याकरितां जागोजाग वसतिगृहें ( कम्यून ) उघडून या मुलांच्या शिक्षणाची सोय करण्यांत आली.

प्रथम प्रथम शिक्षकवर्ग बराच उदासीन होता. त्यामुळें शाळा व कॉलेजें यांचा बहुतेक कारभार व व्यवस्था उत्साही तरुण पिढीनें—विद्यार्थ्यांनीं आपल्या हातीं घेतली. शिक्षणशास्त्राच्या दृष्टीनें पाहिल्यास या कालखंडाला 'प्रयोगाचा काल' असें म्हणतां येईल. सर्व नव्या, जुन्या, देशी, परदेशी शिक्षणपद्धतींचे प्रयोग चालू होते. डाल्टन प्लॅन, प्रोजेक्ट पद्धति, सामुदायिक प्रोजेक्ट पद्धति वगैरे निरनिराळ्या पद्धतींनुसार निरनिराळ्या शाळांत शिकविलें जात असे. राष्ट्रव्यापी एकसूत्री शिक्षणयोजना अंमलात आली नव्हती. शाळेंतील या स्वराज्यामुळें जरी चालकांची वाण तात्पुरती भरून निघाली असली तरी त्यामुळें पद्धतशीर शिक्षण मिळणें कठीण झालें होतें. सर्वत्र शिस्तीचा अभाव जाणवत होता. अशा परिस्थितींत शिक्षणाची व्यापकता वाढली तरी त्याचा दर्जा फारसा वाढला नाहीं.

१९२८ सालीं सुरू झालेल्या पहिल्या पंचवार्षिक योजनेमुळें वरील परिस्थितींत झपाट्यानें फरक पडूं लागला. औद्योगिक क्षेत्रांत सोविएत देशाची एकदम प्रचंड प्रगति व्हावी हा योजनेचा मुख्य उद्देश होता. त्याचबरोबर शेतीसुद्धां यांत्रिक साधनांनीं व सामुदायिक पद्धतीनें होऊन देशांतील संपत्तीचें उत्पादन मोठ्या प्रमाणावर वाढणार होतें. या योजनेच्या यशस्वितेकरितां यंत्रकुशल कारागीर व शेतकरी यांची अतिशय आवश्यकता होती. म्हणून पहिल्यानें एकंदर जनतेला साक्षर करण्याकरितां प्रचंड मोहीम उभारावी लागली. त्याचबरोबर कारखाने, रेलवे वर्कशॉप, सामुदायिक शेतें यांना जोडून औद्योगिक व शेतकीविषयक शाळा उघडण्यांत आल्या. हे सर्व उपाय अर्थातच प्रौढ जनतेला साक्षर व यंत्रकुशल बनविण्यासाठीं होते. स्त्रियाही पुरुषांच्या बरोबरीनें कारखान्यांत, शेतावर आणि बौद्धिक व्यवसायांत भाग घेऊं लागल्या. त्यामुळें त्यांच्या लहान मुलांची सोय करणें भाग पडलें. या मुलांची नीट व्यवस्था व्हावी याकरितां शिशुगृहें ( *Crèche* ) आणि बालोद्यानसंस्था ( किंडरगार्टन ) उघडण्यांत आल्या.

या पंचवार्षिक योजनेचा एक भाग शिक्षणविषयक होता. १९२५ पासून सोविएत यूनियनमधील राष्ट्रांराष्ट्रांतून सक्तीच्या सार्वत्रिक शिक्षणाची तरतूद करण्याचे प्रयत्न होत होते. १९२९ सालापासून सर्व मुलांना प्राथमिक चार वर्षांचें शिक्षण सक्तीचें करण्यांत आलें. आणि ही योजना चार वर्षांच्या आंत देशाच्या सर्व भागांत पूर्णपणें अंमलांत आली. दुय्यम शिक्षण, उच्च शिक्षण, उच्च प्रतीचें व्यावसायिक शिक्षण व

शास्त्रीय संशोधन या सर्व शिक्षणक्षेत्रांत प्रगति होणें हें पंचवार्षिक योजनेच्या संपूर्ण यशासाठीं आवश्यक होतें. अर्थातच या क्षेत्रांतही शिक्षणसंस्था व विद्यार्थी यांच्या संख्येंत वाढ होऊं लागली.

शिक्षण संस्थांच्या अंतर्गत कारभारांत आतां महत्त्वाचे फेरफार होणें अपरिहार्य होतें. जुन्या शिक्षकांची उदासीनता नाहींशी होऊन ते शैक्षणिक प्रगतीविषयीं उत्साही बनत होते. आणि नव्या परंपरेंत वाढलेला नवा शिक्षकवर्ग मोठया प्रमाणांत तयार झाला होता. त्यांना एकसूत्री शिक्षणपद्धतीची व अभ्यासक्रमाची पदोपदीं आवश्यकता भासत होती. जुन्या शिक्षणपद्धती त्यांना अपुऱ्या वाटत होत्या. विद्यार्थ्यांच्या बौद्धिक प्रगतीसाठीं शिस्तीचें मान वाढलें पाहिजे असें त्यांना वाटत होतें. म्हणून शिक्षकवर्गानें आपण होऊन एकसूत्री शिक्षणपद्धतीची मागणी केली व तशा प्रकारची शिक्षणपद्धति लवकरच सर्व शिक्षणसंस्थांत अमलांत आली. विद्यार्थ्यांचें शाळेंतील स्वराज्य केवळ विद्यार्थीविषयक गोष्टीपुरतें मर्यादित करण्यांत येऊन, शिक्षणक्रम, शिक्षणपद्धति व शिस्त यासंबंधींची सर्व जबाबदारी शाळेचे मुख्याधिकारी व शिक्षकवर्ग यांजकडे सोंपविण्यांत आली.

शिक्षणशास्त्राच्या दृष्टीनेंही कांहीं महत्त्वाचे फरक झाले. प्रोजेक्ट पद्धतीनें मुलांना अतिशय तुटपुंजें शिक्षण मिळतें व डाल्टन प्लॅन पद्धति मुलांच्या मोठया वर्गाला शिकविण्याला गैरसोयीची आहे असा अनुभव आल्यामुळें या दोन्ही पद्धतींना फांटा देण्यांत आला. पाठय पुस्तकांच्या सहाय्यानें धडे घेणें हीच पद्धति रूढ करण्यांत आली. नेमलेल्या अभ्यासक्रमाशिवाय मुलांच्या सांस्कृतिक शिक्षणाचीहि तरतूद करण्यांत आली. या नवीन शिक्षणयोजनेच्या अंमलबजावणीकरितां शिक्षणशास्त्रांत प्रवीण असलेल्या शिक्षकांची बहुसंख्येनें जरूर होती. यासाठीं शिक्षक तयार करणाऱ्या अध्यापन शाळा व अध्यापन विद्यालयें ( ट्रेनिंग शाळा व कॉलेजें ) उघडण्यांत आलीं.

पहिली व दुसरी पंचवार्षिक योजना पुरी झाल्यावर एका नवीन औद्योगिक युगांत सोविएत देश प्रवेश करणार होता. त्या युगांतील नवीन जीवनक्रमाला योग्य असा नवा दृष्टिकोन देणाऱ्या शिक्षणाची आवश्यकता उत्पन्न होणें स्वाभाविक होतें. म्हणून १९२९ सालापासून तुरळक सुरू झालेला पॉलिटेक्निकल शिक्षण हा विषय सर्व शाळांत आवश्यक करण्यांत आला. संपत्ति उत्पादनाचे निरनिराळे प्रकार व त्यांना आधारभूत असलेलीं शास्त्रीय तत्त्वें, देशांतील निरनिराळे उद्योगधंदे व अर्थव्यवस्था

यांची माहिती देणें व त्यांच्या जोडीला निरनिराळीं साधीं हत्यारें वापरतां येऊन शारीरिक श्रमाचें महत्त्व समजणें असें या पॉलिटेक्निकल शिक्षणाचें थोडक्यांत स्वरूप होतें. शाळेंतून बाहेर पडणारा प्रत्येक विद्यार्थी सुशिक्षित, कार्यतत्पर व जाणता नागरिक व्हावा, आणि बौद्धिक व शारीरिक श्रम यांमधील उच्चनीचत्वाची खोटी कल्पना त्याच्या मनांतून समूळ नष्ट व्हावी या उद्देशानें हा शिक्षणप्रकार सुरू करण्यांत आला. ( याविषयीं परिशिष्ट १ पाहा )

१९३२ नंतरच्या दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंत सक्तीचें मोफत शिक्षण सात वर्षांचें करावें असें ठरविण्यांत आलें. प्रथम ही योजना शहरांत सुरू होऊन नंतर ती खेडोपाडीं पसरली. या अवधींत साक्षरतेची मोहीम, कांहीं थोडे अत्यंत मागासलेले प्रदेश सोडून, बाकीच्या सर्व देशांत बऱ्याच अंशीं यशस्वी झाली होती. १९३७ सालापासून सुरू होणाऱ्या तिसऱ्या पंचवार्षिक योजनेनें, सार्वत्रिक शिक्षणाचा काल दहा वर्षांचा करावा आणि अशा रीतीनें प्रत्येक सोविएत नागरिकाला वयाच्या आठव्या वर्षापासून अठराव्या वर्षापर्यंत दहा वर्षे सर्वसाधारण शिक्षण मिळावें असा संकल्प करण्यांत आला होता. परंतु लवकरच युद्धाचे वारे वाहूं लागले आणि त्यामुळें ही योजना स्थगित झाली. मध्यंतरीं १९३७ सालीं एक अनपेक्षित फरक करण्यांत आला. पॉलिटेक्निकल शिक्षण या १९३२ मध्यें सुरू केलेल्या विषयांतील हस्त-व्यवसायासंबंधींचा भाग वगळण्यांत आला. परंतु ज्या विद्यार्थ्यांना हस्तव्यवसाय व यांत्रिक व्यवसायांची आवड आहे अशा विद्यार्थ्यांकरितां अभ्यासक्रमाबाहेर तरतूद करण्यांत आली. दुय्यम शाळांत याच वेळीं एक परदेशीय भाषा — इंग्रजी, फ्रेंच अथवा जर्मन — आवश्यक विषय म्हणून ठेवण्यांत आली.

या सर्व काळांत शास्त्रीय शिक्षण, उच्च शिक्षण आणि व्यावसायिक शिक्षण या सर्व शिक्षणक्षेत्रांत अशाच तऱ्हेनें प्रगति झाली आहे.

युद्धकालांत सोविएत शिक्षणामध्यें तीन महत्त्वाचे फेरफार झाले आहेत.

१. १९४० सालीं महायुद्ध सोविएत देशाच्या दारीं येऊन ठेपण्याचा धोका दिवसेंदिवस वाढत होता. या संकटाला तोंड देण्यासाठीं युद्धकालीन यांत्रिक व्यवसायांमध्यें यंत्रकुशल कामगारांची फार मोठया प्रमाणांत आवश्यकता भासत होती. म्हणून यावर्षी युद्धकालीन धंदेशिक्षणाची एक नवीन योजना आंखण्यांत आली. ( प्रकरण ६ पाहा. )

२. सोविएत सत्तेच्या सुरवातीपासून सर्व शिक्षणक्रम मोफत होते; शिवाय बऱ्याच विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ति व अन्य मदत देण्यांत येत असे. १९४० सालीं कांहीं शिक्षणक्रमाकरतां फी घेण्याचें ठरविण्यांत आलें. ( परिशिष्ट २ पाहा )

३. सहशिक्षणाची पद्धति हळूहळू बंद करण्यांत येत आहे. मुलें व मुली यांना बारा वर्षांपासून अठरा वर्षांपर्यंतचें दुय्यम शिक्षण वेगळ्या शाळांत मिळावें असें ठरविण्यांत आलें आहे. ही योजना १९४४ सालापासून कांहीं शहरांत सुरू करण्यांत आली. ( परिशिष्ट ३ पाहा )

सोविएत शिक्षणाची प्रगति किती झपाट्यानें होत गेली आणि देशाच्या सर्वांगीण प्रगतीबरोबर या प्रगतीला अनुरूप असा शिक्षणाचा विकास कसकसा होत गेला याची स्थूल कल्पना या धांवत्या समालोचनावरून करतां येते.

# विविध शिक्षणयोजना व कारभार २

गेल्या पंचवीस वर्षांत सोविएत शिक्षणाची प्रगति कोणत्या दिशेनें झाली, हें आपण गेल्या प्रकरणांत पाहिलें. सध्यां सोविएत देशांतील शिक्षणव्यवस्था कोणत्या प्रकारची आहे ?

## १ *विविध शिक्षणसंस्था*

सोविएत समाजांत जन्मापासून बालकाच्या शिक्षणाची सोय होऊं शकते.

१. मुलें वयाच्या ३ ते ३½ वर्षापर्यंत *शिशुगृहांमध्यें* ( *Crèche* ) ठेवण्याची व्यवस्था केलेली आहे.

२. तीन वर्षांपासून आठ वर्षांपर्यंतचीं मुलें *बालसंस्थांमध्यें*–किंडरगार्टन, नर्सरी शाळा वगैरे–पाठवितां येतात. बालसंस्थांमध्यें मुलें पाठविलींच पाहिजेत अशी सक्ती नाहीं. सोविएत समाजांत स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीनें व्यवसाय करण्याचा हक्क आहे. हा हक्क निर्वेधपणें बजावतां यावा या हेतूनें ही सोय करण्यांत आली आहे.

मुलें आठ वर्षांचीं झालीं कीं सक्तीच्या शिक्षणाला सुरवात होते. *

३. प्रथम चार वर्षांचें *प्राथमिक शिक्षण* दिलें जातें. अर्थात् प्राथमिक शाळांतील मुलें ८ ते १२ वर्षांचीं असतात.

४. यानंतर १२ पासून १५ वर्षांपर्यंत तीन वर्षें *कनिष्ठ दुय्यम शिक्षण* देण्यांत येतें. हा सात वर्षांचा शिक्षणक्रम सक्तीचा असून तो "सप्तवार्षिक" शाळांत शिकविण्यांत येतो. सप्तवार्षिक अभ्यासक्रमाचें स्वरूप सर्वसाधारण ( *General* ) असून त्याचा उद्देश व्यवसाय अगर धंदा शिकविण्याचा नसतो. आपल्या दृष्टीनें तुलना करावयाचीच झाली तर मराठी चार व इंग्रजी तीन किंवा मिडल् स्कूलपर्यंतचा अभ्यासक्रम सक्तीचा असतो आणि तो पुरा झाल्यावरच कोणत्याही व्यवसायाचें शिक्षण घेतां येतें.

सात वर्षांचा अभ्यासक्रम संपविल्यावर विद्यार्थ्यांपुढें तीन मार्ग संभवतात.

५. ज्यांना ताबडतोब उद्योगधंद्यांत पडावयाचें असेल असे विद्यार्थी *औद्योगिक अथवा शेतकी शाळांमध्यें* प्रवेश करतात. येथें २ ते ३ वर्षांच्या शिक्षणानंतर कारखाने, सामुदायिक शेतें अथवा रेलवे यांमध्यें ते काम करूं लागतात.

६. दुसरे कांहीं विद्यार्थी औद्योगिक, शेतकी, वैद्यक, कला, अध्यापन वगैरे व्यवसायांकरितां मध्यम प्रतीचें शिक्षण देणाऱ्या संस्थांमध्यें जातात. या शाळांना *टेक्निकुम* असें नांव आहे. येथील अभ्यासक्रम तीन ते पांच वर्षांचा असतो.

७. आणि यापुढील दुय्यम शिक्षण घेण्याइतकी ज्यांची शैक्षणिक तयारी असेल त्यांना *वरिष्ठ दुय्यम शाळेंत* प्रवेश मिळतो. येथील अभ्यासक्रम तीन वर्षांचा असून तो सर्वसाधारण असतो, म्हणजे त्यामध्यें व्यवसायांचें शिक्षण असत नाहीं; या विद्यार्थ्यांना अशा रीतीनें ८–१८ वर्षांपर्यंत दहा वर्षें सर्वसाधारण बौद्धिक शिक्षण मिळतें. आपल्याकडील मॅट्रिक परीक्षेशीं

* १९४४ सालापासून ही वयोमर्यादा सात वर्षांची करण्यांत आली आहे.

याची तुलना करतां येईल. हें दहा वर्षांचें शिक्षण सर्व मुलांना मिळावें– सक्तीचें व्हावें– अशा प्रकारची योजना तिसऱ्या पंचवार्षिक योजनेंत ( सन १९३७ ते १९४२ ) आंखण्यांत आली होती. परंतु पुढें युद्धामुळें ती स्थगित करावी लागली.

दशवार्षिक शिक्षण घेऊन बाहेर पडणारे हे विद्यार्थी उच्च शिक्षणासाठीं पुढें जातात. या शिक्षणाची आपल्याकडील विश्वविद्यालयीन अथवा कॉलेजांतील शिक्षणाशीं तुलना करतां येईल. उच्चशिक्षणाचे दोन प्रकार आहेत.

८. इतिहास, वाङ्मय, शास्त्र, विज्ञान यांच्या अभ्यासासाठीं असलेल्या *विश्वविद्यालयांत* पांच वर्षांचा अभ्यासक्रम असतो.

९. अथवा यंत्रशास्त्र, एंजिनियरिंग, शेतकी, अध्यापन, कला, वैद्यक यांपैकीं एखाद्या विषयांतील उच्च प्रतीचे तज्ज्ञ होण्यासाठीं निरनिराळीं *कॉलेजें* असतात. तेथील अभ्यासक्रम ४ ते ४ ½ वर्षांचा असतो. या दोन्ही प्रकारच्या अभ्यासक्रमांत कांहीं भाग सर्वसाधारण विषयांसंबंधीं असून तो आवश्यक असतो व बाकीचा अभ्यास निवडलेल्या विषयासंबंधीं असतो. हे अभ्यासक्रम संपविल्यावर कांहीं लायक विद्यार्थी संशोधनाकडे वळतात; परंतु बहुसंख्य विद्यार्थी आपापल्या व्यवसायांत पडतात.

जे विद्यार्थी सप्तवार्षिक शिक्षणानंतर दुय्यम प्रतीचे तज्ज्ञ म्हणून व्यवसायांत पडलेले असतात त्यांना तीन वर्षें कामाचा अनुभव मिळाल्यावर लायकीप्रमाणें पुन्हा ( ८ ) अगर ( ९ ) या उच्च शिक्षणसंस्थांत प्रवेश मिळतो. अशा रीतीनें त्यांना आपली प्रगति करून घेण्यासाठीं वाव असतो.

१०. तसेंच जीं तरुण मुलें दुय्यम प्रतीचें शिक्षण न घेतांच व्यवसायांत– औद्योगिक, रेलवे, अथवा शेतकी–पडलेलीं असतात त्यांना स्वतांच्या प्रगतीसाठीं *कामगार विद्यालयांत* जातां येतें; आणि तेथील शिक्षणाचा फायदा घेऊन थेट विश्वविद्यालयें अथवा कॉलेजें या उच्च शिक्षणाच्या संस्थांत त्यांना प्रवेश मिळवितां येतो. प्रौढ स्त्रीपुरुषांना उच्च शिक्षण साध्य करून देणाऱ्या या योजनेचा फायदा वयाच्या ३५ व्या वर्षापर्यंत घेतां येतो.

११. आंधळे, बहिरे, मुके इत्यादि *शारीरिक व्यंग असलेल्या* मुलांच्या शिक्षणाकरितां, तसेंच *मतिमंद* ( *Handicapped* ) मुलांच्या शिक्षणासाठीं वेगळ्या संस्था आहेत. बालगुन्हेगारांना सुधारून त्यांना समाजाचे उपयुक्त नागरीक बनविण्याच्या हेतूनें शिक्षण देण्यासाठीं निराळ्या शिक्षणसंस्था आहेत.

१२. विशेष *बुद्धिमान् मुलांची खास सोय* करण्यांत येते. संगीत, गायन, वादन, चित्रकला इत्यादि कलांमध्यें जात्याच असामान्य गति असणाऱ्या मुलांनीं त्या त्या कलांमध्यें पारंगत व्हावें याकरितां ही खास व्यवस्था करण्यांत आली आहे.

विद्यार्थ्यांचा मानसिक व बौद्धिक विकास व्हावा आणि भावी आयुष्यांत फुरसतीचा वेळ त्यांस सुसंस्कृतपणें घालवितां यावा या हेतूनें सांस्कृतिक शिक्षणाच्या व करमणुकीच्या अनेक योजना वरील सर्व शिक्षणसंस्थांमध्यें आंखलेल्या असतात. यामुळें विद्यार्थ्यांना आपल्या आवडीचे विषय व छंद अनुसरतां येतात. तसेंच शारीरिक शिक्षण सक्तीचें असून आरोग्याकडे विशेष लक्ष पुरविण्यांत येतें.

अशा रीतीनें शिक्षण घेऊन बाहेर पडलेला प्रत्येक तरुण नागरीक समाजाचा सुशिक्षित, जाणता व जबाबदार घटक बनतो. पण एवढ्यानें आपलें कार्य संपलें असें सोविएत शिक्षणयोजना मानीत नाहीं. या सर्व नागरिकांना आपापले व्यवसाय सांभाळून स्वतांचा बौद्धिक व मानसिक विकास करतां यावा, आपल्या फुरसतीच्या वेळाचा उपभोग सुखानें व नेणतेपणें ( *Cultured manner* ) घेतां यावा याची तजवीज करणें हेंही या शिक्षणयोजनेचें एक अंग आहे. या हेतूनें क्लब, छंदमंडळें ( *Circles* ), संध्याकाळचे वर्ग, लोकशिक्षणसंस्था इत्यादि निरनिराळ्या संस्था चालविण्यांत आल्या असून त्याचा उपयोग प्रौढ जनता घेत असते.

## २ शिक्षणाचा कारभार–शिक्षण खातें

शिक्षणाची स्थूल योजना आपण वर पाहिली. या योजनेची अंमलबजावणी कशी होते ?

सोविएत देशांतील १७ स्वतंत्र राष्ट्रें व त्यांतील स्वायत्त प्रदेश यापैकीं प्रत्येकाचें

स्वतंत्र शिक्षणखातें आहे. बालशिक्षण, प्राथमिक शिक्षण, दुय्यम व उच्च शिक्षण, अध्यापन या निरनिराळ्या तऱ्हेच्या शिक्षणसंस्थांवर शिक्षणखात्याच्या निरनिराळ्या विभागांचें नियंत्रण असतें. तसेंच प्रांतवार, जिल्हावार, तालुकावार शिक्षणाधिकारी नेमलेले असून, विश्वविद्यालयीन शिक्षणसंस्था सोडून त्या भागांतील सर्व शिक्षण संस्थांवर त्यांची देखरेख असते. प्रत्येक राष्ट्राची परिस्थिति व त्याच्या विकासाच्या आड येणाऱ्या अडचणी वेगवेगळ्या असतात. त्या लक्षांत घेऊन आपली भाषा, वाङ्मय आणि संस्कृति यांची उत्कृष्ट तऱ्हेनें जोपासना करतां यावी या दृष्टीनें अशी स्वायत्तता प्रत्येक राष्ट्राला असणें योग्यच आहे.

दुय्यम दर्जाच्या व्यावसायिक शाळा व कॉलेजें यांवर मात्र शिक्षणखात्याशिवाय त्या त्या विशिष्ट खात्याचीहि देखरेख आहे. शेतकीशाळांवर शेतकीखात्याचें तर रेलवे शाळांवर रेलवेखात्याचें नियंत्रण असतें. परंतु कनिष्ठ दर्जाच्या औद्योगिक शाळा मात्र यापैकीं कोणत्याही खात्यांच्या कक्षेखालीं येत नाहींत. त्या चालविण्याची जबाबदारी एका खास खात्यावर सोपविली आहे. उच्च शिक्षणसंस्थांना मार्गदर्शन करण्याचें काम त्या त्या विषयाशीं संबंध असलेल्या सरकारी खात्यांकडे दिलेलें आहे. उच्च शास्त्रीय शिक्षण आणि शास्त्रीय संशोधन यांना शास्त्र परिषद् ( *Academy of Sciences* ) या संस्थेकडून मार्गदर्शन करण्यांत येतें.

मध्यवर्ति सरकारचा शिक्षणाशीं निकटचा संबंध असतो. सर्व उच्च शिक्षणसंस्थांवर देखरेख करण्यासाठीं मध्यवर्ति सरकारनें एक नियामक मंडळ नेमलेलें असतें. तसेंच प्राथमिक व दुय्यम शिक्षणक्षेत्रांत सर्व सोविएत देशांशीं ज्या ज्या बाबतींत संबंध येतो त्या त्या बाबतींत स्थूल धोरण मध्यवर्ति सरकारकडून ठरविण्यांत येतें. प्रत्येक पंचवार्षिक योजनेंत शिक्षणाविषयीं एक विभाग असतो. शिक्षणविषयक योजना आंखण्याचें काम मध्यवर्ति शिक्षणयोजनासमिति करते. अशा मध्यवर्ति योजनेचा एक ठळक फायदा लागलीच ध्यानांत येण्याजोगा आहे. कांहीं प्रदेश इतरांच्या मानानें मागासलेले राहिले आहेत असें दिसून आल्यास त्यांची अधिक वेगानें प्रगति व्हावी याकरितां अधिक लक्ष व सामुग्री पुरवतां येते.

मध्यवर्ति सरकारची सर्वांत महत्त्वाची जबाबदारी म्हणजे या सर्व राष्ट्रांच्या सहाय्यानें या सर्व शिक्षणासाठीं लागणारा पैसा उभारणें ही आहे. सोविएत सरकारचें शिक्षण खात्याविषयीं अत्यंत सढळ धोरण आहे; फॅशिझम व नाझी जर्मनी यांच्याशीं प्राणांतिक

युद्ध सुरू असतांनाही सोविएत सरकारनें या बाबतींत मुळींच आंखडता हात घेतलेला नाहीं, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. १९४० सालीं संरक्षण व युद्धखात्यांचा खर्च अनेक पटीनें वाढलेला असूनही शिक्षणखात्यावरील खर्च अंदाजपत्रकांतील एकूण खर्चाच्या शेंकडा १२·३ टक्के होता. १९४४ सालीं ( ज्यावेळीं युद्धपरिस्थिति अगदीं अटीतटीची होती ) शिक्षणखर्च २११० कोटि रूबल इतका असून तो १९४३ च्या खर्चाहून शेंकडा ६६ टक्क्यांनीं अधिक होता. १९४५ सालामधील पुढील आंकडे उद्बोधक आहेत. या वर्षी युद्धखर्चाचें एकूण खर्चाशीं शेंकडा ४५ टक्के प्रमाण होतें तर याखालोखाल दुसरी खर्चाची बाब म्हणजे शिक्षण व सांस्कृतिक खर्च ( शेंकडा २२ टक्के ) ही होती. हिंदुस्थानांत १९४३ सालचे हेच आंकडे शेंकडा ४६ टक्के युद्धखर्च व शेंकडा ४·१ टक्के शिक्षणखर्च असे होते!

झारशाहींत या बाबतींत काय परिस्थिति होती? १९१३ सालीं झारच्या शिक्षण खात्याचा खर्च १३½ कोटि रूबल होता; म्हणजे शिक्षणाप्रीत्यर्थ दर माणशीं दर वर्षी ⅘ रूबल खर्च होत असत. त्यावेळीं इंग्लंड, बेल्जियम, व अमेरिका या देशांत हें प्रमाण अनुक्रमें ३, ३½ व ९ रूबल होतें. सध्यां सोविएत शिक्षणखात्याचा खर्च १९१३ सालामधील खर्चाच्या १५६ पट आहे व प्रतिवर्षी शिक्षण व सांस्कृतिक विकास यांसाठीं दर माणशीं ११० रूबल खर्च केले जातात. हिंदुस्तानांत १९४० – ४१ सालीं शिक्षणासाठीं सरकारी व निमसरकारी खर्च फक्त १७½ कोटि रुपये होता. हें प्रमाण दर माणशीं दहा आण्याहून कमी पडतें.

याशिवाय इतर देशांत अनपेक्षित वाटेल अशा एका मार्गानें शिक्षणसंस्थांना द्रव्यरूपानें व इतर मदत मिळते. प्रत्येक शिक्षणसंस्था कोणत्या ना कोणत्या तरी कारखान्यानें, सामुदायिक शेतानें, लालसेनेच्या पथकानें अगर दुसऱ्या एखाद्या संस्थेनें "*आपली*" मानलेली असते. "आपली" शाळा अधिकाधिक उत्तम व्हावी या हेतूनें त्या कारखान्यांतील कामगार अथवा सामुदायिक शेतावरील नागरीक शाळेच्या कारभारांत बारकाईनें लक्ष घालतात. "आपल्या" शिक्षणसंस्थेला एखादी अनपेक्षित गरज भासली कीं ही "पालक" संस्था तिच्या मदतीला धांवून येते. इमारती, पुस्तकें, उपकरणें आणि द्रव्यसहाय्य अशा अनेक तऱ्हांनीं हें सहाय्य केलें जातें. तसेंच शाळेंतील होतकरू विद्यार्थ्यांना पैशाच्या अभावीं उच्च शिक्षण घेणें अवघड होत असलें तर त्यांना शिष्यवृत्ति देऊन पुढें पाठविण्यांत येतें.

१९३३ सालीं नवीन शाळा उघडण्यासाठीं इमारतींची फार जरूर होती. या वर्षी लेनिनग्राद व बाश्किरिया जिल्ह्यांत शाळांच्या इमारतीसाठीं अनुक्रमें २३ लक्ष व २५ लक्ष रूबल अशा तऱ्हेनें मिळाले होते. "आपली" शाळा सर्वांत उत्तम असावी, इतरांच्या मागें असूं नये, यासाठीं प्रत्येक "पालक" संस्था दक्षता घेत असते; यामुळें कित्येक मागासलेल्या प्रदेशांत शिक्षणाची प्रगति विलक्षण गतीनें झाल्याचीं अनेक उदाहरणें दाखवितां येतील.

## बालसंस्था

## ३

सोविएत यूनियनमध्यें सक्तीच्या प्राथमिक शिक्षणास वयाच्या सातव्या अगर आठव्या वर्षी सुरुवात होते. या वयाखालील मुलांसाठीं मुख्यतः दोन प्रकारच्या संस्था आहेत. तीन साडेतीन वर्षांखालील मुलांसाठीं शिशुगृहें ( *Crèche* ) चालविण्यांत येतात; आणि तीन ते आठ वर्षांच्या मुलांकरितां बालोद्यान शाळा ( *Kindergarten* ), नर्सरी शाळा इत्यादि संस्था आहेत. या संस्थांत मुलें पाठविण्याविषयीं सक्ती नसते. पण सोविएत देशांत अशा संस्था फार मोठ्या प्रमाणावर आहेत. आठ वर्षांखालील एकूण बालसंख्येचा तिसरा हिस्सा इतकीं मुलें १९४१ सालीं या संस्थांमध्यें पाठविलीं जात होतीं, यावरून सोविएत शिक्षणामध्यें बालशिक्षणसंस्थांचें स्थान व कार्य किती महत्त्वाचें आहे याची कल्पना येते.

### १ शिशुगृहें ( *Crèche* )

ज्या ज्या ठिकाणीं स्त्रिया काम करतात त्या त्या प्रत्येक उद्योगकेंद्राच्या जागीं— प्रत्येक कारखाना, सामुदायिक शेत अगर ऑफिस यांना जोडून शिशुगृहें चालविलेलीं असतात. कित्येक ठिकाणीं पुष्कळ बिऱ्हाडें असलेल्या चाळी, इमारती अथवा बरींच घरें असलेलीं वसाहत यांना लागून शिशुगृहांची सोय असते. प्रसूतीपूर्वी पांच

आठवडे व नंतर चार आठवडे आईला पगारी रजा मिळते. त्यानंतर मूल शिशुगृहांत ठेवून निश्चिंत मनानें स्त्री आपल्या उद्योगाला जाऊं शकते. शिशुगृहांची वेळ सामान्यपणें सकाळीं ७॥ पासून संध्याकाळीं ५॥ पर्यंत असते. सतत काम असणाऱ्या ( उदा० रेल्वेगार्ड ) अथवा रात्रपाळीला जाणाऱ्या स्त्रियांच्या सोयीकरतां अहोरात्र चालू असलेलीं शिशुगृहेंही आहेत.

हीं शिशुगृहें उघडणें व तीं व्यवस्थितपणें चालविणें हें त्या उद्योगकेंद्राचें कर्तव्य समजलें जातें. तीं सर्व साधनांनीं सुसज्ज ठेवून त्याकरितां लागणारा खर्च व इतर व्यवस्था करण्याची सर्व जबाबदारी त्या त्या उद्योगकेंद्रावर असते. शिशुगृहांची सोय मोफत मात्र नाहीं. मुलावर होणाऱ्या खर्चाचा १/१० ते १/३ इतकी फी ( सामान्यतः महिन्याला दहा वीस रूबल ) पालकांना द्यावी लागते आणि हें प्रमाण त्यांच्या प्राप्तीवर अवलंबून असतें. यामुळें ज्यांचें उत्पन्न कमी असेल त्यांना अर्थातच थोडक्या खर्चांत मुलांना शिशुगृहांत ठेवतां येतें.

मूल सकाळीं शिशुगृहांत दाखल झाल्यावर त्याला स्नान घालून स्वच्छ कपडे चढविण्यांत येतात आणि नंतर दैनंदिन कार्यक्रमाला आरंभ होतो. दुग्धपान, खेळ, बागेंतून सहली, सांघिक नाच व गाणीं, व्यायाम, जेवण, झोंप असा हा विविध कार्यक्रम नियमितपणें चालू असतो. यासाठीं खास शिशुसंगोपनाचें शिक्षण घेतलेला चालकवर्ग असतो व त्यांना मदत करण्यासाठीं डॉक्टर व नर्स असतात. हीं सर्व कामें स्त्रियाच करतात. आजारी मुलांची निराळी व्यवस्था करण्यांत येते व त्यांवर डॉक्टर व नर्स यांची देखरेख असते.

सोविएत शिशुगृहाची व्यवस्था साधारणतः कशी असते याची कल्पना पुढील वर्णनावरून येईल. ( हें वर्णन मॉस्कोमधील शिशुगृहांवर आधारलेलें आहे. ). शिशुगृहांचीं दालनें भव्य व विस्तृत असतात व त्यांमध्यें उजेड व खेळती हवा भरपूर प्रमाणांत यावी अशा रीतीनें ती इमारत बांधलेली असते. त्याला जोडून स्वतंत्र सैंपाकघर, धोबीखाना, व स्वच्छ न्हाणीघरांची सोय असते. मुलाला तीन वेळां खाणें देण्यांत येतें व शिवाय सकाळीं एखाद्या फळाचा रसहि देतात. तान्ह्या मुलाला पाजण्यासाठीं कामगार आईला दर चार तासांनीं अर्धा तास रजा मिळते. पाजण्यापूर्वी ती हात पाय स्वच्छ धुवून स्वच्छ आंगरखा चढवते व मगच मुलाला जवळ

घेते. शिशुगृहांत आईलाहि जेवण मिळण्याची सोय असते. अन्न पथ्यकारक व कसदार असावें याबद्दल दक्षता घेण्यांत येते आणि एकाद्या मुलाला विवक्षित प्रकारच्या अन्नाची जरूर असल्यास तें देण्याची व्यवस्था केली जाते. झोंपण्यासाठीं निराळें दालन असून त्यामध्यें पाळणे व खाटा ठेवलेल्या असतात. मऊ बिछान्यावर शुभ्र व स्वच्छ चादरी पसरलेल्या असतात आणि हिंवाळ्यांत गरम पांघरुणाची व कपड्यांची भरपूर तरतूद असते. कित्येक शिशुगृहांना उघड्या हवेंत खेळण्यासाठीं मोकळें पटांगण व बगीचाही असतो.

एवढया लहान वयाच्या मुलांना रूढ अर्थानें "शिकवणें" अर्थातच शक्य नसतें. सर्व कार्यक्रम अशा रीतीनें आंखलेला असतो कीं, मुलाची संवेदनाशक्ति अधिकाधिक कार्यक्षम व्हावी आणि इंद्रियगोचर अनुभवांचा मेळ घालतां येऊन मूल एकंदरीनें चलाख व्हावें. या उद्देशानेंच शिशुगृहाचीं सर्व दालनें शोभिवंतपणें सजविलेलीं असून भिंतीवर सुंदर सुंदर चित्रें लटकविलेलीं असतात. छतांपासून व भिंतींवर नानारंगाचे मोठमोठे गोल, विमानें आणि आकृती लोंबत असतात आणि ठिकठिकाणीं फुलांचे रंगीबेरंगी गुच्छ व सोनेरी मासे असलेलीं काचपात्रें ठेविलेलीं असतात. खेळाचीं साधनें थोडयाफार फरकानें मॉंटेसोरी अथवा फ्रोबेल पद्धतीचीं असतात आणि त्यांमध्यें रंगीत खडूच्या कांडया, रंगीत कागद, चित्रांचे ठोकळे, घरें बांधण्यासाठीं ठोकळे या अनेक वस्तूंचा समावेश होतो. संगीताची आवड उत्पन्न व्हावी या उद्देशानें निरनिराळीं वाद्यें, ग्रामोफोन व रेडियो यांच्या साहाय्यानें करमणूक केली जाते आणि साधीं सांघिक गाणीं व नाच शिकविण्यांत येतात.

एक वर्षाच्या आंतील, एक ते दोन वर्षांमधील व दोन पासून साडेतीन वर्षांपर्यंतचीं मुलें असे शिशुगृहांतील मुलांचे तीन विभाग पाडलेले असतात; आणि प्रत्येक शिक्षिकेला जास्तीत जात पंधरा मुलें सांभाळावीं लागतात.

### २ बालोद्यान नर्सरी, शाळा इत्यादि

### (*Kindergarten & Nursery Schools.*)

तीन ते आठ वर्षांच्या मुलांसाठीं या संस्था उघडण्यांत आलेल्या असून त्या संस्था चालविण्याची सर्व जबाबदारी शिशुगृहाप्रमाणें त्या त्या उद्योगकेंद्राची ( कारखाना,

सामुदायिक शेत, ऑफिस ) असते. या शाळांतील व्यवस्था, फी व इतर सोय साधारणपणें शिशुगृहासारख्याच असतात. मुलांचा दैनंदिन कार्यक्रम, खेळ व त्यांकरितां लागणारीं साधनें अर्थातच या वयाच्या मुलांना योग्य अशा प्रकारची असतात. कांहीं बालोद्यान व नर्सरी शाळांना जोडून लेखनवाचनाचा वर्ग ( बालवर्ग ) चालविण्यांत येतो. मूल सहा वर्षाचें होईपर्यंत मात्र या शिक्षणास सुरुवात करण्यांत येत नाहीं. नंतर दररोज वीस ते तीस मिनिटांचे दोन धडे शिकविले जातात. हा वर्ग असलेल्या शाळांतून मुलांसाठीं एक उत्तम ग्रंथालय आणि वाचनमंदिर असून तेथील वातावरण अतिशय शांत व प्रसन्न राखण्यांत येतें. तसेंच या संस्थांमध्यें एक लहानसें वर्कशॉप असतें व तेथें साधीं साधीं हत्यारें वापरण्यास मुलांना उत्तेजन दिलें जातें. खेळण्यासाठीं पटांगण आणि व्यायामासाठीं सर्व साधनांनीं युक्त अशी एक व्यायामशाळाही असते.

बालोद्यान संस्थांमध्यें प्रत्येक वर्गांत पंचविसांहून अधिक मुलें नसावीं असा नियम आहे; सामान्यतः याहून कमीच असतात. एका इंग्रज शिक्षणतज्ज्ञ लेखिकेच्या मतें सोविएत बालसंस्थांची एकंदर सजावट इंग्लंडांतील नर्सरी शाळेपेक्षां खूपच चांगली असते व साधनसामुग्रीहि अधिक विपुल असते.

शिशुगृहें शिक्षणखात्याच्या कक्षेखालीं येत नाहींत. त्यांवर आरोग्यखात्याची देखरेख असते. पण शिक्षणशास्त्र व मुलांचें मानसशास्त्र यांविषयीं शिक्षणखात्याचें सहकार्य आवश्यक असतें. शिशुगृहांचें आरोग्य, खेळ व एकंदर व्यवस्था यासंबंधीं योग्य मार्गदर्शन मॉस्कोमधील "बालक-माता संरक्षणसंस्था" ( *Institute for the Protection of Mother & Child* ) या नांवाची स्वतंत्र संस्था करते. शिशुगृहांतील चालकवर्गाला याच संस्थेकडून शिशुसंगोपनाचें शिक्षण मिळालेलें असतें. बालोद्यान व नर्सरी शाळा यांवर शिक्षणखात्याची देखरेख असते व आरोग्य-खात्याचे सहकार्यानें या संस्थांचा कारभार चालविला जातो. यांमधील शिक्षकांनीं आणि चालकवर्गानें खास शिक्षण घेतलेलें असतें व त्यांना नीट मार्गदर्शन करण्यासाठीं लहान मुलांच्या मानसशास्त्राविषयीं विशेष संशोधन करणाऱ्या मध्यवर्ति संस्था आहेत.

जगांतील इतर देशांत तीन वर्षांखालील मुलांसाठीं फारशा शिक्षणसंस्था नाहींत.

बालोद्यान अथवा नर्सरी शाळांत पाठविल्या जाणाऱ्या मुलांचें प्रमाण अति अल्प असून तीं सुखवस्तु वर्गांचीं असतात. अर्थातच बालशिक्षणाविषयीं इतर देशांचा अनुभव अतिशय मर्यादित स्वरूपाचा आहे. सोविएत यूनियनमध्यें बालशिक्षणाची तरतूद बऱ्याच मोठ्या प्रमाणांत असल्यामुळें गेल्या पंधरा वर्षांत या आठ वर्षांखालील मुलांच्या शिक्षणाविषयीं तेथें आलेले अनुभव आणि झालेलें संशोधन फार महत्त्वाचें आहे यांत शंका नाहीं. अर्थातच तेथील लहान मुलांचा शिक्षणक्रम कोणत्या प्रकारचा असतो, त्यांना कोणतें वळण लावतात हें पाहाणें बोधप्रद होईल.

प्रत्येक मूल अधिकांत अधिक संवेदनाक्षम व चलाख व्हावें हा या बालसंस्थांतील कार्यक्रमाचा उद्देश असतो हें आपण पाहिलें आहे. प्रथम प्रथम रंग, आकृति व ध्वनि यांच्या साहाय्यानें हा उद्देश साध्य करणें शक्य असतें. मूल थोडेसें मोठें झाल्यावर त्याला स्पर्शज्ञान आणि इतर इंद्रियगोचर अनुभव यांचा मेळ घालून स्वतां कार्यप्रवण बनविणें आवश्यक असतें आणि यासाठीं शरीराची योग्य रीतीनें हाल-चाल करण्यास त्यास शिकवावें लागतें. पुढें पुढें केवळ जोर अथवा शारीरिक शक्ति यांचा उपयोग करतां येणें महत्त्वाचें नसून प्राप्त परिस्थितींत बाह्य साधनांची नीट योजना करून मुलांना उद्दिष्ट गोष्ट साध्य करतां येणें महत्त्वाचें असतें. या दृष्टीनें पाहिल्यास वर उल्लेख केलेली बालसंस्थांची सजावट व तेथील साधनें यांचें महत्त्व आपल्या चटकन लक्षांत येतें.

चारपांच वर्षांचीं मुलें करवत, हातोडा यासारखीं साधीं हत्यारें वापरण्यासही शिकतात. तीं स्वतःची कल्पनाशक्ति लढवून ठोकळ्यांच्या व या हत्यारांच्या साहाय्यानें इमारती, पूल, मनोरे यासारख्या वस्तु तयार करतात. अशा प्रकारें लहानपणापासून मुलांना आपली कल्पनाशक्ति वापरतां येऊन त्याबरोबरच शारीरिक श्रमांची संवय होते आणि त्याची व्यावहारिक उपयुक्तता त्यांच्या मनावर ठसते. लहान मुलांच्या हातांत हत्यारें दिल्यास तीं स्वतःला इजा करून घेतील ही भीति अनुभवाअंतीं निराधार असल्याचें आढळून आलें आहे.

प्रत्येक मुलानें आपली कल्पनाशक्ति व योजकता वापरावी आणि शक्य तों स्वावलंबी व्हावें असा कटाक्ष ठेवला जातो. स्वतांचे कपडे घालणें, काढणें आणि ते नीट ठेवणें, तोंड धुतल्यावर स्वतांचा ब्रश जागच्या जागीं ठेवणें इत्यादि गोष्टी लहान-पणापासून करायला उत्तेजन दिलें जातें. पावणे दोन वर्षांच्या मुलांना आपले कपडे

काढतां यावे अशी अपेक्षा असते. मूल अडीच वर्षांचें असतांना त्याला कपडे घालण्यास व बिछाना घालण्यास शिकवितात. आणि तीन वर्षाचें मूल कठड्याचा आधार न घेतां जिना चढण्याउतरण्यास लागतें. जी गोष्ट मुलाला स्वतां करतां येईल ती करण्यासाठीं त्याला मदत करूं नका हें तत्त्व नेहमीं पाळण्यांत येतें. एखाद्या मुलाला टेबलावरील ठोकळा पाहिजे असल्यास त्याला तो उचलून न देतां, त्यानें स्वतां खुर्ची अगर स्टुलावर उभें राहून घ्यावा अशी अपेक्षा असते. त्यामुळें कदाचित् मूल घरामध्यें चिलमीसारख्या भलत्या वस्तु हाताळण्याचा प्रयत्न करील हें खरे. पण त्यासाठीं योजकता व स्वावलंबनाची संवय मुळांतच मारणें योग्य नव्हे. कारण ही लहानपणापासून जतन केलेली व वाढवलेली योजकताच, शास्त्रसंशोधनासारख्या महत्त्वाच्या समाजोपयोगी कार्याकरितां मोठया वयांत महत्त्वाची ठरते.

प्रत्येक मुलाच्या अंगीं स्वतंत्र बुद्धि व योजकता यांचा परिपोष व्हावा अशी काळजी ज्याप्रमाणें घेतली जाते, त्याप्रमाणें त्याच्या मनावर सामायिक दृष्टिकोन बिंबवला जावा अशी दक्षता घेतली जाते. पाळीपाळीनें जेवणाचें टेबल मांडणें, आवरणें इत्यादि गोष्टी मुलांना शिकविल्या जातात. घरें बांधावयाचे ठोकळे लहान मुलांना एकेकाला पेलण्याजोगे नसतात. ठोकळा उचलण्यासाठीं मुलाला आपल्या संवगडयांची मदत घ्यावीच लागते आणि अशा रीतीनें लहान वयांतच सहकार्यानें काम करण्याची संवय लागते. खेळांतील रंगीत दिवे आणि रहदारीचीं इतर साधनें यांच्या साहाय्यानें गर्दीचे रस्ते कसे ओलांडावे, कोणत्या बाजूनें चालावें इत्यादि उपयुक्त गोष्टी शिकविल्या जातात. नाच, गाणीं आणि कवाईत व खेळ हीं सांघिक असतात. याप्रमाणें निरनिराळ्या तऱ्हांनीं प्रत्येक मूल हें समाजाचें एक जबाबदार घटक आहे आणि त्याचें स्थान समाजावेगळें नाहीं, ही गोष्ट लहानपणापासून ठसविली जाते. लेनिनची पुण्यतिथि, मे–दिन, नोव्हेंबर राज्यक्रांतिदिन, बालकदिन इत्यादि सणांच्या दिवशीं सर्व मुलें मोठा कार्यक्रम योजून तो परस्परसाहाय्यानें पार पाडतात. यामुळें सामायिक दृष्टिकोन बिंबविण्यास मदत तर होतेच, शिवाय देशभक्तीचें खंबीर बीजही रोंवलें जातें.

लहान वयांतच मुलांना संगीत, चित्रकला, नृत्य यांची गोडी उत्पन्न व्हावी असा प्रयत्न केला जातो. मुलांनीं स्वतांच्या खेळण्यांची व पुस्तकांची काळजी घ्यावी असा कटाक्ष प्रथमपासून ठेवला जातो. वाचनाची आवड उत्पन्न व्हावी या हेतूनें वाचन-मंदिरांत "ज्ञान ही शक्ति आहे", "ज्ञान मिळवा अशी लेनिनची आज्ञा आहे

आणि ग्रंथ हे ज्ञान मिळविण्याचीं साधनें होत " असे फलक लावलेले असतात. प्रत्येक मूल चौरस दृष्टि असलेला सुसंस्कृत नागरिक व्हावा याकरितां अशा दृष्टीनें लहानपणापासून प्रयत्न केले जातात. सोविएत समाजांत नवीन पिढीपैकीं कितीतरी मुलें अशा प्रकारचें वैशिष्टयपूर्ण शिक्षण लहानपणापासून घेत आहेत.

सोविएत बालसंस्थांचें शिक्षणक्रमांतील वैशिष्टय आपण वर पाहिलें. या संस्थांचें समाजजीवनांत काय महत्त्व आहे हें आपण आतां पाहूं. सोविएत स्त्रीला पुरुषाच्या बरोबरीनें समाजाच्या संसारांत भाग घेण्याचा अधिकार प्राप्त झाला आहे. हा हक्क तिला निर्वेधपणें उपभोगतां यावा यासाठीं " चूल व मूल " या परंपरागत चालत आलेल्या बंधनाच्या काचांतून तिची सुटका होणें अर्थातच आवश्यक होतें. म्हणूनच समान शिक्षण, समान वेतन इत्यादि हक्क मिळणें जसें महत्त्वाचें होतें त्याप्रमाणें गरोदरपणीं व बाळंतपणांत भरपगारी रजा, गरोदरपणीं व प्रसूत झाल्यावर आणि नंतरहि मोफत वैद्यकीय मदत, सामायिक सैंपाकघरें व जेवणघरें इत्यादि सोय समाजानें करणें क्रमप्राप्त होतें. मोठया प्रमाणावर बालसंस्था उघडून सोविएत समाजानें स्त्रीदास्य-विमोचनाच्या मार्गावर महत्त्वाचें पाऊल टाकलें आहे. बालसंस्थांनीं स्त्रियांच्या उद्योगाच्या वेळांत बालसंगोपनाचें आवश्यक कार्य उचलल्यामुळें स्त्रीला आपली मातृत्वाची जबाबदारी पार पाडून शिवाय पुरुषांच्या बरोबरीनें संसारांत हक्काचें स्थान प्राप्त करून घेणें शक्य झालें आहे.

ऐतिहासिक दृष्टया पाहिल्यास बालसंस्थांचा प्रश्न सोविएत सरकारला आपल्या सत्तेच्या पहिल्या पांचदहा वर्षांतच हातीं घ्यावा लागला असें दिसून येतें. १९१७ पासून २२ पर्यंतच्या अशांततेच्या काळांत लक्षावधि लहान मुलें देशोधडीस लागलीं होतीं. त्यांना शिक्षण देऊन योग्य वळण लावण्यासाठीं जागोजाग बालसंस्था उघडण्यांत आल्या. तसेंच स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीनें काम करूं लागतांच त्यांच्या मुलांचा प्रश्न पुढें आला. शिशुगृहें स्थापण्याच्या कामीं स्त्रियांनींच प्रथम पुढाकार घेतल्याचें आढळून येतें. वोल्गा नदीतीरावरील एका उद्योगकेंद्रांतील स्त्री–कामगारांनीं कारखान्याला लागून शिशुगृह ( *Crèche* ) उघडावें अशी चालकवर्गाला विनंती केली. पण चालकांनीं या गोष्टीकडे दुर्लक्ष केल्याचें दिसून आल्यामुळें स्त्री–कामगारांनीं स्वतांच हा प्रश्न सोडविण्याचें ठरविलें ! त्यांनीं आपल्या देखरेखी-

खालीं कारखान्याशेजारीं एका खोलींत शिशुगृह उघडलें. नंतर कांहीं स्त्रिया शिशु-संगोपनाचें शिक्षण घेऊन आल्या आणि पाळीपाळीनें शिशुगृहाचें काम पाहूं लागल्या. त्याच वेळीं कारखान्यांतील कामगारांनीं शिशुगृहाची एवढी जोराची मागणी केली कीं चालकवर्गाला शिशुगृहाची सोय व व्यवस्था करणें भागच पडलें. एका खोलींत संसार थाटलेलें तें शिशुगृह आज अद्यावत् साधनांनीं सुसज्ज बनलें आहे !

या बालसंस्थांमध्यें किती प्रगति झाली आहे व त्यांचा व्याप किती वाढला आहे याची कल्पना पुढील गोष्टींवरून येईल. झारशाहींत शिशुगृहें (*Crèche*) ही संस्था अस्तित्वांतच नव्हती. बालोद्यानसंस्था होत्या पण त्यांमधील सर्व मुलें (मुंबई, पुणें इत्यादि शहरांतील बालोद्यान शाळांतील मुलांप्रमाणें) श्रीमंत आई-बापांची होतीं हें सांगणें नकोच. १९२७ सालच्या सुमारास बालसंस्थांतील मुलांची संख्या एकूण ३,०८,००० इतकी होती.

१९१४ सालीं बालोद्यान संस्था व अनाथ अर्भकालयें यांची संख्या सुमारें २०० होती; तर १९३६ सालीं २३५०० (१९१४ च्या अनेकपट) बालसंस्था सोविएत देशांत होत्या.

१९४१ चे आंकडे पुढीलप्रमाणें आहेत :

| | | | |
|---|---|---|---|
| *शिशुगृहें* | (*वय ०–३*) | *४० लक्ष* | *मुलें* |
| *बालोद्यानसंस्था* | (*वय ३–८*) | *१२॥ लक्ष* | ,, |
| *नर्सरी* | (*वय ३–८*) | *४० लक्ष* | ,, |

*एकूण बालसंस्थांतील मुलें १२॥ लक्ष.*

*आठ वर्षांखालील एकूण बालसंख्या ३१५ लक्ष.*

बालसंस्थांतील मुलांचें प्रमाण एकूण बालसंख्येशीं सुमारें शेंकडा ३० इतकें पडतें. प्रत्येक तीन मुलांपैकीं एक मूल बालसंस्थांत जातें असा याचा अर्थ आहे. हे आंकडे वर्षभर चालू असणाऱ्या बालसंस्थांचे आहेत. लावणी कापणीच्या हंगामांत खेडेगांवांत हंगामाच्या महिन्यापुरतीं शिशुगृहें व नर्सरी शाळा उघडण्यांत येतात. १९४१ सालीं

अशा हंगामी बालसंस्थांत जाणाऱ्या मुलांची संख्या ३८॥ लक्ष इतकी होती. या संस्थांना क्रीडोद्यानें ( *Summer Play Grounds* ) असें नांव आहे.

इंग्लंडमध्यें शिशुगृहांची सोय नाहीं व नर्सरी शाळांची सोय फक्त सुखवस्तु पालकांच्या मुलांसाठीं आहे. युद्धकालांत स्त्रियांना मोठया प्रमाणावर उद्योगधंद्यांत पडावें लागलें, त्यावेळीं सामान्य लोकांसाठीं सरकारी नर्सरी शाळा उघडण्यांत आल्या. परंतु त्यांमध्यें फक्त सुमारें ७०,००० मुलांची सोय होत असे. हिंदुस्तानांत कांहीं कारखान्यांत शिशुगृहें आहेत, पण तेथील गैरव्यवस्था अगदीं पहाण्यासारखी असते. मोठया शहरांत बालोद्यान संस्था आहेत पण तेथील फी जबर असते.

स्त्रीला समाजाच्या सांस्कृतिक जीवनांत भाग घेतां यावा या हेतूनें बालसंस्थांसारख्या अन्य सोयी करण्यांत आल्या आहेत. प्रत्येक प्रौढ मनुष्यांच्या क्लबाला जोडून लहान मुलांसाठीं शिशुगृहें आणि त्याहून मोठया मुलांसाठीं मुलांचे क्लब, अशा बालसंस्था उघडण्यांत येत आहेत. मोठया रेल्वे-स्टेशनवर एक बालसंस्था असते, आणि त्यामध्यें आगगाडीची वाट पहाणाऱ्या उतारू आयांना आपलीं मुलें ठेवतां येतात. तसेंच बाजारासाठीं शहरांत येणाऱ्या आयांना आपलीं मुलें स्टेशनवरील शिशुगृहांत ठेवून निर्वेधपणें बाजारहाट करतां येतें. दूर पल्ल्याचा प्रवास असेल तर आगगाडींत लहान मुलें असणाऱ्या आयांसाठीं स्वतंत्र डबा असतो व त्या डब्याची सिद्धता एखाद्या शिशुगृहाप्रमाणें सजविलेली असते. कित्येक सिनेमागृहांना लागूनही शिशुगृहांची सोय करण्यांत येत आहे.

यावरून ही गोष्ट ताबडतोब ध्यानांत येते कीं बालसंस्थांची सोय सोविएत देशांत बहुजनसमाजाच्या सुखासाठीं आहे. इतर देशांत एकतर धनिक पालकांच्या मुलांसाठीं बालोद्यान संस्था असतात किंवा निराश्रित मुलांसाठीं धर्मार्थ बालसंस्था असतात. सोविएत देशांत प्रत्येक पालकाला थोडक्या खर्चानें मुलें बालसंस्थांत पाठविण्याचा हक्क आहे आणि त्याचा उपयोग समाजांतील तिसरा हिस्सा लोक घेत आहेत. ती केवळ सुखवस्तु लोकांची चैनीची बाब राहिलेली नाहीं. तसेंच ऐपतीप्रमाणें कमी अधिक फी घेतली जात असली तरी त्यामुळें कोणत्याही प्रकारचा भेदभाव केला जात नाहीं. भावी पिढीचें नीट संगोपन करण्याची जबाबदारी केवळ आईबापांची नसून समाजाचीही आहे असें समजलें जातें. अशा प्रकारच्या बालसंस्था उत्तरोत्तर वाढून त्यांमध्यें सर्व लहान मुलांची सोय करतां यावी असा सोविएत सरकारचा अंतिम उद्देश आहे.

बालसंस्थांत मुलें पाठविल्यामुळें कौटुंबिक जीवन मोडेल आणि मुलांना नीट वळण लागणार नाहीं, त्यांचें संगोपन योग्य रीतीनें होणार नाहीं अशी भीति कित्येकांना वाटते पण ती सर्वस्वीं निराधार आहे. एकतर फक्त कामाच्या वेळींच आया मुलांना बालसंस्थांत पाठवितात. दिवसाचा बाकीचा सर्व वेळ मूल आईच्या सहवासांतच असतें. दुसरी गोष्ट अशी कीं ज्या सुखवस्तु कुटुंबांना सुशिक्षित व सुसंस्कृत दाई ठेवण्याची ऐपत असते त्यांच्या मुलांचें संगोपन नीट होत नाहीं का ? बालसंस्थांत हीच सोय अधिक उत्तम व अनुकूल वातावरणांत केलेली असते.

बालसंस्थांचा विचार करतांना सोविएत समाज आपल्या भावी पिढीची किती काळजी घेतो या अधिक व्यापक प्रश्नाकडे लक्ष वेधणें जरूर आहे. सोविएत मुलाची त्याच्या जन्माच्या आधींपासून काळजी घेतली जाते. गरोदरपणीं प्रत्येक स्त्रीला वैद्यकीय सल्ला व मदत मोफत मिळते. बाळंतपणाची सोय उत्तम प्रसूतिगृहांमध्यें सरकारी खर्चानें होते. बाळंतपणाच्या आधीं व नंतर भर पगारी रजा मिळते. या अवधींत नियमितपणें जरूर ती वैद्यकीय मदत मोफत मिळते. लहान मुलें, मग तीं बालसंस्थांत असोत वा नसोत, आणि त्यांच्या आयांना, योग्य सल्ला देण्यासाठीं माता–बालक संरक्षणसंस्था ( *Institutes for the Protection of Mother & Child* ) ठिकठिकाणीं उघडण्यांत आल्या आहेत; आणि या सर्वांवर देखरेख करून त्यांना मार्गदर्शन करण्यासाठीं मॉस्कोमध्यें एक मध्यवर्ति संस्था आहे. लहान मुलांसाठीं खास आरोग्यकेंद्रें ( *Children's Polyclinics* ) चालविण्यांत आलेलीं आहेत. मॉस्कोमधील प्रमुख आरोग्यकेंद्रांत ७० वैद्यकीय तज्ज्ञ काम करतात व दररोज पांचसहाशें मुलें वैद्यकीय सल्ला घेण्यासाठीं तेथें येतात. आजारी मुलांना योग्य औषधोपचार करण्यांत येऊन जरूर भासल्यास त्यांना हवेच्या ठिकाणीं पाठविण्यांत येतें. मुलांच्या करमणुकीसाठी जागोजाग क्लब, लाल कोने ( *Red Corners* ), बालकमंदिरें ( *Children's Palaces* ) आहेत. निराश्रित मुलांसाठीं वरीलप्रमाणें कायमचीं व्यवस्था असलेलीं शिशुगृहें व बालोद्यान संस्था सरकारनें उघडलेल्या आहेत.

*उत्तम रीतीनें संगोपन होणें हा सोविएत मुलांचा जन्मसिद्ध हक्क*

समजला जातो, आणि म्हणून भावी पिढीची सोय प्रथम पाहिली पाहिजे हें तत्त्व सोविएत यूनियनमध्यें कसोशीनें पाळलें जातें. बालसंस्था हें या हक्काच्या अंमलबजावणीचें प्रमुख साधन आहे यांत शंका नाहीं.

*

*

## सोविएत शाळा, प्राथमिक व दुय्यम शिक्षण ४

सोविएत युनियनमध्यें प्राथमिक शिक्षणाला वयाच्या आठव्या वर्षी (१९४४ सालापासून सातव्या वर्षी) सुरुवात होते. प्राथमिक शिक्षणाला सुरुवात होण्यापूर्वी मुलाला वाचन, लेखन आणि थोडीशी उजळणी शिकवलेली असते. जीं मुलें किंडरगार्टन, नर्सरी शाळा इत्यादि बालसंस्थांतून प्राथमिक शाळेंत येतात त्यांना हे विषय बालसंस्थांना जोडलेल्या बालवर्गांत शिकविलेले असतात. पुष्कळ मुलें घरींच वाचन शिकतात. रशियन लिपि आणि सोविएत देशांतील इतर अनेक भाषांच्या लिपी मराठी लिपीप्रमाणें उच्चारानुसारी असल्यामुळें, एकदां लिपि समजली, कीं मुलें स्वतांच भराभर पुस्तकें वाचूं शकतात. ज्या मुलांचें बालवर्गाचें शिक्षण झालेलें नसेल त्यांच्याकरतां प्राथमिक शाळेला जोडून बालवर्गाची सोय केलेली असते.

आठ वर्षांपासून बारा वर्षांपर्यंत चार वर्षांचा प्राथमिक अभ्यासक्रम झाल्यावर सर्व मुलें आणखी तीन वर्षांचें दुय्यम शिक्षण घेतात. हें सात वर्षांचें शिक्षण सक्तीचें व मोफत आहे. हें संपल्यावर मगच धंदेशिक्षण अथवा व्यवसायशिक्षण घेतां येतें. कांहीं लायक मुलें आणखी तीन वर्षांचें वरिष्ठ दर्जाचें दुय्यम शिक्षण घेतात आणि त्यानंतर धंदेशिक्षणाकडे अथवा उच्च शिक्षणाकडे वळतात. प्राथमिक चार वर्षें व दुय्यम तीन वर्षें असें सात वर्षांचें शिक्षण ज्या शाळेंत देण्यांत येतें तिला सप्तवार्षिक

शाळा असें म्हणतात. यांपैकीं कांहीं शाळांना वरिष्ठ दुय्यम शिक्षणाचे आणखी तीन वर्ग जोडलेले असतात; त्यांना दशवार्षिक शाळा असें नांव आहे. सोविएत युनियन-मधील सर्वसामान्य शिक्षणाची मूलभूत संस्था म्हणजे सप्तवार्षिक अथवा दशवार्षिक शाळा आहे. या प्रकरणांत अशा शाळांचा विचार करण्याचें योजिलें आहे.

शाळेचा चालकवर्ग तीन प्रकारचा असतो. प्रिन्सिपॉल, सुपरवायझर वगैरे अधिकारी-वर्ग, शिक्षक व शिक्षिका, आणि डॉक्टर, नर्स, सैंपाकी, झाडूवाली वगैरे शिक्षणाशीं प्रत्यक्ष संबंध नसलेला नोकरवर्ग. शाळेविषयीं कोणताही सर्वसाधारण प्रश्न निघाल्यास त्याचा निर्णय या सर्वांच्या अनुमतीनें घेण्यांत येतो. शाळेविषयींची मुख्य जबाबदारी अर्थातच प्रिन्सिपॉल व सुपरवायझर यांच्यावर असते. परंतु त्यांचें काम केवळ देखरेख करण्याचें नाहीं. शिक्षणक्षेत्रांतील आपल्या अनुभवाचा व ज्ञानाचा सर्वांस फायदा देऊन त्यांच्या सहकार्यानें शाळेंतील शिक्षणाचा दर्जा वाढविणें हेंच खरोखरी त्यांचें काम असतें. शाळेच्या चालकवर्गांत स्त्रिया व पुरुष दोन्हीही असतात आणि दिवसेंदिवस शिक्षिकांचें प्रमाण वाढत आहे.

•

शालेय वर्षाला १ सप्टेंबरला आरंभ होऊन २० मे अथवा १ जूनला वर्ष संपतें. यानंतर तीन महिने उन्हाळ्याची मोठी सुट्टी असते. मध्यंतरीं तीन छोट्या सुट्ट्या असतात. शालेय आठवडा शहरांमध्यें सहा दिवसांचा असतो; म्हणजे पांच दिवस शाळा व सहाव्या दिवशीं सुट्टी. खेडेगांवांत आठवडा सात दिवसांचा असतो. ४५ मिनिटांचा एक तास असे दररोज पांच ते सात तास शिकविण्यांत येतें. कित्येक ठिकाणीं इमारतींची अद्यापही वाण असल्यामुळें दुवक्त पद्धति चालू आहे. सकाळीं ८ ते दुपारीं १॥ पर्यंत प्राथमिक वर्ग चालतात व दुपारीं १॥ नंतर त्याच इमारतींत दुय्यम शाळा भरते.

ज्या ठिकाणीं दुवक्त पद्धति चालू नाहीं, तेथें सकाळीं न्याहरी आटपून मुलें शाळेला येतात. दुपारच्या सुट्टींत बहुतेक मुलें शाळेंतच जेवण घेतात. शाळा अल्पखर्चांत जेवण पुरविते; कित्येकांना जेवण मोफत मिळतें. जेवण पथ्यकर, कसदार व रुचकर असावें याची काळजी शाळेची डॉक्टरीण घेते. शाळा घरापासून लांब असल्यास ( खेडेगांवांत पुष्कळ शाळांच्या बाबतींत ही परिस्थिति असते ) मुलांना नेण्याआणण्याची व्यवस्था केलेली असते.

ज्या ज्या ठिकाणीं शाळकरी वयाचीं पुरेशीं मुलें असतील त्या त्या ठिकाणीं शाळा उघडलीच पाहिजे असा नियम आहे. खेडेगांवांत दोनचार खेडीं मिळून दुय्यम शिक्षणासाठीं एक शाळा उघडण्यांत येते, आणि तेथें मुलांना नेण्याआणण्याची व्यवस्था करणें हें त्या ठिकाणच्या उद्योगकेंद्राचें (कारखाना अगर सामुदायिक शेत) आवश्यक कर्तव्य समजण्यांत येतें. लोकवस्ती अतिशय विरळ असेल त्या प्रदेशांत शाळांना जोडून वसतिगृहाची सोय करण्यांत येते. शहरांतील शाळांत मुलांची संख्या अर्थातच खूप मोठी असते. मॉस्कोमध्यें गेल्या आठदहा वर्षांत हजार बाराशें मुलांच्या पांचशें नमुनेदार शाळा उघडण्यांत आल्या आहेत. या शाळांची सजावट आणि साधनसामुग्री यांचें वर्णन पुढें दिलें आहे. सर्व शाळा (खेडेगांवांतीलसुद्धां) शक्य तितक्या लवकर या नमुनेदार शाळांइतक्या सुसज्ज व्हाव्यात या हेतूनें जोराचे प्रयत्न चालू आहेत.

शाळेचीं सर्व दालनें भव्य, विस्तृत, सुप्रकाशित व हवाशीर असावीं अशा तऱ्हेनें शाळेची इमारत बांधली जाते. हिंवाळ्यांत सर्व दालनें उबदार करण्याची सोय असते. प्रत्येक शाळेंत विज्ञानशाळा, रसायनशाळा, एक सुसज्ज वर्कशॉप आणि प्राणिशास्त्रशाळा, (*Biological Laboratory*) असतात. याशिवाय एक खोली खास 'निसर्ग-दालन' (*Nature Corner*) म्हणून राखून ठेवलेली असते. या खोलींत पशु, पक्षी व मासे पाळलेले असतात; तसेंच झाडांच्या कांहीं कुंड्याही असतात. शहरी शाळांनाही सृष्टिनिरीक्षणासाठीं एक लहानसा जमिनीचा तुकडा तोडून दिलेला असतो. जीवशास्त्र व वनस्पतिशास्त्र यांमध्यें शिकविल्या जाणाऱ्या सिद्धांताचें प्रात्यक्षिक ज्ञान करून देण्याला या दोन्ही गोष्टींचा फार उपयोग होतो.

कलाशिक्षणासाठीं निराळीं दालनें असून तेथें संगीत, चित्रकला इत्यादि कला शिकविण्याचीं साधनें असतात. व्यायामासाठीं अद्यावत् व्यायामसाधनांनीं युक्त अशी व्यायामशाळा असून, कवाईत व खेळ यासाठीं मोकळें क्रीडांगण असतें.

प्रत्येक शाळेला एक सुंदर सभागृह असून त्यामध्यें नाटक किंवा इतर करमणुकीच्या कार्यक्रमासाठीं रंगभूमि सजविलेली असते. सभागृहांमध्यें सिनेमा आणि मॅजिक लँटर्न दाखविण्याची सोय केलेली असते. शाळेचें ग्रंथालय आणि वाचनमंदिर चित्तवेधक रीतीनें सुशोभित केलेलीं असतात; आणि वाचनाची आवड उत्पन्न व्हावी

या उद्देशानें हरतऱ्हेचे प्रयत्न करण्यांत येतात. ग्रंथालयांत पुस्तकांचा विपुल पुरवठा असतो आणि सर्व दैनिक वर्तमानपत्रें आणि यंत्रविद्या व इतर विषयांवरील मासिकें वाचनमंदिरांत ठेवलेलीं असतात. शिक्षकांच्या मदतीनें मुलांना वाङ्मयाची गोडी लावणें हें वाचनमंदिराच्या चालकाचें ( *Librarian* ) मुख्य कर्तव्य असतें.

पहिल्या सात इयत्तांमध्यें प्रत्येक वर्गांतील मुलांची संख्या बेचाळीसहून अधिक नसावी असा कटाक्ष आहे; आणि पुढील तीन इयत्तांच्या वर्गांत ही संख्या तीसहून अधिक नसते. कांहीं ठिकाणीं इमारती व शिक्षक यांच्या तुटवड्यामुळें अद्यापही याहून मोठे वर्ग असतात, परंतु ते मर्यादित करण्याचे प्रयत्न सारखे चालू आहेत. प्राथमिक शिक्षणाच्या वर्गांत, म्हणजे पहिल्या चार इयत्तांमध्यें, एकच शिक्षक एका वर्गाचे सारे विषय शिकवितो. पुढें मात्र निरनिराळे विषय त्या त्या विषयांतील तज्ज्ञ शिक्षक घेतात.

शाळेंत कोणते विषय शिकवितात ? आणि त्यांचा अभ्यासक्रम कसा असतो ?

प्रथम एक गोष्ट नमूद केली पाहिजे. सोविएत यूनियनमध्यें सर्वत्र एकच अभ्यासक्रम अनुसरला जातो. प्रादेशिक गरजांप्रमाणें फरक होतो, पण तो फारच थोडा. एखाद्या विषयाचे विशिष्ट इयत्तेंत किती तास घ्यावयाचे हेंही ठरलेलें असतें. प्रत्येक विषयाचीं अनेक क्रमिक पुस्तकें असतात; त्यांमधून कोणतेंही निवडावें. विषयांची व त्यांमधील अभ्यासक्रमांची बिनचूक कल्पना देणें मात्र कठीण आहे. कारण हीं दोन्ही वेळोवेळीं बदलत गेलीं आहेत. दशवार्षिक अभ्यासक्रमांत ऐच्छिक विषय नाहींत, सर्व विषय आवश्यक आहेत. एवढ्या लहान विद्यार्थ्यांना ऐच्छिक विषयांची योग्य निवड करतां येणार नाहीं हें कारण याच्या मुळाशीं आहे.

स्थूल मानानें दशवार्षिक अभ्यासक्रमांत पुढील विषय शिकविले जातात. प्राथमिक चार इयत्तांमध्यें रशियन किंवा मातृभाषा, अंकगणित, लेखन, इतिहास, भूगोल, चित्रकला, संगीत, शारीरिक शिक्षण आणि सृष्टिज्ञान हे विषय शिकविले जातात. दुय्यम शाळेंत पूर्वीच्या कांहीं विषयांबरोबर इंग्रजी, फ्रेंच, जर्मन ( अलीकडे चिनीसुद्धां ) यांपैकीं एक परकीय भाषा, बीजगणित, भूमिति, विज्ञान आणि रसायन, वनस्पति व प्राणिशास्त्र हे नवीन विषय घेण्यांत येतात. सृष्टिज्ञान हा विषय कमी

करण्यांत येतो. तसेंच समाजशास्त्र आणि लष्करी शिक्षण हे विषय त्र्याच्या चौदा-पंधराव्या वर्षापासून शिकविले जातात. ज्यांची मातृभाषा रशियन नसेल त्यांना यावेळीं रशियन भाषाही दुय्यम भाषा म्हणून शिकविण्यांत येते. वरिष्ठ दुय्यम शिक्षणक्रमांत पूर्वीच्या इयत्तांतील अंकगणित, संगीत, कला इत्यादि विषय गाळण्यांत येऊन समाजशास्त्र, लष्करी शिक्षण, ख-ज्योतिष ( *Astronomy* ) यांचा समावेश करण्यांत येतो. या प्रकरणाच्या शेवटीं कांहीं विषयांच्या अभ्यासक्रमांची थोडीशी कल्पना देण्याचा प्रयत्न केला आहे. एक गोष्ट मात्र येथें उल्लेखिली पाहिजे. प्रत्येक इयत्तेचा अभ्यासक्रम अशा रीतीनें ठरविलेला असतो कीं साधारण बुद्धीच्या मुलाला तो सहज आत्मसात् करतां यावा.

दैनंदिन वेळापत्रक ठरवितांना कठीण विषयांना पहिले तास दिलेले असून सोप्या विषयांचे तास शेवटीं शेवटीं ठेवलेले असतात. तसेंच वेळापत्रक बनवितांना शिक्षकांच्या सोयी गैरसोयींचा विचार न करतां शैक्षणिक दृष्टया मुलांना कोणता क्रम अधिक उपयुक्त आहे याचा विचार प्रथम केला जातो.

थोडयाफार फरकानें सर्व शाळांत अभ्यास शिकविण्याची पद्धति एकाच नमुन्याची असते. परंतु त्या मर्यादेंत राहून कोणाही शिक्षकाला स्वतांच्या कल्पना व योजना पडताळून पाहाण्याला पूर्ण मुभा असते. विषयांतील कोणत्याही नवीन विभागाचा प्रारंभ करावयाचा झाला, कीं शिक्षक प्रथम त्याविषयीं विस्तृत माहिती देतो. त्या-नंतरच्या तासाला मुलें स्पष्टीकरणार्थ एकमेकांना प्रश्न विचारतात, आणि उत्तरें देतात; यावेळीं शिक्षकाचें काम फक्त विचारल्यास अधिक माहिती देण्याचें असतें. मग विद्यार्थी व्यक्तिशः पुस्तकांच्या मदतीनें स्वतंत्रपणें त्या विषयासंबंधीं ज्ञान मिळविण्याचा प्रयत्न करतात. ग्रंथालयांत व घरीं स्वतां पुस्तकें पाहून पुस्तकांतून माहिती काढण्याचा मुलांना सराव व्हावा असे प्रयत्न नेहमीं केले जातात. शेवटीं विषयाच्या या विभागाबद्दल प्रश्न विचारून मुलांना तो पूर्णपणें समजला आहे याविषयीं शिक्षक स्वतांची खात्री करून घेतो. या चांचणीच्या वेळीं प्रत्येक मुलाला उत्तर देण्याची संधि मिळाली पाहिजे. सोविएत विद्यार्थी कोणताही विषय समजून घेतांना कितीतरी प्रश्नोत्तरें व वादविवाद करतात असा अनुभव आहे! या सर्व कार्यक्रमांत शिक्षकानें विद्यार्थ्यांकडे

वैयक्तिक लक्ष पुरवावयाचें असून त्याची प्रगति होत आहे याबद्दल स्वतांची खात्री करून घ्यावयाची असते.

कोणताही विषय चित्तवेधक करण्यासाठीं सर्व प्रकारची साधनसामुग्री शाळेला पुरविण्यांत आलेली असते. चित्रें, वस्तु ( *models* ), फोटो, नकाशे, आराखडे यांची मदत विपुल प्रमाणांत घेण्यांत येते. धडे शिकवितांना मॅजिक लॅंटर्न आणि सिनेमा यांचाही उपयोग करण्यांत येतो. सिनेमाच्या साहाय्यानें शिकविण्यांत येणारा धडा सामान्यपणें पंधरा ते वीस मिनिटांचा असतो. याकरितां लागणारे चित्रपट खास तयार केलेले असून आतां मॉस्को व इतर मोठ्या शहरांत ग्रंथालयां-प्रमाणें चित्रपट संग्रहालयें चालविण्यांत आलीं आहेत. शाळेला जरूरी असेल त्याप्रमाणें व त्यावेळीं, तेथून त्या त्या धड्याचे चित्रपट पुरविण्याची व्यवस्था केली जाते. विशेष महत्त्वाचे शैक्षणिक चित्रपट शाळेच्या मालकीचे असतात. सोविएत शाळांमधील साधनें व उपकरणें यांची विपुलता व विविधता जगांत इतरत्र कोठेंही आढळून येत नाहीं असें कित्येक शिक्षणतज्ज्ञांचें म्हणणें आहे. या अद्यावत् साधनांनीं सुसज्ज अशा शाळेंत शिकविणाऱ्या सोविएत शिक्षकांचा कोणाही हिंदी शिक्षकाला हेवा वाटेल यांत शंका नाहीं !

भाषा शिकवितांना हेतु हा असतो कीं, विद्यार्थ्यांना सहज रीत्या चांगलें बोलतां व लिहितां यावें. प्रत्येकाला आपले विचार असंदिग्धपणें, बिनचूक व उत्तम भाषेंत व्यक्त करतां आले पाहिजेत. लेखनामध्यें व्याकरण आणि वाङ्मयीन गुण यांना महत्त्व देण्यांत येतें. त्या त्या भाषेंतील उत्तमोत्तम साहित्याचा परिचय होऊन विद्यार्थ्यांमध्यें वाङ्मयाची आवड खरोखरी उपन्न व्हावी हाही भाषा शिकवितांना दुसरा उद्देश असतो.

अगदीं आरंभापासून सृष्टिज्ञान शिक्षणाच्या योगानें मुलांच्या मनावर शास्त्रीय दृष्टि-कोन बिंबविला जातो. शास्त्रीय सिद्धांत समजावून सांगतांना त्यांचे व्यवहारांतील प्रत्यक्ष उपयोग पदोपदीं उदाहरणादाखल सांगण्यांत येतात.

आपल्याभोंवतीं घडणाऱ्या सृष्टींतील घटना कां व कशा घडतात याविषयीं शास्त्रीय कुतूहल जागृत करण्यांत येऊन, निसर्गशक्तीवर मात करून जीवन समृद्ध

करण्यासाठीं, शास्त्रीय ज्ञानाची कशी जरूरी आहे हें पटवून देण्यांत येतें. सोविएत देशांत व जगांत इतरत्र कोणते नवीन यांत्रिक व इतर शास्त्रीय शोध लागत आहेत व त्यांचा व्यावहारिक जीवनावर काय परिणाम होणार आहे याची माहिती शास्त्रीय शिक्षणाच्या अनुरोधानें मुलांना मिळावी असा कटाक्ष ठेवण्यांत येतो. या सर्व गोष्टींसाठीं प्रयोगशाळा, निसर्गविभाग आणि शास्त्रीय मासिकें यांचा सर्व प्रकारें उपयोग करून घेण्यांत येतो. मानवसमाजाचा विकास कसकसा होत आला व समाजाचें सध्यांचें स्वरूप काय आहे याची नीट कल्पना इतिहासावरून दिली जाते. सध्यांच्या जागतिक घटनांचें महत्त्व समजण्यास त्यामुळें मदत होते. देशांतील आर्थिक व्यवस्था, संपत्ति-उत्पादनाचे निरनिराळे प्रकार, त्यांचे परस्पर संबंध, व्यक्तीचें समाजांतील स्थान इत्यादि गोष्टी समाजशास्त्राच्या अभ्यासाच्या योगानें विद्यार्थ्यांना अवगत होतात. प्रत्येक विषयाचा जीवनाशीं असलेला घनिष्ठ संबंध अशा रीतीनें विशद केला जात असल्यामुळें ज्ञान केवळ पुस्तकी राहात नाहीं, आणि विद्यार्थी समाजाला पारखा होत नाहीं. सोविएत मुलांचें समाजाविषयींचें, जगाविषयींचें व इतर व्यावहारिक ज्ञान अद्यावत् असतें असा अनुभव आहे. अशा विद्यार्थ्यांची जिज्ञासा तृप्त करण्यासाठीं शिक्षकवर्गालाही अद्यावत् ज्ञान असावें लागतें ही गोष्ट निराळी सांगण्याची अर्थातच गरज नाहीं.

या सर्व गोष्टींना अनुरूप असें शिक्षणाचें आणखी एक प्रभावी साधन आहे व त्याचा सोविएत शाळांत उपयोग केला जातो. प्रत्येक वर्गाची शाळेच्या खर्चानें नियमितपणें सफर निघते व शिक्षकाच्या मार्गदर्शनाखालीं मुलें चित्रप्रदर्शनें, अजबखाने, प्राणिसंग्रहालयें इत्यादि ठिकाणें पाहाण्यास जातात. या ठिकाणीं जाण्याचा उद्देश मनोरंजन होतां होतां ज्ञान मिळणें असा असतो. कित्येकदां भोंवतालच्या प्रदेशांतील कारखाने, सामुदायिक शेतें अथवा दुसरीं महत्त्वाचीं उद्योगकेंद्रें यांना भेट देण्यासाठीं या सफरी काढलेल्या असतात. हीं उद्योगकेंद्रें पाहिल्यानें शास्त्रीय ज्ञानाचीं व्यवहारांतील प्रात्यक्षिकें तर अनुभवास येतातच, शिवाय मानवी श्रमांचें जीवनांतील महत्त्व मुलांना लहानपणापासून कळूं लागतें. या सफरीमुळें विद्यार्थ्यांचें मन किती रुंदावत असेल याची कल्पना कोणालाहि सहज करतां येईल.

सोविएत शाळांची परीक्षापद्धति कशी असते ? प्रत्येक वर्गाचा ठराविक अभ्यासक्रम वर्षाच्या शेवटीं चांगल्या रीतीनें पुरा केलेला असला पाहिजे. वर्गांतील मुलांची

त्या त्या विषयांत सामान्यपणें अपेक्षित प्रगति झाली कीं नाहीं हें अजमावण्याचें काम वर्गशिक्षक आणि सुपरव्हायझर व प्रिन्सिपॉल यांचें असतें. वर्गात चालू असलेल्या धड्याच्या शेवटच्या तासाला शिक्षक प्रश्नोत्तररूपानें मुलांच्या ज्ञानाची चांचणी घेतो व प्रत्येक विद्यार्थ्याला *अत्युत्तम, उत्तम, समाधानकारक, वाईट* व *अतिवाईट* या पांचांमधील योग्य ते गुण देतो. यामधील शेवटचे दोन गुण नापास ठरल्याचे निदर्शक आहेत. जीं मुलें मागें पडत असतील, त्यांच्यावर शिक्षकानें विशेष मेहनत घ्यावयाची असते. पहिल्या चार इयत्तांमध्यें वार्षिक परीक्षाच नसते. वर्षभर वेळोवेळीं मिळालेल्या या गुणांवरून विद्यार्थ्यानें अपेक्षित अभ्यासक्रम समाधानकारकपणें पार पाडला आहे किंवा नाहीं हें ठरविण्यांत येतें; आणि ज्यांची प्रगति समाधानकारक असेल त्यांस पुढील वर्गात घालण्यांत येतें. पांचवी, सहावी या इयत्तांमध्यें वर्षभरांत मिळविलेल्या या गुणांबरोबर वार्षिक परीक्षेचे गुणही ध्यानांत घेतले जातात. गणित व भाषा हे विषय सोडून इतर विषयांत फक्त तोंडी परीक्षा असते. परीक्षेच्या पूर्वी एकदोन आठवडे त्या त्या विषयाच्या अभ्यासक्रमाचे विभाग पाडून ते प्रश्नरूपानें वर्गाच्या फलकावर लावले जातात. परीक्षेच्या दिवशीं मुलें नेहमींप्रमाणें वर्गात जातात आणि वरील प्रश्न लिहिलेल्या चिठ्यांमधून एक चिठ्ठी उचलून एकेक विद्यार्थी सर्व वर्गाच्या समोर त्या प्रश्नाचें तोंडी उत्तर देतो. उत्तर विस्तृत व सांगोपांग असावें अशी अपेक्षा असते. एखादा प्रश्न बराच अवघड असल्यास पुन्हा संधि देण्यांत येते.

जीं मुलें परीक्षेच्या वेळीं घाबरणारीं असतील त्यांच्या कलानें घेऊन त्यांची परीक्षा घेण्यांत येते. अडविण्याच्या दृष्टीनें प्रश्न विचारलेले नसतात. मुलांना त्या विषयाचें खरोखरी किती ज्ञान आहे हें नीट अजमावण्याच्या उद्देशानें प्रश्न विचारण्यांत येतात. परीक्षेचें वातावरण शक्य तितकें कमी त्रासदायक व कमी भीतिदायक करण्याविषयीं दक्षता घेतली जाते. मुलांना परीक्षेचा अकारण बाऊ वाटतां कामा नये. याच हेतूनें दर दिवशीं एक परीक्षा ठेवलेली असते. तसेंच कोणत्याही वर्गाची तोंडी परीक्षा एका वेळीं सतत पाऊण तासाहून अधिक वेळ घ्यावयाची नाहीं. प्रिन्सिपॉल किंवा सुपरव्हायझर, वर्गशिक्षक आणि दुसरा एखादा वर्गशिक्षक या तिघांची परीक्षासमिति असते व सर्व वर्गांची परीक्षा आटोपली कीं लागलीच ही समिति परीक्षेचा निकाल जाहीर करते. यायोगें मागाहून अनिश्चित काळपावेतों मनावर परीक्षेचें दडपण राहात नाहीं.

सामान्यतः सर्व मुलें पुढच्या वर्गात जावीं अशी अपेक्षा असते; आणि याविषयीं मुख्य जबाबदारी वर्गशिक्षकावर असते. मुलांची अपेक्षित प्रगति साध्य होण्यासाठीं शिक्षकाला हवी असेल ती सर्व मदत मिळते. एखादा विद्यार्थी मागें पडत असल्यास त्याचें कारण बारकाईनें शोधण्यांत येऊन त्यावर तात्काळ उपाय करण्यांत येतो. शाळेंतील कार्यक्रमांत अथवा शिक्षकाच्या शिकविण्यांत कोणताही दोष नाहीं अशी खात्री झाल्यावर मग त्या मुलाच्या घरच्या वातावरणाची चौकशी केली जाते. घरीं गेल्यावर तो काय करतो, पालक मुलाच्या अभ्यासाकडे लक्ष पुरवितात कीं नाहीं, मुलाचे मित्र कोण, या सर्व गोष्टींचा काळजीपूर्वक छडा लावून योग्य कारण आढळून येतांच त्यावर उपाययोजना होते. आईबापांचें मुलांकडे नीट लक्ष नसल्यास त्यांच्या उद्योगकेंद्राकडून व कामगार संघाकडून त्यांच्यावर दडपण आणण्यांत येऊन त्यांना मुलाच्या अभ्यासाकडे लक्ष देण्यास भाग पाडलें जातें.

वर्गामध्यें मुलांना योग्य गुण देणें व परीक्षा घेणें यांमध्यें शिक्षकांनीं ढिलाई अथवा फार कडकपणा दाखवितां कामा नये. तसें झाल्यास त्या शिक्षकाचें त्याच्या चुकीकडे लक्ष वेधण्यांत येऊन ती दुरुस्त करण्याची सूचना केली जाते. वर्षाच्या शेवटीं फारच थोडीं मुलें ( शेंकडा दहा टक्क्यांहूनहि कमी ) नापास होतात असा अनुभव आहे.

सर्वसामान्यपणें ज्याला बौद्धिक शिक्षण असें नांव आहे तें शिक्षण दिलें कीं आपलें कार्य झालें असें सोविएत शाळा बिलकूल मानीत नाहीं. विद्यार्थ्यांच्या सर्वांगीण विकासासाठीं बौद्धिक शिक्षणाबरोबर सांस्कृतिक व शारीरिक शिक्षणाची भरपूर तजवीज केलेली असते. विद्यार्थी हा पुढें सुसंस्कृत नागरिक बनावयाचा आहे ही गोष्ट डोळ्यापुढें ठेवून अगदीं पहिल्यापासून शाळेंतील शिक्षणांत संगीत, चित्रकला, इत्यादि कलांच्या शिक्षणाची व्यवस्था करण्यांत येते. नृत्य व अभिनय यांचेंहि प्राथमिक शिक्षण येथें मिळतें. अगदीं वरच्या वर्गांत प्रत्यक्ष अभ्यासक्रमांत कलाविषयांचा समावेश नसला तरी अभ्यासक्रमाबाहेरील शिक्षणांत त्यांना महत्त्वाचें स्थान दिलेलें आहे. संगीत व कला यांच्या प्रात्यक्षिक शिक्षणाबरोबरच त्यांचें शास्त्रहि शिकविण्यांत येतें आणि त्या त्या कलेंतील थोर कलावंतांचा व त्यांच्या

कलाकृतींचा परिचय करून देण्यांत येतो. या कामीं चित्रमंदिरें, रंगभूमि, जलसे यांना प्रत्यक्ष भेट देऊन त्यांचा उपयोग केला जातो.

मुलांची वाढ नीट होऊन शरीर बळकट बनावें यासाठीं शारीरिक शिक्षणाची अतिशय आवश्यकता असते. वेळापत्रकांत कवाईत व व्यायाम यांचे ठरलेले तास असतात व त्यांचा उद्देश व्यायाम आणि खेळ यांची आवड मुलांमध्यें निर्माण करण्याचा असतो. याबरोबरच आरोग्य व स्वच्छता यांचें शिक्षण दिलें जातें. प्राथमिक शिक्षणाच्या पहिल्या तीन वर्षांतील अभ्यासक्रमावरून शिक्षणाच्या या बाजूची कल्पना करतां येईल.

इयत्ता पहिली

शरीराची स्वच्छता व निगा राखणें; अन्न, झोंप, व्यायाम व खेळ यांचें महत्त्व; इमारतींमधील स्वच्छता; मनुष्य आजारी कां पडतो ?

इयत्ता दुसरी

घर स्वच्छ कसें राखावें ? सामायिक सैंपाकघर व जेवणघर कसें असावें ? उन्हाळ्यांत व हिंवाळ्यांत कोणते खेळ खेळावे ? कसे खेळावे ? पाणीपुरवठा व तो स्वच्छ राखण्याचें महत्त्व.

इयत्ता तिसरी

शाळेंत व शाळेबाहेर आरोग्याचे कोणते नियम पाळणें आवश्यक असतें ? कोणत्या संवयी अंगीं बाणल्यानें विश्रांतीचा पुरेपूर फायदा मिळतो ? निरनिराळे सांथीचे आजार व इतर आजार यांची माहिती.

शरीरशास्त्राचें ज्ञान देतांना शरीराचे निरनिराळे अवयव, त्यांचें कार्य आणि ते निरोगी ठेवण्यासाठीं अवश्य असलेली दक्षता यांवर भर दिला जातो. लैंगिक ज्ञानासाठीं निराळा अभ्यासक्रम नसतो. मानवी शरीरशास्त्र, प्राणिशास्त्र आणि सुप्रजाजननाचें महत्त्व या विषयांच्या अनुरोधानें लिंगविषयक शास्त्रीय ज्ञान देण्यांत येतें.

शाळेच्या चालकवर्गांत डॉक्टरीणबाई व नर्स यांचें स्थान फार महत्त्वाचें आहे. दवाखाना सर्व साधनांनीं सज्ज असून प्रत्येक मुलाविषयींची सर्व वैद्यकीय माहिती तेथें नोंदलेली असते. शाळेच्या अंतर्बाह्य स्वच्छतेबद्दल डॉक्टर व नर्स जबाबदार असतात; आणि वर्गावर्गांमधील स्वच्छता उत्तम राखण्यासाठीं त्या त्या वर्गांतील कांहीं मुलें त्यांस मदत करतात. डॉक्टरीणबाईंना मुलांमध्यें विलक्षण मान असतो. कांहीं दुखलेंखुपलें किंवा खरचटलें कीं मुलें तिच्याकडे जाऊन लागलीच औषधोपचार करून घेतात. तावडतोब इलाज झाल्यानें संभाव्य गंभीर दुखणें टळतें. वेळींच काळजी घेतल्यामुळें कित्येकदां सांथीचा प्रसार मुळांतच खुंटल्याचीं अनेक उदाहरणें दाखवितां येतील. विशेष आजारी असलेल्या मुलांना तावडतोब तज्ज्ञ डॉक्टरकडे पाठविण्यांत येऊन त्यांची इस्पितळांत सोय केली जाते. ज्या मुलांना हवेच्या ठिकाणीं जाऊन राहाण्याची अथवा विशेष औषधोपचाराची जरूरी असेल त्यांची तशी व्यवस्था लागलीच करण्यांत येते.

*शक्य असतील ते प्रयत्न करून आजार टाळला पाहिजे; परंतु इतकेंही करून आजारी पडल्यास उत्तमांत उत्तम उपचार झाला पाहिजे हा दंडक विद्यार्थ्यांच्या आरोग्यरक्षणाविषयीं नेहमीं पाळण्यांत येतो.*

शारीरिक शिक्षणाबरोबरच लष्करी शिक्षणाच्या पूर्वतयारीची सोय करून दिली जाते. सातव्या इयत्तेंत ( वय चौदा–पंधरा ) लष्करी शिक्षण हा विषय *आवश्यक आहे.* युद्धकालांत त्याचें महत्त्व अधिकच वाढलें होतें हें सांगणें नकोच.

विद्यार्थ्यांचा सर्वांगीण विकास व्हावयाचा असेल तर केवळ शारीरिक व बौद्धिक शिक्षण देऊन भागत नाहीं. याबरोबर विद्यार्थ्यांचा मानसिक विकास होऊन तो खंबीर स्वभावाचा उत्तम सोविएत नागरिक बनला पाहिजे. यासाठीं धैर्य, सहिष्णुता, निग्रह, कर्तव्यतत्परता, शिस्त, आणि प्रसंगावधान हे गुण त्यांच्या अंगीं बाणले पाहिजेत. लहानपणापासून सोविएत देश व समाज यांचीं वैशिष्ट्यें त्यांच्या डोळ्यांसमोर ठेवलेलीं असतात. सोविएत देशांतील निरनिराळ्या क्षेत्रांत विशेष नांवलौकिक मिळविलेल्या प्रसिद्ध व्यक्ति शाळांना वारंवार भेट देतात. यामुळें लहानपणापासून मुलांना देशाभिमानाचें बाळकडू मिळतें. *परंतु स्वदेशाविषयीं अभिमानाबरोबर इतर राष्ट्रांचें स्वातंत्र्य व समानत्व आणि जगांतील सर्व लोकांविषयीं*

*बंधुभाव* या कल्पना त्यांच्या मनावर प्रथमपासून ठसविलेल्या असतात. वर्गांत व वर्गाबाहेर शिक्षकांनीं मुलांच्या अंगीं वरील गुणाचा परिपोष होण्यासाठीं हरप्रयत्न केले पाहिजेत अशी अपेक्षा असते. ठराविक धडे शिकविणें एवढेंच त्यांचें काम नसून शिकवितांना विद्यार्थ्यांचा स्वभाव घडविण्याची जबाबदारीहि त्यांच्यावर असते.

विद्यार्थ्यांची वर्तणूक कशी असावी याबद्दल नियम घालून देण्यांत आले आहेत. १९४३ सालापासून अंमलांत आलेले नवीन नियम वीस असून त्यांपैकीं कांहीं नियम शाळेंतील वर्तणूक, अभ्यास, नियमितपणा यांविषयीं आहेत. इतर नियम शाळेबाहेरील जीवनाविषयीं असून उदाहरणादाखल दोन नियम पुढें दिले आहेत.

नियम १९

वडिलांचा मान राखावा. लहान मुलें, अशक्त, आजारी व वृद्ध मनुष्यें यांच्याशीं सहानुभूतीनें वागावें. ट्रॅम, बस, आगगाडी यांमध्यें त्यांना प्रथम जागा द्यावी, आणि त्यांस सर्वत्र शक्य ती सर्व मदत करावी.

नियम २०

आपली शाळा व वर्ग यांची इभ्रत स्वतांच्या इभ्रतीप्रमाणें सांभाळली पाहिजे.

*सोविएत शिक्षणाचा विकास*

गेल्या पंचवीस वर्षांत सोविएत देशांत प्राथमिक व दुय्यम शिक्षणाचा विकास कसकसा होत गेला हें पाहाणें उद्बोधक ठरेल. कारण १९१७ सालीं तेथील शिक्षण अत्यंत मागासलेलें होतें ही गोष्ट सर्वश्रुत आहे. प्रथम १९२५ सालीं रशिया व यूक्रेन या सोविएत राष्ट्रांनीं प्राथमिक शिक्षण सक्तीचें व्हावें असा ठराव केला आणि त्यानंतर इतर सोविएत देशांनीं त्यांचें अनुकरण केलें. परंतु १९२९ सालापर्यंत या ठरावाची अंमलबजावणी जारीनें होऊं शकली नाहीं. त्यावेळीं इमारती, उपकरणें, शिक्षकवर्ग यासंबंधींची मोठीच वाण होती. १९२८ सालीं पहिली औद्योगिक योजना

सुरू झाल्यावर मात्र वरील परिस्थितींत झपाट्यानें सुधारणा झाली. या प्रगतीचा वेग किती मोठा होता याची कल्पना पुढील आंकडयांवरून येते.

प्राथमिक शाळांत नवीन प्रविष्ट झालेलीं मुलं.

| साल | संख्या |
|---|---|
| १९३० | ३३ लक्ष |
| १९३१ | ४० ,, |

अखेर १९३३ मध्यें चार वर्षांचें प्राथमिक शिक्षण सर्वत्र अंमलांत आलें. यानंतर दुय्यम शिक्षणाचा प्रश्न हातीं घेण्यांत आला. प्रथम मोठया शहरांत सात वर्षांचें शिक्षण सक्तीचें करण्यांत आलें व हळूहळू त्याचा प्रसार इतरत्र होऊं लागला. १९३७ ते १९४२ या तिसऱ्या पंचवर्षिक योजनेमध्यें सात वर्षांचें शिक्षण सार्वत्रिक व्हावें अशी योजना आंखण्यांत आली होती. क्रांतीनंतरच्या वीस वर्षांतले प्राथमिक व दुय्यम शिक्षणाच्या प्रगतीचे पुढील आंकडे नेत्रवेधक आहेत यांत शंका नाहीं.

१ प्राथमिक व दुय्यम शिक्षण.

| साल | शाळांची संख्या | विद्यार्थीसंख्या | शिक्षकसंख्या |
|---|---|---|---|
| १९१४ | १,०५,५२४ | ७८ लक्ष | २,३१ हजार |
| १९३१ | १,५२,८१३ | १,७६ ,, | ......... |
| १९३८ | १,७१,५७९ | ३,१५ ,, | १०२७ हजार |
| १९३८ चें १९१४ शीं प्रमाण | १·६ पट | ४ पट | ४·४ पट |

२ दुय्यम शिक्षण.

| साल | शाळांची संख्या | विद्यार्थीसंख्या | शिक्षकसंख्या |
|---|---|---|---|
| १९१४ | १९५३ | ६,३५,००० | ४२,८०३ |
| १९३८ | १५,८१० | १,०८,३४,००० | ३७७,३३७ |
| वाढ | ८ पट | १७ पट | ९ पट |

तिसऱ्या पंचवार्षिक योजनेप्रमाणें ( १९३७–४२ ) शहरांत दहा वर्षांचें शिक्षण अंमलांत येणार होतें व नंतर तें खेडोपाडीं पसरणार होतें. ही योजना युद्धकाळांत स्थगित करावी लागली. युद्धोत्तर पुनर्घटनेच्या कार्यक्रमांत दहा वर्षांच्या सार्वत्रिक शिक्षणाची ही संकल्पित योजना कद्चित् आणखी कांहीं काळ लांबणीवर पडेल. परंतु *सर्व मुलांना वयाच्या सातव्या वर्षापासून सतराव्या वर्षापर्यंत, दहा वर्षें, सर्वसाधारण शिक्षण मिळावें.* हा सोविएत शिक्षणाचा अंतिम उद्देश आहे, व तो साध्य होण्यास फार वर्षें लागतील असें वाटत नाहीं.

*अभ्यासक्रमाचीं उदाहरणें.*

शेवटीं सोविएत रशियांतील अभ्यासक्रमाची कल्पना येण्यासाठीं कांहीं विषयाच्या अभ्यासक्रमांतील कांहीं भाग व परीक्षेचे प्रश्न नमुन्यादाखल पुढें दिले आहेत. प्रथम इतिहास या विषयाच्या अभ्यासक्रमाची विशेष माहिती दिली आहे.

१ इतिहास.

इतिहास शिकविण्यास तिसऱ्या इयत्तेंत सुरुवात होते. तिसरी व चौथी ( वय १०–१२ ) या वर्गांत सोविएत देशाचा इतिहास शिकविण्यांत येतो. विषयाला आरंभ इतिहासपूर्व मानवापासून होतो आणि नंतर, रानटी मानव, टोळ्यांनीं राहाणारा मानव, प्राचीन मानवसमूह, रशियांतील प्राचीन राज्यें, रशियन साम्राज्य, झारशाही ते थेट रशियन समाजवादी क्रांति ( *Great October Revolution*

*1917* ) व नंतरचा समाजवादी सोविएत देश या अर्वाचीन इतिहासापर्यंतची नीट कल्पना दिली जाते. पांचव्या इयत्तेंत जगाच्या इतिहासास सुरुवात होऊन तो सातव्या इयत्तेंत संपविण्यांत येतो ( वय १३ ते १५ ). असीरिया, बाबिलोन, हिंदुस्थान, इजिप्त, चीन, ग्रीस आणि रोम येथील प्राचीन संस्कृति; सरंजामदारी युगाचा इतिहास; निरनिराळ्या देशांचा सरंजामशाहीपासून भांडवलशाहीकडे झालेला विकास, त्यांचे परस्परसंबंध व आंतरराष्ट्रीय महत्त्व; साम्राज्यशाही; समाजवादी क्रांति या सर्वांचा समावेश जगाच्या इतिहासांत करण्यांत येतो. जगाच्या इतिहासाचें इतकें विस्तृत आणि तपशीलवार चित्र मिळालेला सोविएत विद्यार्थी सद्यःकालीन जागतिक घडामोडींचें अचूक महत्त्वमापन करूं शकतो यांत नवल तें काय !

२ ग्रीसच्या इतिहासाचा अभ्यासक्रम; इयत्ता ५ ( वय १३ )

*ग्रीस*–प्राचीन ग्रीक संस्कृति; चित्रकला व शिल्पकला यांची प्रगति, ग्रीक युद्धनीति व शस्त्रसाधनें; ऑलिंपिक खेळ.

*स्पार्टा*—राज्यघटना; लिथूर्गसची गोष्ट; जमिनीची सामायिक मालकी आणि सामायिक जेवणघरें; स्पार्टाची सेना व त्यांची शिस्त; हेलॉट ( दास ); दास व किसान यांचीं बंडें.

*ग्रीक संस्कृति*–ग्रीक रंगभूमि; आनंदपर्यवसायी व शोकान्त नाटकें ( *Commedy* & *Tragedy* ) ग्रीक नट; सण व उत्सव; दास्यावर आधारलेली ग्रीक संस्कृति.

३ प्राणिशास्त्र, इयत्ता ७ ( वय १५ )

( *अ* ) *घोडा*, त्याची पूर्वपीठिका व उत्क्रांति. ( *आ* ) *प्राण्यांचा मनुष्याला उपयोग*–पाळींव प्राण्यांची पैदास; वन्य प्राण्यांची शिकार; वन्य प्राण्यांची पैदास. ( *इ* ) *डार्विन* व त्याचा सिद्धांत ( *ई* ) *नैसर्गिक व कृत्रिम निवड* ( *Natural & Artificial Selection* )—कोणते विशेष ( *Characteristics* ) आनुवंशिक असतात ? वन्य प्राणी व वनस्पति यांचीं उदाहरणें.

( उ ) सोविएत देशांत कोणत्या प्राण्यांवर व वनस्पतींवर कृत्रिम निवडीसाठीं प्रयोग केले जात आहेत ?

४ भूगोल; इयत्ता ७ वय ( १५ )

सोविएत यूनियनमधील खनिज संपत्ति — खनिज संपत्तीमध्यें सोविएत देशाचें जगांतील स्थान; सोविएत देशाचे नैसर्गिक विभाग व खनिज संपत्ति यांचे संबंध; खनिज संपत्तीचा शोध व शुद्धीकरणाचे कारखाने; नवीनच उघडलेलीं खनिज क्षेत्रें.

*तोंडी परीक्षेचे प्रश्न*

१ वनस्पतिशास्त्र; इयत्ता ६ ( वय १४ )

( *अ* ) *गहूं*-विशेष माहिती; कसा व कुठें पिकवितात, व त्याचे उपयोग सांगा. राय, बार्ली व ओट या धान्यांची उत्पत्ति; कुठें पिकवितात व त्यांचे उपयोग सांगा.

( *आ* ) *डार्विन* व *मिचूरिन* ( एक प्रसिद्ध सोविएत वनस्पतिशास्त्रज्ञ ) यांनीं वनस्पतिशास्त्रांत कोणती भर टाकली ? या शास्त्रज्ञांविषयीं थोडक्यांत माहिती सांगा.

२ भूगोल; इयत्ता ४ ( वय १२ )

( *अ* ) सोविएत देशांतील टंड्रा प्रदेश नकाशांत दाखवा; टंड्रामधील हवामान, वनस्पति, प्राणि आणि तेथील मानवी जीवन यांची माहिती द्या. ( *आ* ) जगाच्या नकाशांत पांच प्रमुख भांडवलशाही देश दाखवा; त्यामध्यें सर्वांत बलाढ्य कोण व कां ? ( *इ* ) इटाली कोठें आहे ? इटालीच्या वसाहती दाखवा. स्पेनमधील फॅशिस्टांना इटाली सध्यां ( १९३७ सालीं ) कां मदत करीत आहे ?

३ सृष्टिज्ञान; इयत्ता ४ ( वय १२ )

*कोंबडा*- ( *अ* ) पूर्वपीठिका सांगा; कोंबड्याचा मनुष्याला कोणता उपयोग

होतो ? अंडीं उबविण्याचीं यंत्रें कशीं असतात ? ( *Incubators* ) ( आ ) मनुष्याचीं पांच ज्ञानेंद्रियें सांगून त्यांची विशेष माहिती द्या. ( इ ) मुलांनीं धूम्रपान करणें अपायकारक आहे; कां ? ( ई ) दांतांचे किती प्रकार आहेत ? लहानपणापासून त्यांमध्यें कोणते फरक होतात ? दांतांची निगा कशी राखावी ? ( उ ) यांत्रिक धूळ ( *Industrial Dust* ) म्हणजे काय ? ती अपायकारक कशी असते ?

*सोविएत क्रमिक पुस्तकांतील उतारा*

पहिल्या इयत्तेच्या ( वय वर्षे ८ ) पुस्तकांतील एक धडा पुढें दिला आहे.

## झाडूवाले

रस्त्यावर बर्फ खच्चून पडला आहे.

पण पहा !

झाडूवाले बर्फ दूर करीत आहेत.

आतां आपणांस जपून चालावें लागणार नाहीं.

आपलीं पावलें ओलीं होणार नाहींत.

झाडूवाल्यांना त्रिवार धन्यवाद असोत !

# ५

## ( अभ्यासक्रमाबाहेरील ) सांस्कृतिक विकास

केवळ शाळेंतील ठराविक अभ्यासक्रम पार पडला कीं शिक्षणाचें कार्य संपलें व उद्दिष्ट साध्य झालें असें म्हणणें चुकीचें ठरेल. शाळेच्या अभ्यासक्रमाबाहेर मुलांच्या उत्साहाला व उपजत शक्तींना वाव मिळणें आवश्यक असतें. आवडीचे छंद व विषय यांमध्यें विशेष लक्ष घालून त्यांचा पाठपुरावा केल्यानें मुलांच्या नैसर्गिक प्रवृत्तींना योग्य चालना मिळते; त्यांच्या उत्साहाला वाव मिळतो आणि त्यामुळें त्यांच्या विकासाला खूप मदत होते. आपल्याकडे यासाठीं कांहींच योजना नाहीं. तरीसुद्धां मुलांची ही प्रवृत्ति तिकिटें, सिगारेटचीं पाकिटें, आगकाडयांच्या पेट्या इत्यादि वस्तु गोळा करण्याच्या रूपानें व्यक्त होतेच. अगदीं गरीब स्थितींतील मुलें रस्त्यावरून वहाणाऱ्या पावसाच्या पाण्यांत तासन् तास कागदाच्या होडया खेळवून अथवा झाडांच्या फांद्यांचीं घरकुलें बनवून आपली हौस फेडून घेतात.

मुलांच्या या उत्साहाला व प्रवृत्तींना योग्य वळण लावावें या हेतूनें सोविएत शाळेंत आणि शाळेबाहेर फार मोठया प्रमाणावर भरपूर तरतूद केलेली आहे.

अभ्यासक्रमाबाहेरील शिक्षणाचा ( *Extra Curricular Activity* ) एवढा मोठा व्याप जगांत इतरत्र कोठेंहि आढळत नाहीं असें म्हटल्यास त्यांत अतिशयोक्ति होणार नाहीं. हें सर्व कार्य छंदमंडळांच्या ( *Circles* ) द्वारा अभ्यासाच्या वेळानंतर चालतें; आणि त्यांत भाग घेणें न घेणें मुलांच्या इच्छेवर अवलंबून असलें, तरी बहुसंख्य मुलें या ना त्या छंदमंडळांत भाग घेतात असा अनुभव आहे. या छंदमंडळांचे अनेक प्रकार आहेत.

१. अभ्यासमंडळें – वाङ्मय, इतिहास, सृष्टिज्ञान, निरनिराळीं शास्त्रें या विषयांचीं स्वतंत्र मंडळें असतात.

२. कलामंडळें — संगीत, चित्रकला, नृत्य, अभिनय इत्यादि.

३. हस्तव्यवसाय, यंत्रविद्या, लाकूडकाम, घरकाम, शिवणटिपण इत्यादि.

४. व्यायाम, लष्करी शिक्षण, प्रथमोपचार ( *First Aid* ) इत्यादि.

या अनेक प्रकारांपैकीं शक्य असतील तीं मंडळें प्रत्येक शाळेंत चालविलेलीं असून त्यांमध्यें पायोनियर दलांतील बालवीर आणि शिक्षक यांच्या मार्गदर्शनाखालीं अनेक मुलें नियमितपणें भाग घेतात व आपल्या आवडीच्या छंदांत अगर विषयांत प्रावीण्य मिळवितात.

पायोनियर दल या संस्थेचें आपल्या इकडील बालवीरसंस्थेशीं थोडेसें सादृश्य आहे. दहा वर्षांवरील मुलांना या दलांत प्रवेश मिळतो. पायोनियर दलाचें मुख्य काम मुलांना शिस्तप्रिय बनवून शाळेंतील अभ्यास व शिस्त उत्तम ठेवणें हें आहे. अभ्यासाच्या वेळानंतर करमणुकीचे कार्यक्रम ठरविणें, उन्हाळ्यांत व हिंवाळ्यांत कॅम्पला नेणें इत्यदि कामांची जबाबदारीही पायोनियर दलावर असते. दलाच्या सर्व कार्यांत शिक्षकवर्गाचें पूर्ण सहकार्य असतें.

प्रत्येक शाळेंत पायोनियर दलाचीं कांहीं पथकें असतात व पथकांचे प्रमुख मुलांनीं निवडलेले असतात. दलांत प्रवेश मिळविण्यासाठीं दहा वर्षांवरील बहुतेक सर्व मुलांची धडपड चाललेली असते. दलांतील विद्यार्थी अभ्यासांत व वर्तणुकीनें उत्तम असावा लागतो. तसेंच त्यानें कांहींतरी ' समाजकार्य ' ( *Social Work* ) करणें आवश्यक असतें. ( *समाजकार्य* हा शब्द रूढ अर्थानें घ्यावयाचा नाहीं. शाळेंतील मुलांच्या

समाजाला उपयुक्त असें कोणतें ना कोणतें तरी काम स्वेच्छेनें करणें, उदाहरणार्थ वर्गप्रमुख असणें, वर्गाची स्वच्छता पाहाणें, ग्रंथालयांत मदतनीस असणें इत्यादि—असा समाज-कार्याचा अर्थ आहे.) पायोनियर दलांतील विद्यार्थ्याला इतर विद्यार्थ्यांमध्यें विलक्षण मान असतो आणि सर्व पायोनियर आपल्या शाळेचा दर्जा व लौकिक सांभाळण्यासाठीं हरप्रयत्न करतात. मुलांमध्यें उत्तम अभ्यास, उत्तम वागणूक व शिस्तपालन यांविषयीं स्वयंस्फूर्त जाणीव उत्पन्न करण्याच्या कामीं पायोनियर दलाचा फार मोठा उपयोग होतो. पायोनियर दलाचें पोशाखांतील वैशिष्ठ्य लाल गळपट्टा ( मुलें ) आणि लाल फीत ( मुली ) हें असून त्यांचा बोधशब्द अथवा सलामी " सदा सज्ज " ( *Always Ready* ) ही आहे.

प्रत्येक शाळेंतील पायोनियर दलाचा प्रमुख अधिकारी दलाच्या मध्यवर्ती संस्थेनें पाठविलेला असतो आणि त्याचें ( अगर तिचें ) वय शाळकरी मुलांपेक्षां थोडेसें अधिक असतें. शिक्षकांच्या अनुमतीनें व सहकार्यानें तो दलाच्या कामाचा कार्यक्रम आंखतो. शाळेंत दलासाठीं एक खास खोली राखून ठेवलेली असते आणि पायोनियर मुलें ती अतिशय शोभिवंतपणें सजवितात. दलाच्या कोणत्याही कार्यक्रमाला शाळेंतील सर्व मुलांना हजर राहतां येतें व त्यांत भाग घेतां येतो. असा भाग घेण्यासाठी मुलें अहमहमिकेनें पुढें येतात.

वर उल्लेख केलेल्या छंदमंडळांना मदत करण्यासाठीं ठराविक वेळीं बाहेरून त्या विषयाचा तज्ज्ञ येतो आणि मुलांना त्या विषयाचें अथवा छंदाचें पद्धतशीर शिक्षण देतो. कधींकधीं नामांकित लेखक, कवि, चित्रकार, संगीतज्ञ, यंत्रविशारद, संशोधक छंदमंडळांना भेट देऊन मुलांना मार्गदर्शन करतात. मागच्या पिढींतील तज्ज्ञांनीं भावी पिढीच्या होतकरू मुलांना आपापल्या आवडत्या विषयांतील अनुभवाचा व ज्ञानाचा फायदा द्यावा ही योजना किती अनुकरणीय आहे !

वाङ्मयमंडळाचें कार्य वाङ्मयाचा विशेष अभ्यास करणें, निरनिराळे साहित्यप्रकार हाताळणें, प्रख्यात ग्रंथकार आणि कवि यांचे वाङ्मयविषयक विचार त्यांच्या तोंडून ऐकणें अशा प्रकारचें असतें. या मंडळाचें आणखी एक महत्त्वाचें काम म्हणजे भिंतपत्रिका ( *Wall News Paper* ). प्रत्येक वर्गाची स्वतांची भिंतपत्रिका असून सर्व शाळेची मिळून एक मोठी भिंतपत्रिका असते. त्या त्या वर्गांतील वाङ्मयमंडळावर

भिंतपत्रिकेच्या संपादनाची जबाबदारी असते. वर्गांतील मुलें त्यांना वाटेल त्या विषयावर भिंतपत्रिकेसाठीं लेख लिहितात आणि वर्गांतील एकंदर जीवनाचें तें एक चित्रच असतें असें म्हणावयास हरकत नाहीं. कधींकधीं वर्गांत आढळणाऱ्या एखाद्या उणीवेवर व्यंगचित्र अथवा लेख यांच्या रूपानें प्रखर टीका केलेली असते. परन्तु ही टीका दोष सुधारण्याच्या उद्देशानें केलेली असून त्यामध्यें वैयक्तिक हेवादावा डोकावूं नये अशी खबरदारी घेतली जाते. भिंतपत्रिका हें शाळेंतील कमतरता दाखविण्याचें व ती सुधारून शाळेचा दर्जा वाढविण्यास मदत करण्याचें प्रभावी साधन आहे.

शास्त्रमंडळांतील होतकरू शास्त्रज्ञ निरनिराळ्या प्रयोगशाळा व उद्योगकेंद्रें यांना भेटी देऊन व स्वतां शाळेच्या प्रयोगशाळांत प्रात्यक्षिकें करून आपली जिज्ञासा तृप्त करून घेतात. प्राणिशास्त्रमंडळांत असलेलीं मुलें प्राणिशाळा ( *Zoo* ) पहावयास जाऊन निरनिराळ्या प्राण्यांचें अवलोकन करून आपला छंद पुरवितात. कलामंडळामध्यें कलाप्रेमी मुलें भाग घेतात आणि मधूनमधून संध्याकाळीं करमणुकीचे कार्यक्रम ठरवून आपलें कलाप्रावीण्य सर्व मुलांच्या निदर्शनास आणतात. यंत्रमंडळांतील भावी यंत्रविशारद अद्यावत् तऱ्हेचीं विमानें, पाणबुड्या, इंजिनें, विजेच्या गाड्या इत्यादि वस्तु छोटेखानी प्रमाणावर करावयास शिकतात. या सर्व छंदमंडळांच्या उद्योगासाठीं लागणारें सामान शाळेकडून मोफत पुरविण्यांत येतें.

संमेलनें व समारंभ यांची मुलांना किती विलक्षण हौस असते याचा अनुभव प्रत्येकाला आहे. सोविएत मुलें याला मुळींच अपवाद नाहींत. क्रांतिदिन, लेनिनदिन, वार्षिक संमेलन अशा प्रसंगीं हीं सर्व मंडळें एकमेकांच्या सहकार्यानें भल्या मोठ्या कार्यक्रमाचा बेत ठरवून तो पार पाडतात. संगीतमंडळें गायनवादनाचा कार्यक्रम करतात; नाट्यमंडळ नाटकें करून दाखवितें; चित्रकार सर्व समारंभाची सजावट करतात. तसेंच या प्रसंगीं निरनिराळ्या मंडळांनीं तयार केलेल्या वस्तूंचें प्रदर्शन भरविण्यांत येतें.

कित्येक हुशार मुलांना शाळेंतील छंदमंडळें अपुरीं पडतात. या मुलांना शहरांतील ( अथवा जिल्ह्यांतील ) मध्यवर्ति पायोनियर दलामार्फत चालणाऱ्या त्या त्या छंदाच्या मध्यवर्ति संस्थेंत पाठविण्यांत येतें. मात्र त्यांनीं आपला शाळेंतील अभ्यास व वर्तणूक उत्तम ठेवली पाहिजे. हीं छंदमंडळें ज्या ठिकाणीं चालविलेलीं असतात

त्यांना पायोनियर मंदिरे–राजवाडे ( *Pioneer Palaces* ) असें नांव आहे आणि त्यांपैकीं बऱ्याच इमारती खरोखरीच जुन्या काळचे झारशाहींतील राजवाडे आहेत ! हीं मंदिरें सर्व साधनांनीं समृद्ध असल्यामुळें तेथें जाणाऱ्या मुलांना आपली आवड मनसोक्तपणें तृप्त करून घेतां येते. या सर्व छंदमंडळांना मार्गदर्शनासाठीं जे पायोनियर प्रमुख नेमलेले असतात त्यांनीं खास शिक्षण ( *Central House of Arts Education for Children* या संस्थेंत ) घेतलेलें असतें. पायोनियर मंदिरांत प्रवेश मिळविण्याला मुलें अत्यंत उत्सुक असतात आणि त्या दिशेनें त्यांची एकसारखी धडपड चालू असते.

सोविएत समाजांत मुलांची सुखसोय किती अगत्यानें पहाण्यांत येते आणि त्यांच्या आवडींना किती उत्तेजन दिलें जातें याची कल्पना वरील माहितीवरून येईलच. त्याशिवाय जागोजाग मुलांसाठीं क्लब, लाल कोने ( *Red Corner* ) इत्यादि संस्था केवळ मुलांचें मन रमवून त्यांचे छंद पुरविण्याकरितां उघडण्यांत आलेल्या आहेत. सन १९३३ ते १९३७ या दुसऱ्या पंचवार्षिक योजनेमध्यें ८६४ नवीन पायोनियर मंदिरें व क्लब बांधण्यांत आले; १७९ नवीन बगीचे तयार करण्यांत आले आणि ७७४ खास मुलांचीं सिनेमागृहें व नाट्यगृहें आणि ७६० यांत्रिक व कलाकेंद्रें उघडण्यांत आलीं; आणि यांमध्यें एक कोटीपेक्षां अधिक मुलें भाग घेत होतीं. ही प्रगति १९३७ नंतर याहूनही अधिक झाली आहे. या प्रगतीशीं आपल्याकडील बालवीरसंस्था अथवा शाळेंतील करमणुकीची व्यवस्था यांची तुलनाच करावयास नको, परन्तु खुद्द इंग्लंडमधील बालवीर संस्था व मुलांचे क्लब यांची सोय किती कंजुषपणानें केलेली असते ही गोष्ट ध्यानांत घेतल्यास सोविएत शिक्षणांतील या विशेषाचें महत्त्व लक्षांत येईल.

पायोनियर मंदिराची कल्पना देण्यासाठीं एका मंदिराचें वर्णन पुढें दिलें आहेः

" या मंदिराची सजावट विलक्षण सुंदर होती. येथें ६९ निरनिराळ्या विषयांचीं २०९ मंडळें असून त्यांमध्यें एकूण २५०० मुलें भाग घेत होतीं. एका दालनांत लहान मुलें व मुली मॉस्को बॅलेमधील ( *Ballet* नृत्य ) एका नर्तकाकडून नृत्य शिकत होतीं. दुसऱ्या दालनांत कांहीं मुलें शिल्प शिकत होतीं, पाण्यांत सूर मारण्याच्या पवित्र्यांत एक मुलगी उभी आहे हें दाखविणारा सुंदर पुतळा त्या ठिकाणीं एक मुलगा तयार करीत होता. तिसऱ्या ठिकाणीं प्रोफेसर श्मिट या

उत्तरध्रुवावरील स्वारींत भाग घेतलेल्या सुप्रसिद्ध संशोधकाभोंवतीं जमून मुलें त्याच्या तोंडून स्वारींतील धाडसी अनुभव ऐकत होतीं. इतिहासाचें दालन सोविएत देशाच्या ऐतिहासिक नकाशांनीं सजविलेलें होतें. एका जागीं मॉस्को शहराची भावी रचना कशी असेल हें दाखविणारा नकाशा विजेच्या रंगीत दिव्यांचा उपयोग करून मोठया कल्पक रीतीनें तयार करण्यांत आला होता; सूर्याच्या प्रकाशाची शक्ति एका प्रचंड अंतर्गोल आरशाच्या सहाय्यानें केंद्रित करून उपयोगांत कशी आणली जाईल हें त्यामध्यें दाखविण्यांत आलें होतें ! यंत्रविद्याविषयक दालनें तर खूपच दिसलीं. डायनामो, छोटेखानी रेल्वे, मेट्रोचें (मॉस्कोंतील भूमिगत रेल्वे) छोटें मॉडेल, सिनेमा फिल्म बनविण्याची सायंत पद्धति, विमानें परीक्षिण्याची यंत्रसामुग्री, वगैरे निरनिराळ्या यांत्रिक महत्त्वाच्या वस्तू निरनिराळ्या दालनांत ठेवलेल्या होत्या. बहुसंख्य सोविएत मुलांना यंत्रविद्येची विलक्षण आवड असते असा अनुभव आहे ! निरनिराळे तज्ज्ञ आपल्या ज्ञानाचा फायदा देऊन मुलांमधील नैसर्गिक प्रवृत्तींच्या विकासाला मदत करण्याच्या हेतूनें येथें आले होते. असें करण्यांत आपण आपला वेळ फुकट घालवीत आहोंत असें त्यांना बिलकूल वाटत नव्हतें. त्या त्या विषयाकडे नैसर्गिक ओढा असलेल्या मुलांमध्यें मिसळणें आणि त्यांना मार्गदर्शन करून कोणतीं मुलें अधिक शिक्षणासाठीं लायक आहेत हें शोधून काढणें हें कार्य समाजाच्या दृष्टीनें महत्त्वाचें आहे याची पूर्ण जाणीव असल्यामुळें हे तज्ज्ञ त्या ठिकाणीं आलेले होते. ”

युद्धकालांतही पायोनियर मंदिरांच्या कार्याला खंड पडला नव्हता हें माझ्या हातीं आलेल्या पुढील महितीवरून दिसून येतें. *यारोस्लोव* या छोटेखानी उद्योगकेंद्राच्या ठिकाणीं असलेल्या पायोनियर मंदिरांत १९४३ सालीं निरनिराळ्या आठ छंदांविषयीं २६ छंदमंडळें कार्य करीत होतीं. त्यांमध्यें सुमारें ७०० मुलें भाग घेत होतीं. मंदिराच्या यंत्रशाळेंत शेंकडों मुलांनीं मोटारी, ट्रॅक्टर, रेडियो इत्यादि यंत्रें दुरुस्त करण्यांत प्रावीण्य मिळविलें. सुमारें सवाचारशें मुलें ट्रॅक्टर (लोखंडी यांत्रिक नागर) चालविण्यास शिकलीं. या मंदिराच्या वतीनें मुलांसाठीं दोन उन्हाळी सुट्टीचे कॅम्प उघडण्यांत आले होते. याशिवाय मंदिराचे सदस्य असणाऱ्या मुलांनीं आघाडीवरील सैनिकांना पुस्तकें, कपडे इत्यादि वस्तु स्वयंस्फूर्तीनें गोळा करून पाठविल्या आणि शेतकऱ्यांना शेतीच्या कामांत मदत केली ती निराळीच.

सोळा वर्षांखालील मुलांस प्रौढ मनुष्यांसाठीं असलेल्या सिनेमांना आणि नाटकांना

जाण्याची मनाई आहे. पण मुलांसाठीं खास सिनेमा व नाट्यगृहें आहेत. तेथें मुलांसाठीं तयार केलेले वेगळे बोलपट दाखविले जातात आणि नाटकेंही खास मुलांसाठीं म्हणून लिहिलेलीं असतात. यांमधील बसावयाच्या जागा, उपाहारगृह इत्यादि सर्व व्यवस्था छोटेखानी असली तरी सर्व थाट नेहमींच्यासारखा असतो. खेळाच्या वेळा मात्र लौकर असून शेवटचा खेळ संध्याकाळीं ७॥ च्या आंत संपला पाहिजे अशी सक्त ताकीद असते. कधींकधीं अभिनय मंडळांतील मुलेंच स्वतः प्रवेश बसवून ते करून दाखवितात. नाटकें व बोलपट यांवर टीका करण्याला मुलांना प्रवृत्त केलें जातें आणि ही टीका मध्यवर्ती संस्थेकडे पाठविली जाते. नवे बोलपट व नाटकें तयार करतांना याचा उपयोग होतो. सोविएत मुलांना *कळसूत्री बाहुल्यांचीं नाटकें* ( *Puppet Theatre* ) फार आवडतात व त्यांच्या हालचाली पाहतांना तीं अतिशय रंगून जातात. मध्यवर्ती पायोनियर संस्थांपैकीं कांहींचीं स्वतांचीं नाट्यगृहें असून मॉस्को व लेनिनग्राद येथें या संस्थांचीं नभोवाणी–केंद्रें देखील आहेत !

मुलांच्या करमणुकीचें आणखी एक महत्त्वाचें साधन म्हणजे सुट्टींतील सफरी व कॅम्प. कॅम्पचे दोन प्रकार आहेत. कांहींचा उद्देश केवळ प्रवास व मौज असा असतो, तर इतर कांहीं कॅम्प मुलांना विश्रांति मिळून त्यांची प्रकृति सुधारावी आणि पुढील वर्षाच्या अभ्यासासाठीं तीं ताजींतवानीं व्हावीं या उद्देशानें चालविण्यांत येतात. कॅम्पांतील दैनंदिन कार्यक्रम डॉक्टरच्या सहाय्यानें काळजीपूर्वक आंखलेला असतो आणि आपला कॅम्प सर्व प्रकारें यशस्वी होऊन त्याला मानाचा लाल झेंडा मिळावा यासाठीं मुलें हा कार्यक्रम उत्तम तऱ्हेनें पार पाडण्याची शिकस्त करतात. कॅम्पच्या खर्चाचा कांहीं भाग ऐपतीप्रमाणें पालकांकडून घेतला जातो आणि बाकीचा खर्च शाळा व शाळेला 'आपली' मानणारें उद्योगकेंद्र करतें. ( प्रत्येक शाळेला "आपली" मानणारा एखादा कारखाना, सामुदायिक शेत अथवा अन्य उद्योगकेंद्र असतें आणि तें शाळेच्या कारभारांत लक्ष घालून तिला वेळोवेळीं मदत करतें याचा उल्लेख मागें आलाच आहे. ) ज्या मुलांना उन्हाळ्याच्या सुट्टींत स्वतंत्रपणें सफरीला जाणें अशक्य असेल अशा सर्वांची शाळेतर्फे सोय करण्यांत येते. कॉकेशस पर्वताचा पायथा, काळ्या समुद्राचा किनारा, कांहीं मनोरम नदीकांठ वगैरे वनश्रीयुक्त जागीं मुलांच्या कॅम्पसाठीं खास इमारती बांधल्या आहेत. १९३९ सालीं अंदाजें १४ लक्ष मुलांनीं या सोयीचा फायदा घेतला.

सोविएत शाळेच्या व्यवस्थेंत कोणते विशेष प्रामुख्यानें दिसून येतात ?

सोविएत शाळेचा एक महत्त्वाचा विशेष म्हणजे शाळेंतील स्वराज्य ( *Pupils' Self-government* ). सर्व मुलें मिळून शाळेची सोविएत सभा ( पंचायत ) बनते. आणि ही सोविएत विद्यार्थ्यांची एक समिति निवडते. शाळेची सोविएत व विद्यार्थी–समिति यांवर शाळेसंबंधीं थोडीफार जबाबदारी टाकण्यांत येते. मुख्य उद्देश शिस्त व अभ्यास अधिकाधिक सुधारून शिक्षकांच्या सहकार्यानें आपली शाळा नमुनेदार बनविण्यासाठीं सर्व प्रयत्न करणें हा असतो. याला आनुषंगिक अशा, वर्गांत व शाळेंत स्वच्छता राखणें, शाळेच्या सामानाची काळजी घेणें, शिक्षकांच्या देखरेखीखालीं अभ्यासाचे व इतर कार्यक्रम ठरविणें इत्यादि इतर कामांचाहि शाळेंतील स्वराज्यांत अन्तर्भाव होतो. स्वराज्य हें नांव जरी मोठें असलें तरी त्यामुळें विद्यार्थ्यांवर त्यांच्या वयाच्या मानानें न झेपण्याजोगें काम पडूं नये अशी काळजी घेण्यांत येते. उदाहरणार्थ पहिल्या तीन इयत्तांमधील विद्यार्थी–समितीचें काम अगदीं हलकें असतें तर शेवटच्या तीन इयत्तांमधील ( वय वर्षें १५ ते १८ ) मुलांवर बरीच जबाबदारी टाकली जाते. स्वराज्याचा कारभार पहाणाऱ्या मुलांत पायोनियर मुलेंच अग्रेसर असतात. " आपण समाजवादी सोविएत युनियनचे भावी नागरिक आहोंत; आपल्या समाजाची झपाट्यानें प्रगति व विकास होण्याकरितां आपण उत्तम ज्ञान मिळविलें पाहिजे व शिस्तीचे भोक्ते बनलें पाहिजे, " या विचारापासून शाळेंतील स्वराज्याला अन्तस्फूर्ति मिळत असते.

शाळेंतील स्वराज्यानें दोन गोष्टींचा लहानपणापासून सराव होतो. एक तर लोकशाही पद्धतीनें काम करण्याची संवय लागते. तसेंच शाळेच्या सोविएत सभेंत आणि वर्गसभांमध्यें बेशिस्त, कामचुकार व अभ्यासाकडे लक्ष न देणाऱ्या मुलांवर त्यांच्या वर्गबंधूंकडून प्रखर टीका होते. दुसरी गोष्ट अशी कीं आपण समाजाचे घटक आहों, आणि समाजाच्या सुस्थितीची कांहीं ना कांहीं जबाबदारी प्रत्येकानें उचलली पाहिजे हा सामाजिक दृष्टिकोन ( *Social Outlook* ) पहिल्यापासून निर्माण होऊन समाजकार्य ( *Social Work* ) स्वेच्छेनें शिरावर घेण्याची संवय लागते. विद्यार्थ्यांनीं शाळेबाहेरील मोठ्या समाजाच्या उपयोगी पडावें अशी सामान्यतः अपेक्षा नसते. त्यांचा समाज म्हणजे शाळेंतील समाज आणि त्यांचें समाजकार्य या समाजापुरतें मर्यादित असतें. समाजकार्याची कल्पना वर दिलेली आहेच. आणखी

एका उदाहरणाचा विशेष उल्लेख केला पाहिजे. डॉक्टर व नर्स यांच्या देखरेखीखालीं दवाखान्यांत मदत करणें, वर्गाची व शाळेची स्वच्छता पहाणें, मोऱ्यापायखाने स्वच्छ आहेत कीं नाहीं तें पहाणें, तोंड धुण्याच्या नळापाशीं साबण व रुमाल जागच्या जागीं आहेत याविषयीं खबरदारी घेणें आणि प्रथमोपचारांचें ( *First Aid* ) विशेष शिक्षण घेणें हीं कामें कांहीं मुलें आपल्या अंगावर घेतात. समाजकार्याच्या परंपरेंत वाढलेलीं मुलें जरूर पडेल तेव्हां बाहेरील समाजाला उपयुक्त अशीं महत्त्वाचीं कार्येंही उत्साहानें व जबाबदारीनें पार पाडतील यांत मुळींच शंका नाहीं. गेल्या युद्धांत लक्षावधि देशाभिमानी सोविएत मुलांनीं स्वयंस्फूर्तीनें फार मोठी कामगिरी बजावली आहे.

सोविएत शाळेंतील वातावरणाचा दुसरा एक विशेष म्हणजे विद्यार्थ्यांमध्यें *सामायिक सहकारी दृष्टिकोन* ( *Collective Outlook* ) निर्माण केला जातो. वैयक्तिक विकासाबरोबरच, केवळ एका व्यक्तीनें नव्हे तर वर्गांतील सर्व मुलांनीं, शाळेंतील सर्व मुलांनीं सामुदायिक रीतीनें पुढें गेलें पाहिजे याची जाणीव मुलांच्या मनांत प्रथमपासून रुजविली जाते. गेल्या प्रकरणांत उल्लेखिलेली सोविएत शाळेंतील गुण देण्याची पद्धति याला साजेशीच आहे. दुसऱ्याला कमी गुण मिळून आपल्याला सर्वांत अधिक मिळावे अशी हानिकारक व्यक्तिगत स्पर्धा जाऊन तिच्या जागीं आपल्या वर्गांतील अधिकांत अधिक मुलांना "अत्युत्तम" शेरा मिळावा अशा प्रकारची उत्साहदायी स्पर्धा निर्माण होते. आपला वर्ग सर्व बाजूंनीं उत्तम ठरावा या उद्देशानें प्रेरित होऊन हुशार मुलें मागें पडणाऱ्या सहवर्गीयांना अभ्यासांत आपुलकीनें मदत करतात; आणि शिस्तप्रिय मुलें अवखळ व खोडकर मुलांच्या बेशिस्त वर्तनावर सर्व वर्गासमोर अथवा भिंतपत्रिकेंत कडक टीका करून त्यांच्यावर वर्गाचें सामाजिक दडपण आणतात. बहुसंख्य मुलें वर्गांत दंगा करणाऱ्या मुलांची बाजू घेत नाहींत; उलट त्यांच्या खोडया सर्व वर्ग व वर्गशिक्षक यांच्या नजरेस आणतात. आपल्याकडील शाळेंतल्याप्रमाणें असें करणें चुगलीखोरपणाचें व निंद्य कृत्य समजलें जात नाहीं ! कारण खोडकर मुलांना वर्गाच्या समाजासमोर खेंचून त्यांना सुधारवयास भाग पाडणें आणि या प्रकारें आपल्या वर्गाच्या अभ्यासांतील प्रगतीला हातभार लावण्याच्या कामीं शिक्षकाशीं सहकार्य करणें या गोष्टी वर्गाच्या व शाळेच्या हिताच्या आहेत हें त्यांना मनोमन पटलेलें असतें. शिक्षकाच्या शिकवण्यांत अथवा इतर

वागणुकींत कांहीं उणीव अथवा ढिलाई दिसल्यास त्यांवरही विद्यार्थीसमितीतर्फे उघड टीका करण्यास विद्यार्थी मागेंपुढें पहात नाहींत. परंतु ही टीका अनादर करण्याच्या हेतूनें केलेली नसून सुधारण्याच्या इच्छेनें केलेली असल्यामुळें शिक्षक-वर्गही याचा विषाद न मानतां मुलांचें मत विचारांत घेतो.

सुधारणेचें एक अतिशय प्रभावी साधन *समाजवादी चढाओढ* ( *Socialist Competition* ) हें आहे. शिस्त, अभ्यास, स्वच्छता इत्यादि बाबतींत अधिकांत अधिक उत्तम गुण मिळविण्याला एखादा वर्ग दुसऱ्या वर्गाला जाहीर आव्हान देतो. औपचारिकपणें हें आव्हान देणें व स्वीकारणें या गोष्टी वर्गांचे प्रतिनिधि एकमेकांच्या वर्गांत जाऊन करतात. चढाओढीचे विषय व नियम यांची सर्व हकीगत लिहून शाळेच्या व वर्गाच्या भिंतपत्रिकेवर लावली जाते. दोन्ही वर्गांचे शिक्षक आणि मुलांच्या विश्वासांतील त्रयस्थ मुलें यांची पंच म्हणून नेमणूक होते.

आपल्या वर्गाची प्रगति कशी होत आहे हाच मग मुलांच्या बोलण्याचा मुख्य विषय होऊन रहातो. आपल्याकडे क्रिकेटच्या सामन्यांत आपल्या बाजूच्या धांवांची संख्या हा जसा क्रिकेटप्रेमी मुलांचा उत्साहविषय बनून रहातो तोच प्रकार मोठ्या प्रमाणावर या समाजवादी चढाओढींत होतो. जीं मुलें अभ्यासांत मागें पडत असतील त्यांना साहाय्य करण्यासाठीं हुशार मुलें आपला एक "*उत्साही गट*" ( *Shock Brigade* ) स्थापतात. दंगेखोर मुलांवर दडपण आणण्यांत येऊन त्यांच्या खोडयांना आळा घातला जातो. कारण हा वर्गाच्या इभ्रतीचा व मानाची लाल फीत मिळविण्याचा प्रश्न असतो ना! समाजवादी चढाओढीनें उत्साहाला व कार्यशक्तीला विलक्षण चालना मिळते.

पण अशा चढाओढींत दुसरा वर्ग मागें पडून व कमी प्रतीचा ठरून आपला वर्ग उत्तम ठरावा अशी दुष्ट भावना निर्माण होण्यास बिलकूल अवसर दिला जात नाहीं. उलट चढाओढींत भाग घेणाऱ्या सर्व वर्गांनीं अपेक्षित दर्जाप्रत पोंचून सर्वांनीं मानाची लाल फीत मिळवावी अशी इच्छा सर्वजण व्यक्त करतात व त्या दिशेनें प्रयत्न करतात. कारण येथें बाकीचे वर्ग कमी प्रतीचे ठरल्यामुळें एखादा वर्ग सर्वांत उत्तम ठरणार नसून किती वर्गांनीं अपेक्षित दर्जा प्राप्त करून घेतला असा प्रश्न असतो.

समाजकार्याप्रमाणेंच समाजवादी चढाओढ, "उत्साही गट" यांची प्रथा केवळ शाळेपुरती मर्यादित नसून ती सर्व सोविएत जीवनांत पसरलेली आहे. शैक्षणिक क्षेत्रांत पाहिलें, तर विद्यार्थ्याविद्यार्थ्यांत, वर्गावर्गांत, शिक्षकाशिक्षकांत आणि एखाद्या प्रदेशांतील शाळाशाळांत अशा चढाओढी नेहमीं चालू असतात. मुलांच्या उत्साहाचें योग्य मार्गीकरण करण्याच्या कामीं या चढाओढींचा मोठा उपयोग होऊन शिवाय लहानपणापासून सामायिक दृष्टिकोन आणि सहकार्याची भावना वाढीस लागतात. समाजवादी चढाओढीचें नमुन्यादाखल एक उदाहरण पुढें दिलें आहे.

चौथ्या इयत्तेचें पांचव्या इयत्तेला समाजवादी आव्हानः—

"वर्गांत उत्तम शिस्त, धड्यांची पूर्वतयारी, स्नानगृहांत साबण व रुमाल जागच्याजागीं असणें या तीन मुद्यांबाबत या टर्ममध्यें आमचें तुम्हांस समाजवादी चढाओढीला आव्हान आहे. आमच्या वर्गानें ल्यूबा व सिडने यांची पंचसमितीवर निवड केली आहे."

*आणखी एक उदाहरण पहा :*

"खालील मुद्यांबाबत या वर्षी आम्हीं समाजवादी चढाओढीचा करार केला आहे.

(अ) सर्व मुलें पास व्हावीं आणि शेंकडा ५० टक्के मुलांना "अतिउत्तम" गुण मिळावे.

(आ) प्रत्येक विद्यार्थ्याची सहामाहींतून दोनदां तरी तोंडी परीक्षा घ्यावी.

(इ) गृहपाठाच्या वह्या ताबडतोब तपासाव्या.

(ई) विद्यार्थी कच्चा असल्याचें आढळून आल्यापासून एक आठवड्याच्या आंत त्याच्याकडे विशेष लक्ष पुरवावें.

(उ) सहामाहीचा कार्यक्रम आधीं ठरविण्यांत यावा आणि परीक्षेपूर्वी सर्व अभ्यासक्रमाची उजळणी करून घ्यावी.

सह्या — ×× (गणित शिक्षक)
×× (विज्ञान शिक्षक)

सोविएत शाळेंत शिस्तपालनासाठीं कोणते उपाय योजतात ? शिस्तीबद्दल मुख्य जबाबदारी शिक्षकाची असते. शिकवावयाच्या धड्याची विचारपूर्वक व नीट काळजी घेऊन शिक्षकानें तयारी केलेली असली आणि तो मुलांना धड्यांमध्यें रमवूं शकला तर वर्ग बेशिस्त होण्याचा प्रसंगच येत नाहीं. म्हणून शिक्षकामध्यें अध्यापनाचें कौशल्य असावें आणि मुलांचें लक्ष वेधून घेण्याची हातोटी त्याला साधलेली असावी अशी अपेक्षा शिक्षकाविषयीं असते. या कामीं शिक्षकाला त्याचे सहकारी व वरिष्ठ सर्व प्रकारें मदत करतात. शिक्षकानें धाक दाखवून मुलांवर शिस्त लादावयाची नसून शिस्तीची उपयुक्तता पटवून मुलांमध्यें शिस्तपालनाची जाणीव निर्माण करावयाची असते. वर्गांतील शिक्षण अधिकाधिक कार्यक्षम होण्यासाठीं विद्यार्थ्यांनीं शिक्षकांशीं सहकार्य केलें पाहिजे अशी भावना मुलांमध्यें उत्पन्न करणें हा शिस्त राखण्याचा मुख्य उपाय आहे. शिक्षेचा बडगा दाखवून हीं गोष्ट साध्य होत नसते.

शाळेंतील स्वराज्य, छंदमंडळें, समाजवादी चढाओढ या सर्वांच्या योगानें स्वतःचा विकास करून घेण्याची तीव्र इच्छा मुलांमध्यें निर्माण होते. आणि वैयक्तिक व सामाजिक विकास शिस्तीशिवाय साध्य होत नाहीं याची जाणीव मुलांना होऊं लागते. भिंतपत्रिकेंतील टीकेचा या कामीं फार फायदा होतो. पायोनियर दलांमुळेंही उत्तम वागणुकीची प्रथा रूढ होत आहे. सोविएत समाजवादी राष्ट्राचे जबाबदार व हुशार नागरिक होऊन समाजाच्या सुखांत आपण भर टाकणार आहोंत. या कल्पनेनें विद्यार्थ्यांना नेहमीं स्फूर्ति मिळते व याकरितां शिस्तपालनाची अतिशय जरूरी आहे ही गोष्ट त्यांना पटते. मुलांच्या अनिर्बंध उत्साहाला योग्य वाट न मिळाली तर तीं अवखळ बनतात. सोविएत शाळेंत मुलांच्या उत्साहाला भरपूर वाव मिळतो. शिक्षक वरिष्ठासारखा वागत नसून मुलांना मार्गदर्शन करणारा मुलांचा वर्गप्रमुख या नात्यानें वागत असल्यामुळें आणि दोघांचा उद्देश वर्गांतील शिक्षण अधिकाधिक उत्तम व्हावें हाच असल्यामुळें शिक्षक व मुलें यांमध्यें इतर देशांत आढळून येणारें द्वंद्व सोविएत शाळेंत आढळत नाहीं.

शिस्तपालनासाठीं बक्षिसें व शिक्षा हीं रूढ साधनेंही वापरलीं जातात. पारितोषिकें, मानपत्रिका, कॅम्पमध्यें सुट्टी घालविण्याची व्यवस्था, मध्यवर्ती पायोनियर मंडळांत पाठविण्याची व्यवस्था वगैरे प्रकार बक्षिसांमध्यें मोडतात. शिक्षेचे प्रकार आपल्याहून अतिशय भिन्न आहेत. *कोणत्याही प्रकारची शारीरिक शिक्षा शिक्षकानें*

*(तसेंच पालकांनींही ) करतां कामा नये; शारीरिक शिक्षा करणें कायद्यानें गुन्हा ठरविण्यांत आलें आहे.* * अपशब्दसुद्धां वापरतां कामा नये. विद्यार्थ्यानें बेशिस्त वर्तन केल्यास त्याला व्यक्तिशः बोलावून त्याविषयीं सूचना देण्यांत येते. बेशिस्तपणा खपणार नाहीं अशी सूचना वर्गांत धडा सुरू होण्यापूर्वी मुलांस देण्यांत येते. इतकें करूनही विद्यार्थ्यानें आपली वर्तणूक सुधारली नाहीं तर त्याला वर्गाबाहेर घालविण्यांत येतें आणि निरनिराळ्या करमणुकींच्या कार्यक्रमांना त्याला हजर राहूं दिलें जात नाहीं.

क्षुल्लक कारणांवरून वारंवार मुलांना वर्गाबाहेर घालविणें शिक्षकाला लांछनास्पद समजण्यांत येतें व अशा शिक्षकाची शिक्षकांच्या सभेंत कानउघाडणी केली जाते. सामान्यपणें वरील शिक्षा व मुलांचें सामाजिक दडपण या गोष्टी बेशिस्त मुलाला सुधारण्यास पुरेशा होतात. अपवादात्मक बाबतींत, सतत बेशिस्त वागणाऱ्या मुलांची घरची परिस्थिति, त्यांच्यामध्यें शारीरिक उणीव आहे कीं काय, त्यांच्या बौद्धिक विकासामध्यें कोणती कमतरता आहे या सर्वांची पालक, डॉक्टर व मानसशास्त्रज्ञ यांच्या मदतीनें बारकाईनें चौकशी करण्यांत येते. हे सर्व उपाय थकल्यावर मग मात्र इतर मुलांना या बेशिस्त मुलाची संगति बाधूं नये या हेतूनें त्यास शाळेंतून काढून टाकण्यांत येतें. शेंकडा ९० ते ९५ मुलें आपण होऊन चांगलीं वागतात असें दिसून येतें.

मुलांची वर्तणूक चांगली राहाण्यासाठीं शाळेबरोबर घरांतील वातावरणही पोषक असावें लागतें ही गोष्ट सोविएत शिक्षक नेहमीं डोळ्यासमोर ठेवतात. आपल्या वर्गांतील प्रत्येक मुलाच्या घरची शिक्षकाला चांगली माहिती असते. आणि मुलासंबंधीं कोणताही प्रश्न उद्भवल्यास तो पालकांच्या सहकार्याची हक्कानें मागणी करतो. जे पालक आपल्या मुलांच्या शिक्षणाविषयीं बेफिकीर वृत्ति दाखवीत असतील त्यांना त्यांच्या कामगार किंवा किसान संघाकडून ठपका मिळतो, याचा उल्लेख मागें आलाच आहे.

पालकांनीं आपल्या मुलाकडे नीट लक्ष पुरविलें पाहिजे, अशा तऱ्हेचा प्रचार वारंवार केला जातो. शाळेशीं पालकांचा निकटचा संबंध यावा या हेतूनें पालकांच्या सभा भरविल्या जातात आणि सतत सहकार्याकरितां पालकसमिति ( *Parent's*

* इग्लंडमध्यें अद्यापिही शारीरिक शिक्षा केली जाते.

*Council* ) निवडलेली असते. मुलांविषयींच्या कर्तव्याची जाणीव करून देण्यासाठीं शाळेतर्फे पालकांसाठीं शैक्षणिक विषयांवर व्याख्यानें व चर्चा ठेवण्यांत येतात व त्यांमध्यें कित्येक पालक भाग घेतात. तसेंच शाळेला वारंवार भेट देऊन शिक्षणाविषयीं व शाळेविषयीं ते अतिशय आस्था दाखवितात. वर्ग चालू असतांना शेवटच्या बांकावर पालक बसलेला आहे हें दृश्य सोविएत शाळेला अपरिचित नाहीं ! कित्येक पालक शाळेंतील धडे व शिकविण्याची पद्धति यांवर शिक्षकांशीं टीकात्मक चर्चा करतात या टीकेचा शिक्षकाला पुष्कळदां बराच फायदा होतो.

## धंदेशिक्षण, व्यवसायशिक्षण आणि शेतीशिक्षण. ६

झारशाही रशिया हा शेतकीप्रधान देश असून इतर पाश्चात्य राष्ट्रांच्या मानानें उद्योगधंद्यांत अतिशय मागासलेला होता. परंतु सोविएत सत्तेच्या अवघ्या पंचवीस वर्षांत सोविएत देशांत एवढें प्रचंड औद्योगीकरण करण्यांत आलें कीं, १९४० सालींच सोविएत युनियन हें *जगांतील दुसऱ्या क्रमांकाचें* औद्योगिक राष्ट्र बनलें. ( अमेरिकेचा क्रमांक पहिला आहे. ) या क्रांतिकारक फेरबदलाची थोडीशी कल्पना पुढील आंकडयांवरून येते.

कारखान्यांत तयार होणाऱ्या मालाचे निर्देशांक

| | | |
|---|---|---|
| साल | १९१३ | १०० |
| ,, | १९४० | ९०८ |

राष्ट्रांतील संपत्तीचें एकूण उत्पादन

| | |
|---|---|
| साल १९१३ | २१०० कोटि रूबल |
| ,, १९४० | १२,५०० ,, ,, |

उद्योगधंद्यांची वाढ झाली कीं कामगार व शेतकरी यांचें लोकसंख्येंतील प्रमाण बदलणें अपरिहार्य असतें. पुढील आंकडे सोविएत युनियनमध्यें झालेला बदल दाखवितात.

व्यवसायांतील बदलाचे आंकडे

| साल | १९१३ | १९३७ |
|---|---|---|
| कामगारांची संख्या | १,१२ लक्ष | २,८० लक्ष |
| कामगारांचें एकूण लोकसंख्येशीं शेंकडा प्रमाण. | १६·७ टक्के | ३४·७ टक्के |
| शेतकऱ्यांचें एकूण लोकसंख्येशीं शेंकडा प्रमाण. | ८० टक्के | ५५·५ टक्के |

कामगारांचें प्रमाण वाढलें असून शेतकऱ्यांचें प्रमाण घटलें आहे.

पहिल्या महायुद्धांत तीन वर्षांच्या लढाईच्या भारानें झारचें युद्धयंत्र साफ कोलमडून पडलें. उलट दुसऱ्या महायुद्धांत अखिल युरोपखंडाची साधनसामुग्री पाठीशीं असलेल्या, जगांतील अतिशय बलाढ्य अशा नाझी जर्मनीशीं सोविएत युनियननें जवळजवळ दोन वर्षें केवळ स्वतःच्या ताकदीच्या जोरावर यशस्वी सामना दिला. यावरून त्या देशाच्या औद्योगिक सामर्थ्यामध्यें किती प्रचंड वाढ झाली आहे याची प्रत्यक्ष साक्ष पटते.

सोविएत सत्तेचीं पहिलीं पांच सात वर्षें अस्वस्थतेचीं व धामधुमीचीं गेलीं. परकीय आक्रमण व अंतर्गत यादवी यांमध्यें देशांतील अर्थव्यवस्थेचा साफ चक्काचूर झाला होता. १९२७ सालीं देशाचें उत्पादन अखेर मूळपदावर आलें. त्यानंतरच्या पंधरा वर्षांच्या काळांतच खरोखर ही प्रचंड औद्योगिक वाढ झालेली आहे. तसेंच या अवधींत शेतीमध्येंहि क्रांतिकारक बदल झालेला आहे; पूर्वीचीं मोडकीं तोडकीं शेतीचीं आयुधें जाऊन आतां सर्व शेती सामुदायिक तऱ्हेनें आणि अद्यावत् यांत्रिक साधनांनीं करण्यांत येते; आणि आज शेतीच्या क्षेत्रांत सोविएत देशाचा *क्रमांक जगांत पहिला* आहे. *या दोन्ही गोष्टी ध्यानांत घेतल्यास* ही यांत्रिक प्रगति किती वेगानें झाली असली पाहिजे याची कल्पना येते.

देशाचें यंत्रीकरण व औद्योगीकरण यंत्रकुशल कामगारवर्गाशिवाय होत नसतें; आणि देशाच्या सर्वांगीण विकासासाठीं डॉक्टर, इंजिनियर, शिक्षक, अधिकारीवर्ग इत्यादि निरनिराळ्या व्यवसायांतील तज्ज्ञांचीहि आवश्यकता असते. म्हणून ज्या देशाला आपली औद्योगिक प्रगति करून घ्यावयाची असेल त्या देशांत धंदेशिक्षण आणि व्यवसायशिक्षण यांची उत्तम व्यवस्था असणें आवश्यक असतें. अर्थातच सोविएत युनियनमध्यें वेगवान् यांत्रिक प्रगतीबरोबर धंदेशिक्षणाच्या व व्यवसाय-शिक्षणाच्या संस्थांमध्येंहि तितक्याच झपाट्यानें वाढ झालेली आहे. सोविएत शिक्षणाच्या या महत्त्वाच्या विभागांचा गेल्या पंधरा वर्षांत कसकसा विकास होत गेला व त्याचें आजचें स्वरूप कशा प्रकारचें आहे हें या प्रकरणांत पाहाण्याचें ठरविलें आहे.

धंदेशिक्षण आणि व्यवसायशिक्षण यांचा उद्देश

१. *यंत्रकुशल कामगार आणि शेतकरी* ( *Skilled worker* )

२. *फोरमनच्या दर्जाचे यंत्रज्ञ* ( *Technicians* ),

३. *इंजिनियर*, हे तीन प्रकारचे यांत्रिक तज्ज्ञ आणि

४. *दुय्यम व उच्च प्रतीचे डॉक्टर, शिक्षक इत्यादि व्यवसायतज्ज्ञ* निर्माण करण्याचा असतो. सोविएत देशांत यंत्रकुशल कामगार व शेतकरी बनण्याचें शिक्षण देण्यासाठीं फॅक्टरी शाळा, रेल्वे शाळा, शेतकी शाळा, व निरनिराळ्या धंदेशाळा आहेत. दुय्यम प्रतीचे यंत्रज्ञ आणि व्यवसायतज्ज्ञ यांच्या शिक्षणाकरितां

टेक्निकुम् ( *Technicum* ) नांवाच्या संस्था आहेत आणि उच्च प्रतीचे इंजिनीयर व व्यवसायतज्ज्ञ यांच्यासाठीं उच्च शिक्षणसंस्था ( कॉलेजें ) आहेत.

या सर्व संस्था मोठया प्रमाणावर स्थापन होण्यास पहिल्या पंचवार्षिक योजनेपासून ( १९२८ ते ३२ ) सुरुवात झाली. या काळांत फॅक्टरी, रेल्वे इत्यादि धंदेशाळांतील विद्यार्थ्यांची संख्या १,६३,००० पासून ११,७७,००० पर्यंत म्हणजे *सात पट* वाढली; आणि त्यांमधून ४½ लक्ष कामगार शिक्षण घेऊन बाहेर पडले. टेक्निकुममधील विद्यार्थ्यांची संख्या २½ लक्षांपासून १० लक्षांपर्यंत ( *चौपट* ) वाढली आणि उच्च प्रतीचें यांत्रिक शिक्षण सुमारे *एक लक्ष* विद्यार्थ्यांनीं घेतलें. याच काळांत शेती सामुदायिक होऊन यांत्रिक पद्धतीनें करण्यास सुरुवात झाली होती. त्यासाठीं ट्रॅक्टरड्रायव्हर, गुरांचे तज्ज्ञ, यांत्रिक व विजेचीं साधनें वापरणारे यंत्रज्ञ अशा अनेक पेशांच्या लोकांची आवश्यकता होती. *पहिल्या पंचवार्षिक योजनेच्या काळांत एकूण ४५ लक्ष शेतकरी तरुणांनीं या निरनिराळ्या शास्त्रांचें शिक्षण घेतलें.*

प्रथमतः बहुसंख्य कामगार व शेतकरी निरक्षर होते ही यांत्रिक व औद्योगिक प्रगतीच्या मार्गांत मोठीच अडचण होती. ही अडचण दूर करण्यासाठीं प्रौढ कामगार व शेतकरी यांच्यासाठीं कारखाने व सामुदायिक शेतें यांना जोडून प्रौढशाळा काढण्यांत आल्या. या शाळांत प्रौढांना प्रथम साक्षर करण्यांत येऊन प्राथमिक शिक्षण देण्यांत येई आणि त्यानंतर धंदेशिक्षण अथवा शेतीशिक्षण दिलें जाई. ज्या लायक मनुष्यांना याहीपुढें शिकण्याची आकांक्षा असे त्यांना दुय्यम व उच्च शिक्षणापर्यंत मजल मारण्याची सोय केलेली होती. या प्रौढ शाळांचा फायदा घेऊन पूर्वी *निरक्षर असलेले किती तरी कामगार व शेतकरी उत्कृष्ट इंजिनियर, डॉक्टर किंवा प्रोफेसरहि झालेले आहेत!*

दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंत ( १९३२–३७ ) धंदेशिक्षण व व्यवसायशिक्षण यांची वाढ फार मोठया प्रमाणांत झाली. १९२८ ते १९३७ या दोन पंचवार्षिक योजनांच्या काळांत एकूण २० लक्ष विद्यार्थी फॅक्टरी, रेल्वे इत्यादि धंदेशाळांत शिकून यंत्रकुशल कामगार बनले आणि १५ लक्ष नवीन टेक्निशियन व व्यवसायतज्ज्ञ टेक्निकुममध्यें शिकून तयार झाले. लोखंड, पोलाद अशासारख्या मोठाल्या

कारखान्यांत असलेले इंजिनियर, टेक्निशियन व यंत्रकुशल कामगार यांच्या संख्येंत झालेल्या वाढीवरून या प्रगतीचा वेग लक्षांत येईल.

मोठ्या कारखान्यांतील यंत्रकुशल कामगारांची वाढ

| | | |
|---|---|---|
| साल | १९२८ | ९२ हजार |
| ,, | १९३० | ११२ ,, |
| ,, | १९३३ | ३७६ ,, |
| ,, | १९३७ | ६०४ ,, |
| (१९२८ च्या सहापटीहून अधिक) | | |

दुय्यम व्यावसायिक शाळांतील विद्यार्थी

| | | |
|---|---|---|
| साल | १९१४ | ३५,८०० |
| ,, | १९३८ | ९,४१,९०० |
| | | २७ पट वाढ |

तिसऱ्या पंचवार्षिक योजनेंतील (१९३७–४२) यंत्रीकरणाचा बेत एवढया मोठ्या प्रमाणावर होता कीं, तो यशस्वी होण्याकरितां यापुढें सर्व कामगार, शेतकरी व इतर पेशांचे लोक यांचें शास्त्रीय, यांत्रिक आणि व्यावसायिक ज्ञान अधिक उच्च प्रतीचें होणें अगत्याचें होतें. अर्थात् एकंदर शिक्षणाची पातळीच उंचावणें प्राप्त झालें. याच काळांत सक्तीचें सात वर्षांचें शिक्षण देशभर सर्वत्र अंमलांत आलें आणि दशवार्षिक शिक्षण सक्तीचें करण्यास शहरांमधून सुरुवात झाली. (ही योजना पुढें युद्धामुळें स्थगित झाली.) धंदेशिक्षण व व्यवसायशिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांमध्यें प्रचंड वाढ होण्याचा कार्यक्रम आंखण्यांत आला होता. केवळ फॅक्टरी शाळांतच (धंदेशाळांपैकीं एक प्रकार) १७ लक्ष यंत्रकुशल कामगार शिकविण्याची सोय होणार होती आणि टेक्निकुममध्यें ८ लक्ष यंत्रज्ञ तयार होणार होते. तसेंच अगदीं आधुनिक इंजिनियरिंगचें पांच वर्षांचें शिक्षण घेऊन पहिल्या प्रतीचे यंत्रविशारद इंजिनियर तयार होण्यासाठीं नवीन कॉलेजें काढण्यांत आलीं. याशिवाय रेल्वे, शेती व इतर धंद्यांचें

निरनिराळ्या दर्जांचें शिक्षण देण्याची विस्तृत प्रमाणावर व्यवस्था करण्यांत येणार होती. १९४२ पर्यंतच्या पांच वर्षांत केवळ औद्योगिक क्षेत्रांतच ९० लक्ष कामगारांना धंदेशिक्षण देण्यांत येणार होतें; हेतु हा कीं, *यापुढें प्रत्येक कामगाराला किमान यांत्रिक शिक्षण मिळालेलें असावें*. धंदेशिक्षण व व्यवसायशिक्षण यांबरोबरच सांस्कृतिक शिक्षणाची तरतूद व्यापक प्रमाणावर करण्यांत आली होती. ही योजना पुरी झाली असती तर सर्व प्रकारच्या शिक्षणक्षेत्रांत सोविएत देशाची फार मोठी प्रगति झाली असती यांत शंका नाहीं !

परंतु मध्यंतरीं युद्धाचे वारे वाहूं लागले आणि १९४१ च्या जून महिन्यांत सोविएत युनियनवर नाझी जर्मनीनें आक्रमण केल्यावर यांपैकीं अनेक शिक्षणयोजना स्थगित झाल्या; आणि युद्धाला आवश्यक व उपयुक्त असे कांहीं फेरफारहि झाले. आतां युद्ध संपलें आहे. परंतु युद्धांत झालेली भयंकर हानि शक्य तितक्या लवकर भरून काढण्यासाठीं पूर्वीच्या योजना जशाच्या तशा अंमलांत न येतां परिस्थितीला अनुरूप असे बरेच फेरफार त्यामध्यें केले जातील. पूर्ववत् स्थिति प्राप्त झाल्यावर मात्र पुन्हां शिक्षणक्षेत्रांतील प्रगतीलाहि जोरानें आरंभ होईल यांत शंका नाहीं.

युद्धापूर्वी ( १९४० सालीं ) सोविएत युनियनमध्यें धंदेशिक्षण व व्यवसायशिक्षण देणाऱ्या कोणत्या संस्था होत्या ? आणि त्यांमधील अभ्यासक्रम कोणत्या प्रकारचा होता ?

*१ फॅक्टरी, रेल्वे, शेतकी व इतर धंदेशाळा.*

सक्तीचें सात वर्षांचें शिक्षण संपल्यावर बहुसंख्य मुलें पंधराव्या वर्षी या शाळांत प्रवेश करतात. शिक्षणक्रम सामान्यपणें दोन वर्षांचा असून विद्यार्थ्यांचा सर्व खर्च सरकार सोसतें. अभ्यासक्रमांत सर्वसाधारण शिक्षणाचे ( *General Education* ) भाषा, इतिहास वगैरे विषय असून ज्या धंद्याचें शिक्षण घ्यावयाचें असेल तो धंदा व त्याला आधारभूत असणारें शास्त्रीय शिक्षण देण्यांत येतें. फॅक्टरींत अथवा अन्य उद्योगकेंद्रांत त्या धंद्यांचें प्रात्यक्षिक शिक्षण दिलें जातें. वर्गातील शिक्षण आणि प्रत्यक्ष काम यामध्यें प्रत्येकीं चार तास अशी दिवसांतील आठ तासांच्या वेळापत्रकांची विभागणी केलेली असते. कांहीं मुलें पंधराव्या वर्षी

धंदेशाळांत न जातां आणखी एक दोन वर्षे सर्वसाधारण शिक्षण घेऊन सोळा वर्षे पुरीं झाल्यावर धंदेशाळांत प्रवेश करतात. यांच्यासाठीं सहा महिन्यांचा छोटा अभ्यासक्रम असतो, पण त्याचें स्वरूप वरीलप्रमाणेंच असतें. शेतीशाळांचा खेडेगांवांतील शिक्षणाशीं संबंध असल्यामुळें आणि त्यांचें स्वतंत्र महत्त्व असल्यामुळें त्यांचा विचार या प्रकरणाच्या शेवटच्या विभागांत स्वतंत्रपणें केला आहे.

येथें एका गोष्टीचा उल्लेख करणें अवश्य आहे. *सोविएत युनियनमध्यें चौदा वर्षांखालील मुलांना कारखान्यांत अगर अन्य ठिकाणीं काम करण्यास कायद्यानें मनाई आहे.* चौदा ते सोळा वयाच्या मुलांनीं चार तासांपेक्षां अधिक काम करतां कामा नये आणि सोळा ते अठरा वयाच्या मुलांनीं सहा तासांपेक्षां अधिक वेळ राबतां कामा नये. पण या तरुण मुलांना पगार मात्र ( आठ तास काम करणाऱ्या ) प्रौढ कामगारांइतकाच दिला पाहिजे असा नियम आहे व त्यांच्या सांस्कृतिक शिक्षणाची व्यवस्थाहि केलेली असली पाहिजे.

### २ प्रौढ कामगारशाळा

धंदेशाळांचा अभ्यासक्रम संपवून जीवनांत पडणाऱ्या *तरुण कामगारांचा पुढील प्रगतीचा मार्ग बंद झालेला नसतो.* ही गोष्ट विशेष महत्त्वाची आहे. तीन वर्षें कामाचा अनुभव घेतल्यावर कामगारशाळांचा फायदा घेऊन त्यांना अधिक शिक्षण मोफत घेण्याची सोय असते. हुशारीप्रमाणें हे कामगार दुय्यम व उच्च प्रतीचें शिक्षणसुद्धां घेऊं शकतात. अनेक कामगार या संधीचा उपयोग करून उच्च दर्जाचे टेक्निशियन व इंजिनियर झाले आहेत.

### ३ टेक्निकुम

सक्तीचें सप्तवार्षिक शिक्षण संपल्यावर कांहीं विद्यार्थी टेक्निकुम संस्थांत दुय्यम प्रतीचें शिक्षण घेण्यासाठीं प्रवेश मिळवितात. कांहीं टेक्निकुममध्यें औद्योगिक, शेतीचें अथवा अन्य धंदेशिक्षण शिकविण्याची व्यवस्था असते आणि इतर संस्था वैद्यक, अध्यापन, कायदा ( संगीत, नाट्य, अभिनय, सिनेमा इत्यादिसुद्धां ) वगैरे पेशांचें शिक्षण देतात. शिक्षणक्रम तीन ते पांच वर्षांचा असतो. पहिलीं एक दोन

वर्षें अभ्यासक्रमाचें स्वरूप सर्वसाधारण असून ऐच्छिक विषयावर फारसा जोर असत नाहीं. पुढें मात्र निवडलेल्या धंद्यांचें अगर व्यवसायांचें शास्त्रीय, प्रायोगिक आणि प्रात्यक्षिक ज्ञान शिकविण्यांत येतें. याशिवाय रशियन किंवा मातृभाषा आणि वाङ्मय, समाजशास्त्र, मार्क्सवाद या विषयांचाहि समावेश केलेला असतो. कांहीं विशिष्ट धंद्यांच्या आणि व्यवसायांच्या अभ्यासक्रमांत इंग्रजी, फ्रेंच व जर्मन यांपैकीं एका परकीय भाषेचा विशेष अभ्यास अंतर्भूत असतो.

## *४ इंजिनियरिंग, औद्योगिक आणि इतर व्यवसाय–*

### *शिक्षणाच्या उच्च संस्था (कॉलेजें)*

या शिक्षणसंस्थांत प्रवेश करणाऱ्या विद्यार्थ्यांनीं सक्तीचें सात वर्षांचें शिक्षण घेतल्यानंतर आणखी तीन वर्षांचें वरिष्ठ दर्जाचें दुय्यम शिक्षण घेतलेलें असावें लागतें. हें दशवार्षिक शिक्षण उत्तम तऱ्हेनें पार पडलेलें असावें लागतें आणि शिवाय या कॉलेजांत प्रवेश मिळविण्यासाठीं त्या त्या कॉलेजची प्रवेश परीक्षा समाधानकारकपणें पास झालेली असली पाहिजे. अभ्यासक्रम साडेचार पांच वर्षांचा असून ऐच्छिक व्यवसायाच्या शास्त्रीय, प्रायोगिक व प्रत्यक्ष ज्ञानाबरोबरच समाज-शास्त्र, इतिहास, अर्थशास्त्र, मार्क्सवाद यांचें शिक्षण दिलें जातें. इंग्रजी, फ्रेंच किंवा जर्मन यांपैकीं एका भाषेचा अभ्यास सुमारें चार वर्षें करावा लागतो. अलीकडे इंग्रजी भाषेलाच अधिक प्राधान्य देण्यांत येतें. हें उच्च शिक्षण घेऊन बाहेर पडणारे विद्यार्थी उच्च प्रतीचे इंजिनियर, यंत्रविशारद, शेतकीतज्ज्ञ किंवा डॉक्टर, प्रोफेसर इत्यादि त्या त्या पेशांचे वरिष्ठ प्रतीचे तज्ज्ञ बनतात.

या उच्च शिक्षणसंस्थांपैकीं *निम्म्याहून अधिक (चारशेंहून अधिक) कॉलेजें औद्योगिक, इंजिनियरिंग अथवा शेतकीचीं आहेत*. शिकविण्यासाठीं त्या त्या शाखेंतील अनुभवी व नांवाजलेले तज्ज्ञ नेमलेले असून इमारती, साधनसामुग्री व संशोधन, यांवर खर्च करतांना पैशाची कदर कधींच बाळगली जात नाहीं. उपकरणें व साधनें यांच्या बाबतींत या संस्था जगांतील इतर कोणत्याहि देशांतील टेक्निकल कॉलेजांना हार जाणार नाहींत असें कांहीं इंग्रज व अमेरिकन इंजिनियरांचें मत आहे. याविषयीं अधिक माहिती पुढील प्रकरणांत दिली आहे.

एक महत्त्वाची गोष्ट अशी कीं, सोविएत युनियनमध्यें प्रचलित असलेल्या शंभराहून अधिक भाषांपैकीं ६० भाषांमधून धंदेशिक्षण व व्यवसायशिक्षण घेण्याची सोय आहे. आणि या भाषांमधून औद्योगिक व यांत्रिक विषयांस वाहिलेलीं नियतकालिकें प्रसिद्ध होतात ! दुसरी महत्त्वाची गोष्ट ही कीं, धंदेशिक्षण व व्यवसायशिक्षण यांबरोबरच सर्वसाधारण शिक्षण ( *General Education* ) मिळून प्रत्येक यंत्रज्ञ कामगार अथवा व्यवसायतज्ज्ञ, मग तो कोणत्याहि दर्जाचा असो, त्याची सांस्कृतिक पातळी उंचावलेली असावी अशी योजना अभ्यासक्रमांत केलेली दिसते. शिवाय या सर्व शिक्षणसंस्थांत अभ्यासक्रमाबाहेर *छंदमंडळांची* ( *Circles* ) व्यवस्था केलेली असून आपल्या आवडीचे विषय व छंद अनुसरून आपला सांस्कृतिक विकास करून घेण्याची भरपूर तरतूद असते. या संस्थांतील इतर विशेषांचा उल्लेख विस्तार-भयास्तव टाळला आहे. येथें एवढेंच सुचविणें अवश्य आहे कीं, *सामायिक दृष्टिकोन* ( *Collective Outlook* ), *समाजकार्य* ( *Social Work* ), *स्वायत्तता* ( *Self-Government* ) इत्यादि इतर सोविएत शिक्षणसंस्थांत आढळणारे सर्व विशेष येथेंहि प्रामुख्यानें दिसून येतात.

## युद्धकालीन धंदेशिक्षण

१९४० सालीं युद्धाचीं चिन्हें दिसूं लागतांच औद्योगिक व धंदेशिक्षणामध्यें एक अतिशय महत्त्वाचा बदल करण्यांत आला. दरवर्षी आठ ते दहा लक्ष तरुण मुलांना ( आपण होऊन इतकीं मुलें पुढें न आल्यास सक्तीनें ) टेक्निकल शिक्षणाकडे वळविण्याचें ठरविण्यांत आलें.

बेकारी साफ नष्ट झाली होती आणि सामुदायिक शेतीमध्यें उत्पन्नाचें मान वाढलें होतें; यामुळें अकस्मात् नवीन कारखाने अगर उद्योगधंदे युद्धोत्पादनाकरितां सुरू करण्याचा प्रसंग आला तर त्याकरितां आवश्यक असलेला राखीव कामगारवर्ग सोविएत युनियनमध्यें शिल्लक राहिलेला नव्हता. १९३७ मध्यें पॉलिटेक्निकल शिक्षणांतील वर्कशॉप कामाचा भाग शाळेतील अभ्यासक्रमांतून काढून टाकण्यांत आला होता. तसेंच पुष्कळ मुलें ( विशेषतः शहरांतील ) सात वर्षांचें शिक्षण संपल्यावर एकदम धंदेशिक्षणाकडे न वळतां आणखी तीन वर्षांचें दुय्यम शिक्षण घेत असत. यामुळें उद्योगधंद्यांत या मुलांचा प्रवेश होणें तीन वर्षांनीं लांबणीवर पडत असे.

युद्धाचा धोका वाढूं लागला तशी यंत्रकुशल कामगाराची वाण भासूं लागली आणि या असमाधानकारक परिस्थितीला वेळींच तोंड देण्यासाठीं वरील बदल करण्यांत आला.

याच वेळीं धंदेशिक्षण सोडून इतर उच्च शिक्षणाकरितां फी घेण्यास सुरुवात झाली होती. या दोन्ही योजनांचा इष्ट परिणाम ताबडतोब दिसून आला. पूर्वी ज्या मुलांचा खरोखरी उच्च शिक्षणाकडे विशेष ओढा नसे अशीं मुलेंसुद्धां सात वर्षांचें शिक्षण संपल्यावर स्वतःचा भावी धंदा किंवा व्यवसाय ताबडतोब निश्चित न करतां आपोआप आणखी तीन वर्षांचें दुय्यम शिक्षण घेत असत. वरील योजना अमलांत आल्यावर त्यांना हें आधींच निश्चित करणें भाग पडलें आणि धंदेशिक्षणाच्या नवीन योजनेमुळें आपला धंदा निश्चित करणें सुलभहि झालें. यामुळें उच्च शिक्षणाकडे जात्या ओढा नसलेल्या मुलांचा प्रश्न सुटून त्यांचीं तीन वर्षें व शक्ति यांचा अपव्यय टळला.

या नवीन योजनेप्रमाणें धातुकामगार, केमिस्ट, खाणकामगार, दर्यावर्दी व रेल्वे वाहतुकीसाठीं लागणारे कामगार, मेकॅनिक, फिटर यांच्या शिक्षणासाठीं दोन वर्षांचा शिक्षणक्रम, धंदेशाळा व रेल्वेशाळा यांमध्यें आंखण्यांत आला होता. आणि खाणकाम, घरबांधणी, वगैरे धंद्यांसाठीं सहा महिन्यांचा छोटा अभ्यासक्रम ठरविण्यांत आला होता. दोन वर्षांच्या अभ्यासक्रमाला चौदा पंधराव्या वर्षी सुरुवात होत असून सहा महिन्याचा अभ्यासक्रम सोळा वर्षें पुरीं झाल्यावर सुरू होत असे. विद्यार्थ्यांचा सर्व खर्च सरकार करणार होतें. मात्र शिक्षण संपल्यावर चार वर्षें तरी सरकारी कारखान्यांत काम केलें पाहिजे अशी अट होती. त्यानंतर त्यांना वाटेल त्या व्यवसायाचें शिक्षण घेण्याची मुभा होती आणि असें शिक्षण देण्याची व्यवस्थाहि केली जाणार होती. मुलींना या योजनेंत सामील होण्याची सक्ति नव्हती; सामील होणें वा न होणें त्यांच्या इच्छेवर ठेवण्यांत आलें होतें. शिक्षणाच्या अवधींत ज्या विद्यार्थ्यांकडून उत्पादनाला उपयुक्त असें प्रत्यक्ष काम होईल त्याबद्दल त्यांना पैशाच्या रूपानें मोबदला देण्यांत येत असे.

अभ्यासक्रमांत, त्या त्या धंद्याला आवश्यक असलेलें, विज्ञान, गणित या विषयाचें शिक्षण आणि वर्कशॉप अगर कारखाना यांमधील प्रत्यक्ष काम यांना दिवसांतून पांच तास दिलेले असून बाकीचे दोन तास भाषा, वाङ्मय, शारीरिक व लष्करी शिक्षण

यांना वाहिलेले असत. सांस्कृतिक शिक्षणासाठीं छंदमंडळें व इतर करमणुकीचे कार्यक्रम यांची उत्तम योजना होती हें सांगणें नकोच.

सक्तीचा अवलंब करण्यापूर्वी विद्यार्थ्यांच्या देशाभिमानाला आवाहन करून या योजनेंत स्वयंस्फूर्तपणें दाखल होण्यास पाचारण करण्यांत आलें. सभा, व्याख्यानें, वर्तमानपत्रें, सिनेमा, रेडिओ यांच्या सहाय्यानें या योजनेची सर्वत्र प्रसिद्धि करण्यांत आली. या उपायांना एवढें प्रचंड यश आलें कीं, जरूर असलेल्या संख्येच्या दुप्पट विद्यार्थ्यांनीं आपलीं नांवें नोंदविलीं ! ज्या उद्योगकेंद्रांच्या शाळांत हे विद्यार्थी शिक्षण घेणार होते त्या ठिकाणीं त्यांचें आगमनप्रसंगीं थाटाचें जाहीर स्वागत करण्यांत आलें !

सर्व विद्यार्थ्यांची राहाण्याची व शिक्षणाची सर्व व्यवस्था करण्याची जबाबदारी निरनिराळ्या उद्योगकेंद्रांनीं उचलली होती शिक्षकवर्ग, इमारती, वर्कशॉप व उपकरणें जमविण्यास थोडा अवधि मिळाला असूनहि ठरल्या तारखेस ६०० औद्योगिक शाळा, १०० रेल्वेशाळा आणि ८०० हून अधिक फॅक्टरी शाळा सुरू झाल्या. यासाठीं १०००० संचालक, २५,००० यंत्रविद्येचे शिक्षक आणि हजारों इतर शिक्षक मिळवावे लागले. सोविएत युनियनमध्यें योजनाबद्ध व्यवस्था असल्यामुळें आणि सामाजिक जबाबदारीची योग्य जाणीव असल्यामुळें सक्तीचे उपाय न योजतांच थोडक्या काळांत एवढी मोठी योजना पार पडली हें उघड आहे. युद्धोत्पादनाला या योजनेची प्रचंड मदत झाली आणि अशा रीतीनें तिचें उद्दिष्ट उत्कृष्टपणें सफल झालें.

## *खेड्यांतील शाळा व शेतीशिक्षण*

आतां खेड्यांतील शिक्षणसंस्थांचा कांहींसा साकल्यानें विचार करूं. आजकाल हिंदुस्थानांतील सध्यांचें राहणीचें निकृष्ट मान सुधारण्यासाठीं आर्थिक नियोजनाचे अनेक कार्यक्रम सुचविण्यांत येत आहेत. आर्थिक नियोजनाच्या कोणत्याहि योजनेंत हिंदी शेतकरी जीवनाची सुधारणा हें अतिशय महत्त्वाचें अंग असलें पाहिजे. पंचवीस वर्षांपूर्वी सोविएत देशांतील शेतकरी आपल्याइतकाच दरिद्री व मागासलेला होता. आज तो अद्यावत् शास्त्रीय संशोधनाचा व यांत्रिक साधनांचा उपयोग करीत आहे. शहरी व ग्रामीण जीवन यांमधील परंपरागत अंतर आज तेथें किती तरी कमी झालें

आहे. या सुधारणेंतील एक महत्त्वाचा भाग ज्यांनीं उचलला त्या खेड्यांतील शिक्षण-संस्थांची विशेष माहिती आपणांस उद्बोधक ठरेल.

प्रथम प्रथम निरक्षर शेतकऱ्यांना साक्षर करून शेतीचें नव्या पद्धतीचें शिक्षण देण्यासाठीं *तरुण शेतकरी शाळा* (*Peasant Youth School*) मोठ्या प्रमाणावर उघडण्यांत आल्या. तेथें बारा वर्षांवरील मुलांना तीन वर्षें शिक्षण देण्यांत येई. अभ्यासक्रमांत प्राथमिक सर्वसाधारण शिक्षण आणि शेतीचें शास्त्रीय शिक्षण यांचा समावेश होत असे. १९३४ सालीं प्राथमिक शिक्षण सर्वत्र सक्तीचें झाल्यावर अशा शाळांची आवश्यकता राहिली नाहीं.

सध्यां खेड्यांतील शिक्षणसंस्था व शिक्षणक्रम शहरांतल्याप्रमाणेंच असतात. शाळकरी वयाचीं विसांहून अधिक मुलें जेथें असतील तेथें शाळा उघडलीच पाहिजे. याहून कमी मुलें असल्यास अनेक खेडीं मिळून एक शाळा चालविली जाते. पण बारा वर्षांखालील मुलांना शाळेंत जाऊन येण्यासाठीं दोन मैलांहून अधिक चाल पडतां कामा नये. शाळा याहून दूर असल्यास सामायिक शेतानें (*Collective Farm*) मुलांना नेण्याआणण्यासाठीं वाहन आणि शाळेंत गरम जेवण यांची व्यवस्था केली पाहिजे. शाळेचें अंतर फारच अधिक असल्यास विद्यार्थ्यांसाठीं वसतिगृहाची सोय करण्यांत येते. *अभ्यासक्रम अगदीं शहरी शाळांसारखाच असतो. अर्थात् खेड्यांतील मुलें सुद्धां बारा वर्षांनंतर इंग्रजी, फ्रेंच किंवा जर्मन यासारखी परकीय भाषा शिकतात!* मात्र गणित व शास्त्रीय विषय शिकवितांना त्यांचा संबंध खेड्यांतील जीवनाशीं जोडण्यांत येतो. १९३७ सालीं पॉलिटेक्निकल शिक्षणांतील प्रात्यक्षिक कामाचा भाग बंद झाल्यामुळें त्याकडे दुर्लक्ष झालें; परंतु ही चूक १९४० मध्यें सुधारण्यांत येऊन शाळेला १॥ एकर जमीन प्रत्यक्ष प्रयोगासाठीं देण्यांत आली. शेतीचीं यांत्रिक औतें व वर्कशॉप यांचा वापर करून मुलांना शेतीविषयक प्रत्यक्ष ज्ञान व अनुभव मिळविण्यास उत्तेजन दिलें पाहिजे असा कटाक्ष ठेवण्यांत येतो. भोंवतालच्या प्रदेशांतील सुधारलेली कृषिपद्धति आणि कृषिसंशोधन चालू असलेल्या ठिकाणांस वारंवार भेट देणें आवश्यक करण्यांत येतें. परंतु मुलांना *प्रत्यक्ष शेतीसाठीं कधींहि राबवितां कामा नये* असा सक्त नियम आहे. शाळेंतील शिक्षकांस सर्व शेतीशिक्षणसंस्था शेतीविषयीं सर्व आधुनिक माहिती पुरवितात व प्रात्यक्षिकांमध्यें मदत करतात. सक्तीचें सप्तवार्षिक शिक्षण

संपल्यावर बहुसंख्य मुलें सामुदायिक शेताला अथवा सरकारी शेताला जोडून चालविलेल्या शेतीशाळेंत प्रवेश करतात. तेथें शेतीच्या निरनिराळ्या शाखांचें विशेष शिक्षण दिलें जातें आणि शिवाय सर्वसाधारण ( *General* ) दुय्यम शिक्षणाची व सांस्कृतिक शिक्षणाची तरतूद केलेली असते. 'कोमसोमोल' ही तरुण कम्युनिस्टांची संस्था या कामीं विशेष पुढाकार घेते. या संस्थेतर्फे क्लब व छंदमंडळें चालविण्यांत येतात.

कांहीं मुलें टेक्निकुममध्यें प्रवेश करून दुय्यम व्यवसायशिक्षण ( यांत्रिक नांगर चालविणें, मेकॅनिक वगैरे ) घेतात. सामुदायिक शेतासाठीं शिक्षक, डॉक्टर, हिशेबनीस ( अकौंटंट ) इत्यादि पेशांच्या लोकांचीहि जरूर असते. कांहीं हुशार मुलें दशवार्षिक शिक्षण घेऊन विश्वविद्यालयांत जातात. यांतून कांहीं उच्च प्रतीचे शेतकी-तज्ज्ञ, इंजिनियर, डॉक्टर होतात तर दुसरे कांहीं वाङ्मय, कला, संगीत या प्रांतांत प्रावीण्य मिळवितात. *खेड्यांतील मुलाला केवळ तो खेड्यांतील असल्यामुळें उच्च शिक्षणाला पारखें व्हावें लागत नाहीं.* उच्च शिक्षण घेणाऱ्या शेतकरी मुलांचें एकूण विद्यार्थीसंख्येशीं प्रमाण एका वर्षी शेंकडा ३५ इतकें मोठें होतें. ही घटना ध्यानांत घेण्यासारखी आहे.

शहरी व ग्रामीण जीवनांतील द्वंद्व व अंतर कमी करावयाचें असेल तर एकंदर देशाच्या समाजांतील आपलें स्थान व कार्य शहरी जनतेपेक्षां कमी मानाचें किंवा कमी महत्त्वाचें नाहीं असा विश्वास खेड्यांतील शेतकरी जनतेला पटावा लागतो. असा परस्पर विश्वास उत्पन्न होण्यासाठीं सोविएत देशांत अनेक प्रयत्न करण्यांत आले आहेत. *खेड्यांतील प्राथमिक व दुय्यम शाळा यांमधील शिक्षकवर्ग व साधनसामुग्री शहरी शाळांपेक्षां कोणत्याहि प्रकारें कमी प्रतीची असूं नये याबद्दल विशेष दक्षता घेतली जाते. शेतीविषयक उच्च शिक्षणसंस्था विश्वविद्यालयांच्या तोलाच्या समजल्या जातात आणि शेतीविषयक संशोधन करतांना खर्चाची फिकीर केली जात नाहीं.* कांहीं सामुदायिक शेतांना जोडून नर्सरी शिक्षणापासून तों संशोधन कार्यापर्यंत सर्व व्यवस्था असलेल्या संस्था ( *Agricultural Kombinar* ) स्थापण्यांत आल्या आहेत. त्या त्या प्रादेशिक विभागांतील शेतीला अनुरूप अशा विशिष्ट संशोधनाला उत्तेजन देण्यासाठीं *छोट्या प्रयोगशाळा* ( *Cottage Laboratories* ) उघडल्या

आहेत. खेड्यांतील शाळेला जोडून मुलांचीं सृष्टिज्ञानमंडळें चालविण्यांत आलेलीं असतात व मधून मधून नामांकित शास्त्रज्ञ व प्रोफेसर येऊन त्यांच्या कार्यांत लक्ष घालतात. उलट शहरी शाळांतील सृष्टिज्ञान मंडळें शेतकीविषयक प्रश्नांचा अभ्यास करतात व शाळेंतील मुलांना शेजारच्या सामुदायिक शेतावर नेऊन शेतीचें ज्ञान व महत्त्व मुलांच्या मनावर ठसविण्यांत येतें.

सोविएत शिक्षक खेड्यांतील सांस्कृतिक जीवनाचें केंद्रस्थान असल्यामुळें त्याची भूमिका व कार्य अतिशय महत्त्वाचें असतें. *बाहेरच्या जगांतून ज्ञान व प्रगति यांचें लोण खेड्यांतील जनतेप्रत पोंचवून तिची सांस्कृतिक उंची वाढविण्याची जबाबदारी शिक्षकावर असते.* अर्थात् सोविएत शिक्षकाला खेड्यांत मोठा मान असतो व सर्व लोक त्याच्याकडे आदरानें पहातात. आपली भूमिका त्याला यशस्वी रीतीनें पार पाडतां यावी यासाठीं *सोविएत सरकार खेड्यांतील शिक्षकाला रजा, पगार याविषयी विशेष सवलती* देतें. शिक्षकाला आपलें ज्ञान अद्यावत् ठेवून उत्तरोत्तर विकास करून घेतां यावा यासाठीं प्रादेशिक शिक्षणसंस्था ( *District Education Bureau* ) पत्रव्यवहारानें आणि हंगामी शिक्षणवर्ग चालवून मदत करतात. अध्यापनशास्त्रांतील व इतर शास्त्रीय प्रगति अवगत करून घेण्यासाठीं शिक्षकाला दीर्घकाल रजा मिळण्याची आणि उच्च शिक्षणसंस्थांत प्रवेश मिळण्याची व्यवस्था केलेली असते. खेड्यांतील उत्तम शिक्षकांना "*सोविएत युनियनचा सन्मान्य शिक्षक*" ( *Honoured Teacher of the Soviet Union* ) अशी पदवी देऊन सरकारकडून जाहीर सत्कार व कृतज्ञता दर्शविली जाते.

खेड्यांतील शिक्षणसंस्था, तेथें चाललेलें काम व संशोधन यांना वर्तमानपत्रांतून खास प्रसिद्धि दिली जाते आणि या संस्थांना साधनसामुग्रीची कमतरता असल्यास किंवा कारभारांत दोष दिसल्यास त्या स्पष्टपणें जनतेपुढें मांडून त्यावर योग्य इलाज करण्यास सरकारला भाग पाडण्यांत येतें. नमुनेदार शाळांचा जाहीरपणें गौरव करून व वाईट शाळांवर प्रखर टीका करून वृत्तपत्रें आपल्या कर्तव्याला जागतात. सामुदायिक शेताच्या सोविएत सभेंत "*आपल्या*" शाळेविषयीं अभिमान बाळगणारे आणि शिक्षणाविषयीं कळकळ असणारे उत्साही सभासद "*आपल्या*" शाळेला इमारत, उपकरणें, शिष्यवृत्त्या वगैरे रूपानें शक्य होईल ती सर्व मदत

करण्याविषयीं आग्रह धरतात. "*आपली*" शाळा नमुनेदार व्हावी या हेतूनें अनेक सामुदायिक शेतांमध्यें आपापसांत स्पर्धा सुरू होते आणि याचा परिणाम त्या प्रदेशांतील सर्व शाळांचा दर्जा वाढण्यांत होतो.

शहरी व ग्रामीण जीवन यांमध्यें एक नवीन प्रकारचा स्नेहभाव कसा निर्माण झाला आहे याचें प्रत्यंतर या युद्धांत अनेकदां आलें आहे. कित्येक शाळांतील शिक्षक व प्रौढ विद्यार्थी यांनीं स्वेच्छेनें पेरणीकापणीच्या हंगामांत व शेतीच्या इतर कामांत बहुमोल मदत केली. कित्येक विद्यार्थ्यांनीं आपल्या सुट्या सामुदायिक शेतांवर काम करण्यांत घालविल्या. अनेक शहरी शाळांत विज्ञान व रसायन यांच्या विशेष अभ्यासाऐवजीं शेतीचें शिक्षण दिलें जात होतें. अनेक विद्यार्थी शेतावरील ट्रॅक्टर व इतर यांत्रिक साधनें वापरण्याच्या कामांत तरबेज झाले. १९४२ सालच्या जून महिन्यापावेतों म्हणजे अवघ्या एक वर्षाच्या युद्धकालांत सुमारें २० लक्ष मुली व मुलें यांनीं स्वतंत्रपणें शेतावर काम करतां येईल इतकें शेतीचें शिक्षण घेतलें होतें !

# उच्च शिक्षण ७

सोविएत युनियनमधील उच्च शिक्षणसंस्था, कॉलेजें व विश्वविद्यालयें ( *Universities* ), यांमधील अभ्यासक्रम, विद्यार्थीवर्ग यांविषयीं योग्य कल्पना येण्यासाठीं थोडी मागें, झारशाहीच्या काळाकडे, दृष्टि फेंकणें अवश्य आहे. झारशाही रशियांत कांहीं विशिष्ट कॉलेजें व विश्वविद्यालयें यांचा शैक्षणिक दर्जा बराच उच्च प्रतीचा होता यांत शंका नाहीं. रशियांतील कित्येक प्राध्यापक आणि शास्त्रज्ञ यांचीं नांवें सर्व जगाच्या परिचयाचीं होतीं. परंतु अशा व्यक्ति आणि संस्था यांची संख्या अतिशय लहान होती. उच्च शिक्षणाचा लाभ फक्त धनिक वर्गाला व कांहीं प्रमाणांत मध्यम वर्गाला मिळत असे. शेतकरी आणि कामगार कुटुंबांतून कॉलेजांत जाणारे विद्यार्थी विरळा, आणि रशियन साम्राज्यांतील परतंत्र राष्ट्रांत उच्च शिक्षणाची सोय जवळ जवळ नव्हतीच असें म्हटलें तरी चालेल. गेल्या पंचवीस वर्षांत ही परिस्थिति झपाट्यानें बदलत गेली असून आतां सोविएत युनियनमध्यें उच्च शिक्षणसंस्थांचें जाळें सर्वत्र पसरलें आहे. उच्च शिक्षणाच्या क्षेत्रांत सोविएत देशानें किती मोठी प्रगति केली आहे याची कल्पना पुढील आंकड्यांवरून येईल.

उच्च शिक्षणाची प्रगति

| | सन १९१४ | सन १९४१ |
|---|---|---|
| उच्च शिक्षणसंस्था ( कॉलेजें ) | ९१ | ७५० |
| विश्वविद्यालयें | १० | २३ |
| विद्यार्थ्यांची संख्या | १,१२,००० | ६,२९,८९७ |

१९१४ सालीं अवघ्या १६ शहरांमध्यें सर्व कॉलेजें सामावलेलीं होतीं. *पेत्रोग्राद*, सध्यांचें *लेनिनग्राद*, ( ३५ कॉलेजें ) आणि *मॉस्को* ( २० कॉलेजें ) या दोन राजधान्यांमध्येंच निम्मीं कॉलेजें होतीं ! पण १९३८ मध्यें निरनिराळ्या १५४ शहरांमध्यें कॉलेजें उघडलेलीं होतीं. झारशाहींतील विश्वविद्यालयें फक्त ८ शहरांत वसलेलीं होतीं, तर १९३८ मध्यें २३ शहरांत विश्वविद्यालयें स्थापण्यांत आलीं होतीं. प्रत्येक स्वतंत्र व स्वायत्त राष्ट्राच्या राजधानींत त्या राष्ट्राचें आतां स्वतंत्र विश्व-विद्यालय आहे. झारशाहीच्या काळांत इतर पाश्चात्य राष्ट्रांच्या खूपच मागें असलेला सोविएत देश आज इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी इत्यादि देशांच्या पुढें गेला आहे, आणि एक अमेरिका वगळली तर उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांचें प्रमाण आज सोविएत युनियनमध्येंच सर्वांत अधिक आहे.

अशी ही मोठी प्रगति कसकशी होत गेली याचें ऐतिहासिक समालोचन प्रथम थोडक्यांत करूं. समाजवादी क्रांतीनंतरच्या पहिल्या कांहीं वर्षांत उच्च शिक्षणसंस्थां-मधील प्रोफेसरवर्ग नव्या सत्तेविषयीं उदासीन होता, इतकेंच नव्हे तर कित्येक वेळां उघड उघड विरोधी होता. यामुळें सुमारें १९२७ सालापर्यंत सोविएत देशांत उच्च शिक्षणाची पद्धतशीर प्रगति होऊं शकली नाहीं. पण कॉलेजांत येणाऱ्या तरुण विद्यार्थिवर्गापैकीं बरीच संख्या कामगारवर्गाची असल्यामुळें विद्यार्थिवर्ग मात्र अतिशय उत्साही आणि क्रांतीचा पाठपुरावा करणारा होता. प्रथम प्रथम कॉलेजांतील कारभार आणि व्यवस्था या तरुण विद्यार्थ्यांच्या हातीं होती. पहिल्या पंचवार्षिक योजनेच्या काळांत देशाच्या औद्योगिक व आर्थिक प्रगतीचें पाऊल वेगानें पुढें पडण्यास सुरुवात झाली. नव्या आर्थिक व्यवस्थेचीं सूत्रें हातीं घेण्याला योग्य अशी विचारसरणी

अंगीकारलेला तरुण सुशिक्षित वर्ग या अवधींत तयार झाला होता. कित्येक सुशिक्षित तरुण आतां अध्यापक म्हणून कॉलेजांत शिकवूं लागले होते. यामुळें वरील परिस्थितींत बदल होऊं लागला. तसेंच यांत्रिक व आर्थिक प्रगतीचा वेग वाढवण्यासाठीं उच्च शिक्षणाचा दर्जा वाढणें जरूरीचें होतें. सन १९२७ ते ३१ च्या दरम्यान उच्च शिक्षणांतील विरोधी वातावरण नाहींसें होऊन जुना व नवा प्रोफेसरवर्ग देशाच्या प्रगतींत जातीनें लक्ष घालूं लागला. उच्च शिक्षणाची पुनर्घटना होऊन शिक्षणाची पातळी अधिकाधिक उंच झाली पाहिजे, यासाठीं निरनिराळ्या नवीन सुधारणा अंमलांत येणें जरूर आहे, अशा प्रकारची मागणी अध्यापकवर्गांतूनच पुढें येण्यास सुरवात झाली.

अखेर १९३३ सालीं उच्च शिक्षणामध्यें महत्त्वाचे फेरबदल करण्यांत येऊन उच्च शिक्षणाची नवी योजना सर्वत्र अंमलांत आली. प्रथमच यावेळीं, कॉलेजांत प्रवेश मिळण्यापूर्वी प्रवेशपरीक्षा घेण्यांत यावी, असा नियम करण्यांत आला. कॉलेजची व्यवस्था व कारभार यांचा भार विद्यार्थ्यांच्या शिरावरून उचलण्यांत येऊन कॉलेजांतील शिक्षणविषयक व इतर सर्व प्राथमिक जबाबदारी कॉलेजचा संचालक ( डायरेक्टर ) आणि प्राध्यापक वर्ग यांवर टाकण्यांत आली. यापूर्वीच उच्च शिक्षणाला उत्तेजन देण्याच्या हेतूनें विद्यार्थ्यांस शिष्यवृत्ति आणि इतर सवलती देण्यास सुरवात झाली होती. प्राध्यापकवर्गाच्या सुखसोयीकडे आतां विशेष लक्ष पुरविण्यांत येऊं लागलें. १९३३ पासून आजपावेतों उच्च शिक्षणाचा दर्जा अधिकाधिक वाढावा या उद्देशानें अनेक नवीन सुधारणा करण्यांत आल्या आहेत. त्यांचा उल्लेख येथें विस्तारभयास्तव टाळला आहे. सन १९२८-३७ या दोन पंचवार्षिक योजनांच्या काळांत एकंदर ५,६८,००० विद्यार्थी उच्च शिक्षण घेऊन बाहेर पडले. आणि सन १९३६, ३७ आणि ३८ या वर्षी दरसाल सुमारें १ लक्ष विद्यार्थी कॉलेजशिक्षण घेऊन निरनिराळ्या व्यवसायांचे तज्ज्ञ बनले. उच्च शिक्षणांत झालेल्या वाढीची कल्पना पुढील आंकड्यांवरून येईल.

उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या

| साल | संख्या |
|---|---|
| १९१४ | ११२ हजार |
| १९२७ | १६८ ,, |
| १९३२ | ५०४ ,, |
| १९३८ | ५५० ,, |
| १९४० | ६०५ ,, |
| १९४१ | ६२० ,, |

या प्रगतीचा आढावा घेतांना दोन गोष्टींचा निर्देश करणें जरूर आहे. उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांतील बहुसंख्य विद्यार्थी आतां कामगार व शेतकरी या बहुजनसमाजांतून येतात. पहिलीं कांहीं वर्षें तर त्यांचीच निवड सर्वांआधीं करण्यांत येत असे. १९३३ सालीं कॉलेजांत प्रवेश मिळालेल्या विद्यार्थ्यांत कामगारशाळांत शिकून आलेल्या, पद्धतशीर दुय्यम शिक्षण न मिळालेल्या, विद्यार्थ्यांचें ( व कामगारांचें ) प्रमाण शेंकडा ४९·४ इतकें मोठें होतें. त्याशिवाय शेतकरी व कामगार-वर्गाचीं दुय्यम शिक्षण घेतलेलीं तरुण मुलें होतीं तीं वेगळींच. दुसरी गोष्ट अशी कीं, पूर्वीप्रमाणें आतां बौद्धिक उच्च शिक्षणावर ( *Academic Education* ) वर फाजील भर दिला जात नसून यांत्रिक व व्यावसायिक उच्च शिक्षणाकडे अधिक लक्ष पुरविण्यांत येऊं लागलें. १९१४ सालीं उच्च शिक्षण घेणाऱ्या एकंदर १,१२,००० विद्यार्थ्यांपैकीं फक्त ३०,००० ( म्हणजे शेंकडा २७ ) विद्यार्थी यांत्रिक, शेतकी-विषयक अथवा व्यावसायिक शिक्षण घेत होते; तर सन १९३१ मध्यें शेंकडा ९० विद्यार्थी या प्रकारचें शिक्षण घेत होते. सध्यां बौद्धिक शिक्षण आणि यांत्रिक व व्यावसायिक शिक्षण यांचें महत्त्व सारखेंच समजलें जात असून देशाच्या गरजेप्रमाणें त्या त्या विषयांच्या नवीन उच्च शिक्षणसंस्था उघडण्यांत येत आहेत. टेक्निकल व शेतकी कॉलेजांच्या संख्येंत झालेली वाढ पुढील आंकड्यांवरून स्पष्ट होते.

टेक्निकल व शेतकी कॉलेजांची वाढ

| साल | १९१४ | १९३६ | कितीपट वाढ |
|---|---|---|---|
| टेक्निकल कॉलेजें | १६ | १६० | दहा पट |
| शेतकी ,, | ९ | ९० | दहा पट |

१९३९ सालीं एकंदर उच्च शिक्षणसंस्थांमध्यें १०,००० प्राध्यापक व ४०,००० इतर शिक्षकवर्ग काम करीत होते; यांपैकीं निम्मे अध्यापक यांत्रिक किंवा शेतकी कॉलेजांत शिकवीत होते. विद्यार्थ्यांची संख्या पाहिली तर, १९३८ सालीं उच्च शिक्षण घेणाऱ्या एकूण ५,५०,००० विद्यार्थ्यांपैकीं ४७,७०५ ( म्हणजे शें. ९ ) विद्यार्थी बौद्धिक उच्च शिक्षण घेत असून बाकीचे शेंकडा ९१ विद्यार्थी यांत्रिक, शेतकी-विषयक अथवा व्यावसायिक शिक्षण घेत होते. तिसऱ्या पंचवार्षिक योजनेमध्यें इतर शिक्षणक्षेत्रांप्रमाणें उच्च शिक्षणामध्येंही विलक्षण प्रगति व्हावी असा कार्यक्रम आंखलेला होता. युद्धकाळांत अर्थातच हा बेत पुढें ढकलावा लागला.

उच्च शिक्षणाची सध्यांची योजना काय आहे याचा तपशीलवार विचार आतां करूं.

उच्च शिक्षणाच्या संस्था दोन प्रकारच्या आहेत.

*१ विश्वविद्यालयांना जोडून बौद्धिक शिक्षणाचीं कॉलेजें* ( *Academic Education* ) उघडण्यांत आलेलीं आहेत आणि त्यांमध्यें भाषा, वाङ्मय, इतिहास, भूगोल, निरनिराळे शास्त्रीय विषय यांचा अभ्यास केला जातो. येथील अभ्यासक्रम पांच वर्षांचा असतो व तो पुरा करून बाहेर पडणारे पदवीधर संशोधन-संस्थांत संशोधनाचें अथवा शिक्षणसंस्थांत अध्यापनाचें काम करतात.

*२ यांत्रिक, शेतकीविषयक अथवा डॉक्टर, शिक्षक, इंजिनियर वगैरे त्या त्या पेशांचे, उच्च प्रतीचे तज्ज्ञ यांच्या शिक्षणासाठीं निराळीं कॉलेजें आहेत.* तेथील अभ्यासक्रम चार साडेचार वर्षांचा असतो व हें शिक्षण घेऊन बाहेर पडणारे तज्ज्ञ आपल्या व्यवसायाचें काम पाहतात. या दोन प्रकारचीं कॉलेजें व त्यांमधील शिक्षण यांचीच विशेष माहिती येथें देण्याचें योजिलें आहे. शास्त्रीय संशोधन, संशोधनसंस्था, भौतिक व सामाजिक शास्त्रांमधील संशोधनाचें नियोजन व नियंत्रण करणाऱ्या शास्त्रीय परिषदा ( *Academy of Sciences* ) यांचा विचार पुढील प्रकरणांत स्वतंत्रपणें केला आहे.

वर उल्लेखिलेल्या संस्थांपैकीं बौद्धिक शिक्षणाच्या कॉलेजांवर विश्वविद्यालयाचें नियंत्रण असतें आणि इतर कॉलेजें त्या त्या खात्याच्या देखरेखीखालीं असतात.

उदाहरणार्थ, शेतकीविषयक कॉलेजांवर शेतकी खात्याची देखरेख असेल तर वैद्यक शिकविण्याऱ्या कॉलेजांवर आरोग्यखात्याची देखरेख असते. परंतु एकंदर सर्व उच्च शिक्षणसंस्थांना मार्गदर्शन करण्यासाठीं अखिल सोविएत देशासाठीं एक स्वतंत्र उच्चशिक्षणसमिति आहे. संगीत, नाट्य, सिनेमा, चित्रकला, पत्रपांडित्य ( *Journalism* ) इत्यादि विषयांच्या उच्च शिक्षणासाठीं सुद्धां उच्च शिक्षणसंस्था ( कॉलेजें ) आहेत, ही गोष्ट अवश्य नमूद केली पाहिजे.

या कॉलेजांत कोणत्या विद्यार्थ्यांना प्रवेश मिळतो ? कॉलेजांत प्रवेश करणाऱ्या विद्यार्थ्यानें सक्तीचें सात वर्षांचें शिक्षण घेतल्यावर दशवार्षिक शाळेंतील आणखी तीन वर्षांचा वरिष्ठ दुय्यम शिक्षणक्रम उत्तम रीतीनें पुरा केलेला असावा लागतो. हा दहा वर्षांचा अभ्यासक्रम सर्वसाधारण ( *General* ) विषयांचा असतो ( ऐच्छिक विषय यांमध्यें नसतात ) हें आपण मागें पाहिलें आहे. यानंतर ज्या विषयाचें उच्च शिक्षण घ्यावयाचें असेल त्या विषयाच्या कॉलेजची प्रवेशपरीक्षा चांगल्या रीतीनें पास व्हावी लागते. बरेचसे विद्यार्थी या मार्गानें आलेले असतात. पण ज्यांनीं सप्तवार्षिक शिक्षणानंतर सरळ धंदेशिक्षण घेऊन धंद्यांत प्रवेश केला असेल किंवा दुय्यम धंदेशिक्षण अथवा व्यवसायशिक्षण घेऊन पेशा स्वीकारला असेल, त्यांनाही, आपापल्या कामाचा तीन ते पांच वर्षें अनुभव घेतल्यावर, प्रौढ विद्यार्थ्यांसाठीं असलेल्या कामगारशाळा अथवा तत्सम शाळा यांमध्यें अभ्यास करून वरील प्रवेशपरीक्षेस बसतां येतें आणि पास झाल्यास कॉलेजांत जातां येतें. प्रवेश मिळवूं इच्छिणाऱ्या विद्यार्थ्याचें वय सतरापेक्षां कमी व पस्तीसपेक्षां जास्त मात्र नसावें. उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांत विद्यार्थिनींची संख्या इतर देशांच्या तुलनेनें बरीच मोठी आहे. १९३८ मध्यें विद्यार्थिनींचें प्रमाण शेंकडा ४१ टक्के होतें.

ऐच्छिक विषय कोणताही असो, बौद्धिक असो वा तांत्रिक असो, इंग्रजी, फ्रेंच, जर्मन अथवा इतर परकीय भाषा यांपैकीं एका भाषेचा चार वर्षें अभ्यास करणें आवश्यक असतें. तसेंच रशियन भाषा ( अथवा मातृभाषा ) व वाङ्मय, समाजशास्त्र ( *Social Sciences* ) व मार्क्सवाद यांचें दोन वर्षें शिक्षण घ्यावें लागतें. शारीरिक शिक्षण आणि व्यायाम व लष्करी शिक्षण हे विषयहि आवश्यक आहेत. हा झाला अभ्यासक्रमांमधील आवश्यक विषयांचा भाग. ऐच्छिक विषयांच्या विशेष

अभ्यासासाठीं, त्या विषयाशीं संबंध असलेल्या ज्या ज्या विषयांचें सामान्य ज्ञान आवश्यक असेल, त्या त्या विषयांचा स्थूल अभ्यास व ऐच्छिक विषयाचा विशेष अभ्यास यांचा अंतर्भाव अभ्यासक्रमांतील दुसऱ्या भागांत होतो. ऐच्छिक विषय तांत्रिक अथवा व्यवसायात्मक असेल तर शेवटच्या दोन वर्षांत त्या विषयाच्या प्रात्यक्षिक अनुभवासाठीं वेळापत्रकांत शेंकडा ४० टक्के वेळ देण्यांत येतो. हा प्रात्यक्षिक अनुभव प्रयोगशाळा, वर्कशॉप, कारखाने अथवा त्या त्या विषयाला अनुरूप अशा ठिकाणीं ( इस्पितळांत, डॉक्टरीचे विद्यार्थी; शाळांत, अध्यापक होऊं इच्छिणारे विद्यार्थी वगैरे ) मिळवितात. तसेंच उद्योगकेंद्रांना अथवा अन्यत्र भेटी देऊन तेथील कामाची माहिती घेण्यासाठीं वेळापत्रकाचा शेंकडा ५ ते १० टक्के वेळ दिलेला असतो. कारखान्यांत प्रात्यक्षिक काम करणाऱ्या विद्यार्थ्यास अगदीं खालच्या दर्जाच्या कामास सुरुवात करून चढत चढत वरच्या दर्जाप्रत जावें लागतें. यामुळें त्याला कारखान्यांतील सर्व प्रकारच्या कामाची उत्तम तऱ्हेनें माहिती होते.

आवश्यक विषयांपैकीं समाजशास्त्र या विषयाचें महत्त्व ध्यानांत घेणें जरूर आहे. समाजशास्त्राच्या अभ्यासक्रमांत अर्थशास्त्र, ऐतिहासिक भौतिकवाद ( *Historical Materialism* ) वर्गविग्रह, साम्राज्यवाद, समाजवादी क्रांति यांचा समावेश होत असून, शिवाय सोविएत देशांतील आर्थिक पद्धति, उत्पादनाचे प्रकार, त्यांचा एकमेकांशीं असलेला संबंध, इत्यादि विषयांचा शास्त्रीय दृष्टिकोनांतून ऊहापोह केला जातो. तसेंच विद्यार्थी ज्या ऐच्छिक विषयाचा अभ्यास करीत असेल, त्यामधील आधुनिक प्रगतीचा समाजजीवन व वैयक्तिक जीवन यांवर काय परिणाम होत आहे, याची यथार्थ कल्पना विद्यार्थ्याला दिली जाते. असा विषय अभ्यासक्रमांत अंतर्भूत करण्याचा हेतु उघड आहे. उच्च शिक्षण घेतलेलीं विद्वान् माणसें सामाजिक जीवनापासून अलिप्त राहतात, असा अनुभव आपल्या देशांत नेहमींच येतो. इतर देशांतही हाच प्रकार आहे. समाजशास्त्राच्या अभ्यासामुळें, ही हानिकारक प्रवृत्ति उत्पन्न होण्यास सोविएत शिक्षणक्रमांत अवसर मिळत नाहीं. "माझा समाजाशीं काय संबंध ? माझा विषय बरा कीं मी बरा; समाजाची मला पर्वा नाहीं." असें म्हणणारे सुशिक्षित विद्वान् सोविएत समाजांत आढळणार नाहींत ! जी गोष्ट पढिक विद्वानांची तीच गोष्ट कलावंतांची. कलेचें उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना सर्व-साधारण दशवार्षिक अभ्यासक्रम पुरा करून शिवाय कॉलेजची प्रवेशपरीक्षा पास व्हावी लागते. अर्थात् होतकरू कलावंताचें इतिहास, वाङ्मय, शास्त्रीय विषय

इत्यादींचें ज्ञान, इतर देशांच्या तुलनेनें किती तरी वरच्या दर्जाचें असतें. तसेंच कलेच्या कॉलेजांत प्रवेश करण्यापूर्वी व नंतर समाजशास्त्राचें वरील शिक्षणही कलावंतांना मिळालेलें असतें. म्हणून सोविएत कलावंताचा चौरस विकास झालेला असतो. '*कलेसाठीं कला*' या अलिप्तवादी कलावंतांच्या रेशमी कोषांत स्वतांला गुरफटून घेऊन तो समाजापासून अलग रहात नाहीं; आणि " राजकारणांत मला कांहीं कळत नाहीं " असा वृथा अभिमानही तो बाळगीत नाहीं ! *सुशिक्षित विद्वान् व थोर कलावंत यांना जें महत्त्व आहे तें समाजामुळेंच प्राप्त झालेलें आहे* आणि म्हणून त्यांचें स्थान समाजांतच आहे, ही जाणीव सोविएत शिक्षणामध्यें प्रथमपासून निर्माण करण्यांत येते.

कॉलेजांतील शिक्षणपद्धति सामान्यतः पुढील प्रकारची असते. प्रथम विषयांतील लहानसा भाग निवडून त्यावर एक व्याख्यान ( लेक्चर ) देण्यांत येतें. नंतर विद्यार्थी गटागटानें त्या भागाची सांगोपांग चर्चा करतात, याला सेमिनार ( *Seminar* ) असें नांव आहे. सेमिनार झाल्यावर विद्यार्थी व्यक्तिशः ग्रंथालयांत व घरीं पुस्तकांच्या सहाय्यानें विशेष अभ्यास करतात आणि शेवटीं अध्यापक त्या भागांवर समारोपाच्या स्वरूपाचें वक्तव्य करतो. दर टर्मच्या मध्यंतरीं व शेवटीं अशा तीनचार परीक्षा असून वर्षाच्या अखेरीस वार्षिक परीक्षा असते. या सर्व परीक्षा लेखी व तोंडी अशा दोन्ही प्रकारच्या असतात. आणि तोंडी परीक्षेच्या वेळीं, प्रश्नाचें उत्तर देतांना विद्यार्थ्यानें त्या मुद्याचें इतर विद्यार्थ्यांसमोर विस्तारानें विवरण करावें अशी अपेक्षा असते. परीक्षेचे गुण 'अत्युत्तम, उत्तम, समाधानकारक, वाईट, अतिवाईट' या पांच प्रकारच्या शेऱ्यांनीं दर्शविलेले असून शेवटचे दोन गुण मिळाल्यास विद्यार्थी नापास होतो. अभ्यासक्रमाच्या शेवटच्या वर्षीं अखेरी परीक्षा तर असतेच. शिवाय या वर्षीं तीन ते सहा महिने खपून प्रत्येक विद्यार्थ्यानें आपल्या ऐच्छिक विषयांतील एखाद्या भागावर लहानसा प्रबंध लिहावयाचा असतो. या प्रबंधाचें जाहीर वाचन कॉलेजांतील अध्यापक व विद्यार्थी यांच्यासमोर होत असून त्यावर चर्चा होते आणि विद्यार्थ्याला आपण मांडलेल्या मुद्यांचें यशस्वी समर्थन करावें लागतें. हा सर्व शिक्षणक्रम पुरा करणाऱ्या विद्यार्थ्यास पदवी देण्यांत येते. पदवीपरीक्षेंत विशेष प्रावीण्य दाखविणारे विद्यार्थी अधिक उच्च शिक्षणासाठीं अथवा संशोधनकार्यासाठीं उच्च शिक्षणसंस्थांत अधिक काळ राहतात. पदवी-

परीक्षेनंतर पुढें अभ्यास करणाऱ्या ( *Post Graduate* ) या विद्यार्थ्यांना *Candidate of Science* आणि *Ph. D.* अशा पदव्या दिल्या जातात. महायुद्ध सुरू असूनहि १९४१ ते १९४५ या चार वर्षांत एकूण ३७५३ विद्यार्थ्यांनीं *Candidate of Science* ही पदवी मिळविली आणि १७१९ विद्यार्थी *Ph. D.* झाले. यावरून, या कार्यांत युद्धामुळें विशेष खंड पडला नव्हता, हें सिद्ध होतें.

१९४० सालापर्यंत उच्च शिक्षणाकरितां फी घेण्यांत येत नसे. बहुसंख्य विद्यार्थ्यांना त्यांच्या गरजेप्रमाणें, शिष्यवृत्तीही देण्यांत येत असे. १९३८ सालीं शेंकडा ९१ विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती मिळत होत्या. १९४० सालापासून फक्त उत्तम प्रगति दाखविणाऱ्या विद्यार्थ्यांना अथवा लायक असून फी देण्याची ऐपत नाहीं अशा विद्यार्थ्यांना सरकारकडून शिष्यवृत्ती मिळते. शिवाय कारखाने, सामुदायिक शेतें इत्यादि उद्योगकेंद्रें आपल्यातर्फे जाणाऱ्या विद्यार्थ्यांच्या खर्चाची सोय करतात. फी व शिष्यवृत्ति यांविषयींच्या नवीन योजनेनें होतकरू विद्यार्थ्यांच्या मार्गांत अडथळा आलेला नाहीं, असें *मिसेस् बी. किंग* या व इतर इंग्रज व अमेरिकन शिक्षणतज्ज्ञांचें मत आहे. शिष्यवृत्तीच्या पैशांत विद्यार्थ्याला व्यवस्थितपणें ( चैनीनें मात्र नव्हे ) राहतां येतें.*

वसतिगृहांमध्यें सर्व सोयी असतात; पण आपल्याकडे अथवा इंग्लंड अमेरिकेमध्यें आढळून येणारें चैनीचें वातावरण सोविएत वसतिगृहांत दिसून येत नाहीं. विवाहित विद्यार्थ्यांसाठीं ( पतिपत्नी दोघेही उच्च शिक्षण घेत असल्यास ) वसतिगृहाची निराळी व्यवस्था असते आणि त्यांना जोडून शिशुगृहांची ( *Crèche, Kindergarten* ) व्यवस्थाहि केलेली असते ! सोविएत तरुण तरुणी इतर देशांच्या तुलनेनें लौकर लग्न करितात तेव्हां या सोयी असणें इष्टच आहे.

---

* विद्यार्थ्याला मिळणाऱ्या शिष्यवृत्तीचें मान महिना १८५ रूबलपासून ३०० रूबलपर्यंत असतें. रसायन, इंजिनियरिंग वगैरे विषयांच्या विद्यार्थ्यांस महिना ४०० रूबलपर्यंत शिष्यवृत्ति असते. शिष्यवृत्तीची रकम अभ्यासांतील प्रगतीवरहि अवलंबून असते.

सांस्कृतिक विकासासाठीं आणि करमणुकीसाठीं छंदमंडळें, क्लब इत्यादि संस्था कॉलेजांत व कॉलेजाबाहेर चालविलेल्या असतात. कॉलेजाशिवाय इतर ग्रंथालयांचा विद्यार्थ्यांना उपयोग करतां येतो आणि याकरतां फी केवळ नांवालाच घेतली जाते. सिनेमा व नाटकें यांचीं, विद्यार्थ्यांसाठीं, खास कमी दराचीं तिकिटें असून थोडक्या पैशांत दूरचा प्रवास करण्याची सवलत असते. विद्यार्थ्यांना सुट्टीचे दिवस एखाद्या रम्य विश्रांतिस्थानीं ( *Rest Homes* ) घालविण्याची संधि मिळते. सर्व प्रकारची वैद्यकीय मदत सर्वकाळ मोफत दिली जाते हें सांगावयास नकोच. कॉलेजच्या विद्यार्थ्यांना विविध प्रकारच्या सुखसोयी मिळवून देण्यासाठीं कोमसोमोल ( तरुण कम्युनिस्ट संघ ) ही संस्था नेहमीं खटपट करीत असते.

### *कॉलेजजीवन*

सोविएत कॉलेजयुवकाच्या जीवनाची कल्पना यावी यासाठीं सोविएत कॉलेजांतील जीवनक्रमाच्या कांहीं विशेषांकडे लक्ष वेधणें आवश्यक आहे.

सोविएत विद्यार्थ्यांचा दिवसाचा बराच वेळ उद्योगांत जातो. कॉलेजांतील तास, घरीं व ग्रंथालयांत करावा लागणारा अभ्यास, कॉलेजांतील स्वराज्यासंबंधींचें ( *Self Government* ) आणि बाहेरील समाजकार्य ( *Social Work* ) यांमध्यें इतका वेळ खर्च होतो कीं, फुरसतीचा वेळ फार थोडा मिळतो. कॉलेजांतील विद्यार्थ्यांवर कॉलेजच्या कारभारासंबंधीं बरीच जबाबदारी टाकण्यांत येते. शिवाय प्रत्येक कॉलेज-युवक कांहीं ना कांहीं समाजकार्य ( कोमसोमोल संस्थेंत काम करणें, पायोनियर दलाचें काम पहाणें, प्रौढ शिक्षणसंस्था, क्लब यांमध्यें मदत करणें इत्यादि ) स्वेच्छेनें अंगावर घेतो. एका काळीं कॉलेजयुवक, दिवसांतून सोळा सोळा तास, या ना त्या कामांत मग्न असे, असें म्हणतात. यानंतर राहिलेला फुरसतीचा वेळ अर्थात् जो तो आपल्या इच्छेनुसार आवडीच्या व्यवसायांत घालवितो.

हिंदुस्थानांतील अथवा ऑक्सफोर्ड केंब्रिजमधील कॉलेजजीवनाप्रमाणें सोविएत कॉलेजजीवन समाजापासून दुरावलेलें नसतें. याला एक कारण अर्थातच असें आहे कीं, इतर देशांत फक्त अल्पसंख्य धनिकवर्गामधील तरुणच काय ते कॉलेजचें शिक्षण घेऊं शकतात. परंतु कॉलेजांतील जीवनाचा बाहेरील सामाजिक जीवनाशीं पदोपदीं संबंध येण्यास सोविएत देशांत याशिवाय इतर अनेक गोष्टी कारणीभूत

होतात. *कॉलेजांतील विद्यार्थी सामान्यतः १८ वर्षांवरील असतात. आणि म्हणून त्यांना मतदानाचा हक्क असतो.* अर्थात् शहरांतील सोविएत (पंचायत), प्रांताची सोविएत, वरिष्ठ सोविएत इत्यादि सर्व सोविएत सभांच्या निवडणुकींत तो नागरिक या नात्यानें प्रत्यक्ष भाग घेतो; आणि सुशिक्षित असल्यामुळें असा भाग घेतांना त्याला आपल्यावरील जबाबदारीची विशेष जाणीव होते. तसेंच विद्यार्थी आपापल्या व्यवसायाच्या ट्रेड युनियनचे सभासद असतात. कॉलेजच्या जीवनाबाहेर सामाजिक सुधारणेसाठीं ज्या मोहिमा चाललेल्या असतात, त्यांमध्येंही तो उत्साहानें भाग घेतो. प्रथम प्रथम साक्षरताप्रसार, प्रौढशिक्षण, इत्यादि देशव्यापी चळवळीची धुरा मुख्यतः या तरुण विद्यार्थ्यांनींच वाहिली. अलीकडे अशा समाजसुधारणेचा विद्यार्थ्यांवर पडणारा भार कमी झाला होता; तरी सुद्धां कोणतीही चळवळ निघाली कीं, विद्यार्थी त्यांमध्यें आघाडीचे शिपाई असत. उदाहरणार्थ, मॉस्कोमधील भूमिगत रेल्वे बांधण्याच्या कामीं प्रत्येक कॉलेजविद्यार्थ्यानें विटा उचलण्यापासूनची सर्व मदत अतिशय उत्साहानें केली. हिरीरीनें समाजकार्य उचलणाऱ्या या विद्यार्थ्यांनीं गेल्या महायुद्धांत किती मोठी कामगिरी बजावली याची स्मृति अगदीं ताजी आहे.

सामाजिक, राजकीय आणि ट्रेड युनियन चळवळींत भाग घेणारा विद्यार्थी आपल्या देशांत आणि इतरत्र जगांत घडणाऱ्या घटनांविषयीं अतिशय जागरूक असणार, याविषयीं मुळींच शंका नाहीं. जगांत सोविएत देशाशिवाय इतरत्र भांडवलशाही आर्थिक व्यवस्थेमुळें कसा पेंचप्रसंग उद्भवला आहे आणि त्याचे घोर परिणाम सांस्कृतिक जीवनावर व शिक्षण, विज्ञान, वाङ्मय इत्यादि प्रांतांतही, कसे दृग्गोचर होत आहेत याची पूर्ण कल्पना सोविएत कॉलेजयुवकाला असते. उलट सोविएत सांस्कृतिक जीवन दिवसेंदिवस कसें समृद्ध होत आहे, याची त्याला प्रत्यक्ष जाणीव असते. अर्थातच सोविएत समाजाच्या उज्ज्वल भविष्यकाळाविषयीं त्याची खात्री पटलेली असते आणि म्हणून अंगीकृत कार्यावर त्याचा दृढ विश्वास असतो. सोविएत कॉलेजयुवकाची, ज्ञान मिळविण्याविषयीं दिसणारी आस्था व तळमळ, सामाजिक जबाबदारीची जाणीव आणि निश्चयी खंबीर वृत्ति पाहिली कीं सोविएत कॉलेजजीवन पाश्चिमात्य (अथवा हिंदी) कॉलेजजीवनाहून किती निराळें आहे, याची कल्पना येते. सोविएत कॉलेजयुवकाच्या जीवनक्रमांत आळशी, खुशालचेंडूपणाला मुळींच स्थान नाहीं. ऐतखाऊ आईबापांच्या मुलांना पुढील आयुष्यांत आपल्या सुसंस्कृतपणाचें चारचौघांसमोर प्रदर्शन करतां यावें अगर सत्ताधारी वर्गातील मुलांना

सरकारी नोकरींत प्रवेश मिळावा, हा इंग्लंडमधील पब्लिक स्कूल अगर कॉलेजांत जाणाऱ्या बहुसंख्य विद्यार्थ्यांचा उच्च शिक्षणाकडे पाहण्याचा दृष्टिकोन असतो. सोविएत कॉलेजशिक्षणाचा उद्देश याहून अगदीं निराळा आहे.

सोविएत समाजाच्या झपाट्यानें होत जाणाऱ्या प्रगतीसाठीं अनेक प्रकारच्या क्षेत्रांत तज्ज्ञांची जरूर आहे; तसेंच सांस्कृतिक प्रगतीसाठीं लेखक, ग्रंथकार, कलावंत, शास्त्रज्ञ इत्यादि त्या त्या शाखेंत पारंगत असलेल्या अनेक सुशिक्षित विद्वानांची आवश्यकता आहे. *समाजाच्या वाढत्या विकासासाठीं आवश्यक असलेला हा जबाबदार सुशिक्षित वर्ग निर्माण करणें* हा सोविएत उच्च शिक्षणाचा उद्देश आहे; आणि तो साध्य होण्यासाठीं जे जे विद्यार्थी लायक असतील, मग ते कोणत्याही वर्गांतील असोत, त्या सर्वांच्या सर्वांगीण विकासाला वाव देऊन त्यांना त्या त्या विषयांतील उच्च शिक्षण दिलें जातें. शिक्षणाचा उद्देशच भिन्न असल्यामुळें कॉलेजांतील वातावरण इतर देशांहून निराळें बनतें, ही गोष्ट उघड आहे.

इतर देशांत तरुण स्त्रीपुरुष विद्यार्थ्यांच्या सान्निध्यामुळें बिकट प्रश्न उपस्थित होतात व कधीं कधीं या प्रश्नांना अगदीं विकृत स्वरूप प्राप्त होतें, असा अनुभव आहे. सोविएत कॉलेजांतील अनुभव याच्या अगदीं उलट आहे. तेथें हा प्रश्न क्वचितच उपस्थित होतो. याचें कारण काय? तेथील सहशिक्षण हिंदुस्थानांतील शिक्षणाप्रमाणें केवळ नांवालाच सहशिक्षण नाहीं; तर खरोखरीच सर्व विद्यार्थी व विद्यार्थिनी समानतेच्या भूमिकेवरून एकमेकांशीं सहकार्य करतात आणि त्यांचे संबंध खेळीमेळीचे असतात. परंतु त्यामुळें नीतिमत्ता शिथिल होतां कामा नये, असा कटाक्ष ठेवला जातो आणि तो तसा ठेवणें शक्यही असतें. जर स्त्रीपुरुष एकमेकांवर अनुरक्त असतील तर तीं लागलीच विवाह करतात. पुढील व्यवसायाची खात्री असल्यामुळें त्यांच्यासमोर इतर देशांतल्याप्रमाणें बेकारीचें भूत उभें नसतें. तसेंच विद्यार्थिदशेंत दोघांनाही शिष्यवृत्ति असते. यामुळें विवाह करणें त्यांना सहज शक्य असतें. म्हणून लौकर लग्न करूं नये असा सामाजिक रिवाज तेथें रूढ नाहीं. उलट, विवाहित जोडप्यास समाजाकडून व सरकारकडून अवश्य त्या सर्व सवलती मिळतात. प्रसूतीनंतर व पूर्वी रजा, मोफत वैद्यकीय मदत, शिशुगृहांची व्यवस्था, विवाहित विद्यार्थ्यांसाठीं खास वसतिगृहें इत्यादि सर्व सोयी असल्यामुळें लहान मुलांचा प्रश्न सुटलेला आहे. म्हणून विद्यार्थिदशेंत मुलें झाल्यानें अभ्यासांत कोणताही विशेष

अडथळा उद्भवत नाहीं. क्षुल्लक कारणावरून पतिपत्नीपैकीं एकानें दुसऱ्यापासून काडीमोड मागण्याविरुद्ध लोकमत अतिशय तीव्र आहे. पुढील आयुष्यांत आर्थिक सुरक्षिततेची खात्री असल्यामुळें आणि लौकर लग्न करणें शक्य असल्यामुळें कोणत्याही प्रकारची दारुण निराशा तरुण मनाला ताप देत नाहीं आणि अतृप्त इच्छा भंडावून सोडीत नाहींत. अर्थात् लैंगिक गोष्टींना अवास्तव महत्त्व देण्याची प्रवृत्ति उत्पन्न होण्यास अवसरच मिळत नाहीं. नीतीचीं सामाजिक बंधनें कडक आहेत. या सर्व कारणांमुळें सोविएत विद्यार्थी लैंगिक प्रश्नांत गुरफटून जात नाहींत आणि त्यांना आपल्या व्यक्तिमत्वाच्या विकासाकडे निर्वेधपणें लक्ष देणें शक्य होतें.

दुसरा एक महत्त्वाचा विशेष म्हणजे सोविएत कॉलेजजीवनांत आढळून येणारी अप्रतिम शिस्त. शिस्तपालनाची जबाबदारी विद्यार्थ्यांवरच टाकलेली असते व शिस्तीचे नियमही विद्यार्थी स्वतांच ठरवितात व स्वतां होऊन पाळतात. विद्यार्थ्यानें विद्यार्थिनीच्या खोलींत चहा पिण्यास अथवा गप्पा मारण्यास जातां कामा नये, किंवा दहा वाजण्यापूर्वी प्रत्येकानें आपल्या खोलींत असलेंच पाहिजे, अशासारखे नियम तेथें दिसून येत नाहींत. जबाबदार प्रौढ विद्यार्थ्यांना अशा नियमांची आवश्यकताच नाहीं. अशी सोविएत विद्यार्थ्यांची खात्री आहे. वर्गांत पाय वाजविणें, गोंगाट करणें, रस्त्यानें जाणाऱ्या लोकांची टिंगल करणें, रस्त्यांतील दिवे फोडणें, ( पोलिसांच्या टोप्या उडविणें हा इंग्रजी कॉलेजांतील प्रकार ) यांसारखे बालिश प्रकार सोविएत कॉलेजांत कधींच घडणार नाहींत. त्यांच्या मतें या खोडया आठ दहा वर्षांखालील लहान मुलांनाच शोभतील ! त्यांची विनोदाची किंवा टीका करण्याची तऱ्हा अशी उथळ नाहीं. भिंतपत्रिकेंत लेख लिहून अथवा व्यंगचित्र काढून किंवा स्वतां रचलेलीं टीकात्मक गाणीं सांघिक रीतीनें गाऊन टीका व उपहास ते उघडपणें दर्शवितात.

अध्यापकवर्ग आणि विद्यार्थी यांचे परस्परसंबंध सहकार्याचे व मित्रत्वाचे असतात; आपल्या कॉलेजांत आढळून येणारी विरोधाची भावना तेथें दिसून येत नाहीं. अध्यापकांवर टीका होते, पण ती उघड केलेली असून तिचा उद्देश शिक्षणाचा दर्जा वाढविण्याचा असतो; आणि म्हणूनच अध्यापकहि त्या टीकेचा सहानुभूतीनें विचार करतात. विद्यार्थी, अध्यापक आणि शासनसंस्था या सर्वांचें उद्दिष्ट शिक्षणाचा दर्जा अधिकाधिक वाढावा हेंच असल्यामुळें त्यांच्यामध्यें कोणताही परस्पर हित-विरोध उत्पन्न होत नाहीं. अर्थातच स्वयंस्फूर्तपणें शिस्त पाळून हें सर्वांचें उद्दिष्ट

साध्य करण्यास विद्यार्थी अध्यापकांना मदत करतात. चैनीनें कालक्रमणा करण्याचा हेतु उराशीं धरून आलेले चंडोल विद्यार्थी तेथें सहसा दिसत नाहींत. अशी प्रवृत्ति एखाद्याच्या अंगीं दिसलीच तर विद्यार्थ्यांचें त्याच्यावर सामाजिक दडपण येतें. इतकेंही करून तो सुधारला नाहीं, तर त्याला आपला पूर्वीचा व्यवसाय करण्यास परत पाठविलें जातें. पूर्वीचा व्यवसाय नसल्यास त्याला योग्य काम पाहून देण्यांत येतें. कारण उच्च शिक्षण घेऊन समाजाच्या संस्कृतींत भर घालण्यास असा बेजबाबदार विद्यार्थी नालायक समजला जातो.

सोविएत देशांत निर्माण होणारा नवा उच्चविद्याविभूषित वर्ग कोणत्या वातावरणांत वाढत आहे व त्याची शैक्षणिक व सांस्कृतिक तयारी कोणत्या तऱ्हेची आहे, याची कल्पना वरील वर्णनावरून येते. स्वतःच्या कार्यक्षमतेबद्दल पूर्ण विश्वास असणारा व सामाजिक कर्तव्याची पूर्ण जाणीव असणारा आजचा सुशिक्षित सोविएत विद्यार्थी हा झारशाहीशीं झगडणाऱ्या क्रांतिकारक कॉलेजयुवकांचा खरा वारसदार आहे, असें म्हटलें पाहिजे.

# शास्त्राभ्यास आणि शास्त्रीय संशोधन



जगांतील आजपर्यंतच्या शास्त्रीय ज्ञानाचे आम्ही खरे वारसदार आहों; सर्व शास्त्रीय ज्ञान आत्मसात करून व त्यामध्यें भर टाकण्यानेंच निसर्गावर अधिकाधिक प्रभुत्व मिळवितां येईल; शास्त्र व त्याचा व्यावहारिक उपयोग हाच समृद्ध जीवनाचा पाया आहे, असा सोविएत सामाजाचा शास्त्रविषयक दृष्टिकोन आहे. याला अनुसरून सोविएत देशांत शास्त्रीय संशोधनाच्या संस्था व शास्त्रीय संशोधन यांचा व्याप गेल्या पंचवीस वर्षांत कितीतरी पटीनें वाढला आहे.

सोविएत देशांतील संशोधनसंस्था व त्यांचें कार्य यांचें आजचें स्वरूप यथार्थपणें ध्यानांत देण्यासाठीं आपली दृष्टि थोडी मागें फेकणें आवश्यक आहे. १९१७ सालीं झालेल्या समाजवादी क्रांतीमध्यें झारशाही कोलमडून पडली आणि नवीन सोविएत सत्ता स्थापन झाली. झारशाही रशिया इतर पाश्चात्य राष्ट्रांच्या मानानें औद्योगीकरणामध्यें कमींत कमी शंभर वर्षें तरी मागें होता. क्रांतिकालांतील यादवी युद्ध आणि नंतर पडलेला भयंकर दुष्काळ यामुळें आधींच मोडकळीस आलेली देशाची आर्थिक परिस्थिति अधिक हलाखीची झाली होती. तेव्हां या बिकट प्रसंगांतून मार्ग काढावयाचा असेल तर शास्त्रज्ञांचें सहाय्य घेऊन झपाट्यानें योजनाबद्ध

औद्योगिक प्रगति केली पाहिजे व अशा रीतीनें देशाचा एक शतकाचा आर्थिक मागासलेपणा एकदोन दशकांच्या आंत नष्ट केला पाहिजे हें *लेनिननें* तावडतोब ओळखलें. याचें दृश्यफल म्हणजे विद्युतीकरणाची पहिली योजना( *Electrification Plan* ). भांडवलशाही जगानें लेनिनच्या या योजनेचा अतिशय उपहास केला. " जुनाट रशियांत अशी योजना कशी काय सिद्धीस जाणार बुवा ? मूर्ख आहेत ब्रेटे ! " असाच त्यांच्या बोलण्याचा सूर होता. सोविएतविषयीं आदर व सहानुभूति बाळगणारे प्रख्यात इंग्रज लेखक *एच्. जी. वेल्स* यांनाहि लेनिनची योजना एक स्वप्नरंजन आहे असें वाटलें. परंतु *लेनिननें* शास्त्रज्ञांस पाचारण केलें व त्यांच्या मदतीनें विद्युतीकरणास सुरवात केली; आणि सोविएत देशांतील शास्त्रज्ञ व जनता यांनीं अप्रतिम निष्ठा व निर्धार यांच्या जोरावर "*क्रेमलिनमधील त्या किरकोळ माणसाचें स्वप्न*" ( *That little man in the Kremlin is dreaming* ! ) सत्यसृष्टींत उतरविलें !

तेव्हांपासून सोविएत देशांत शास्त्रसंशोधनास नव्यानें प्रारंभ झाला. शास्त्रज्ञ व संशोधक यांच्या राहाणींत सुधारणा व्हावी, त्यांना पुरेसें स्वास्थ्य मिळावें या हेतूनें सुप्रसिद्ध लेखक मॅक्झिम गॉर्की यांनीं एक समिति स्थापन केली आणि या कामीं तरुण कम्युनिस्ट संघानें पुढाकार घेतला. परंतु १९२४ सालापर्यंतचा काल खरोखरी अस्वस्थतेंतच गेला आणि या काळांत व पुढेंहि कांहीं वर्षें शास्त्रज्ञवर्ग नव्या समाज-पद्धतीविषयीं बऱ्याच अंशीं उदासीन होता. १९२८ सालीं औद्योगीकरणाची पहिली पंचवार्षिक योजना अमलांत येऊं लागली; १९२५ सालापासून सोविएत सरकारनें जुन्या शास्त्रपरिषदेकडे विशेष लक्ष व द्रव्यसहाय्य पुरविण्यास सुरुवात केली होती; तसेंच आतां कामगार व शेतकरी वर्गाचा अभिमानी असा नवा तरुण शास्त्रज्ञ पुढें येऊं लागला होता. या सर्व घटनांमुळें पूर्वी उदासीन असलेले शास्त्रज्ञ आतां देशाच्या औद्योगीकरणांत व एकंदर जीवनांत आपला भाग उचलण्यासाठीं पुढें सरसावूं लागले. १९२९ पासून नव्या औद्योगीकरणाच्या योजनेला उपयुक्त होईल अशा रीतीनें शास्त्रपरिषदेनें आपलें संशोधनकार्य आंखण्यास प्रारंभ केला. सोविएत सरकार व शास्त्रीय संशोधक यांचे यानंतरच्या काळांतील निकटचे संबंध, १९३४ सालीं शास्त्रपरिषदेनें जगांतील सर्व शास्त्रज्ञांस उद्देशून काढलेल्या जाहीर पत्रकावरून स्पष्ट होतात. " क्रांतिकारक श्रमजीवि वर्गाच्या खांद्याला खांदा भिडवून शास्त्रज्ञांनीं आपला मार्ग आक्रमिला पाहिजे " अशी या पत्रकांत विनंति करण्यांत आली होती.

यानंतर सर्व शास्त्रीय क्षेत्रांत संशोधनाचें कार्य वेगानें वाढूं लागलें. विशेषतः दोन गोष्टींचा उल्लेख येथें केला पाहिजे. देशांतील खनिज संपत्तीचा शोध करण्यांत येऊन त्याची काळजीपूर्वक नोंद करण्यांत आली; आणि या खनिज संपत्तीचा देशाच्या औद्योगीकरणाकडे मोठ्या प्रमाणावर उपयोग व्हावा या हेतूनें तांत्रिक संशोधनावर ( *Technological Research* ) विशेष भर देण्यांत आला. सोविएत देशाचा विस्तार किती अफाट आहे व त्या काळीं तो देश किती मागासलेला होता हें ध्यानांत घेतलें कीं शास्त्रज्ञांनीं अंगीकारलेलें हें कार्य किती महत्त्वाचें व व्यापक स्वरूपाचें होतें याची कल्पना येईल. खनिज प्रदेशांच्या पाहणीचे पुढील आंकडे पाहा.

खनिज प्रदेशांची पाहाणी

| | |
|---|---|
| साल १९२१ पूर्वी ( झारशाहीचा काल धरून ) | ३८७ प्रदेश |
| ,, १९२१-२६ ( सहा वर्षे ) | १९३ ,, |
| ,, १९२७–३० ( चार वर्षे ) | ६५० ,, |
| ,, १९३१–३३ ( तीन वर्षे ) | २६०० ,, |

भूगर्भशास्त्रीय कार्यकर्ते ( *Geologists* )

| | |
|---|---|
| साल १९१३ | संख्या १५० |
| ,, १९३२ | ,, ६००० |
| वाढ | *चाळीस पट* |

एकूण शास्त्रीय कार्यकर्ते ( *Post Graduate Workers* )

| | |
|---|---|
| साल १९२८ | १५८४ |
| ,, १९३२ | १६५०० |
| | दहापट वाढ |

औद्योगीकरणाची पहिली योजना यशस्वी झाल्यावर दुसरी योजना हातीं घेण्यांत आली; त्यानंतर तिसरी आली आणि याच्या जोडीनें सर्व शास्त्रीय शाखांमध्यें संशोधनाचा व्याप सारखा वाढत गेला.

सोविएत सत्तेच्या पहिल्या वीस वर्षांत झालेल्या प्रगतीचे आंकडे पुढें दिले आहेत.

| सन | १९१७ | १९३८ |
|---|---|---|
| कॉलेजें व विश्वविद्यालयें | ९१ | ७०० |
| विद्यार्थी | १,१२,००० | ६,०१,००० |
| संशोधन संस्था | २८९ | ९०८ |
| संशोधक | ४३४० | २९, २४६ |

कॉलेजें व विश्वविद्यालयें यांमध्येंहि संशोधन चालतें म्हणून त्यांची संख्या येथें दिली आहे.

याशिवाय कारखाने व सामुदायिक शेतें यांना जोडून त्यांच्या स्वतांच्या प्रयोगशाळा असतात व अनेक क्लबांत शास्त्रमंडळें चालविलेलीं असतात. हीं हौशी शास्त्रमंडळें वगळलीं तरी नियमितपणें काम करणारे सुमारें ८०,००० (साल १९३८) शास्त्रीय कार्यकर्ते असावे असा अंदाज आहे. या वर्षी शास्त्रीय संस्थांवरील एकूण खर्च १०१ कोटि रूबल होता. शिवाय कारखाने, सामुदायिक शेतें इत्यादि उद्योगकेंद्रें आपापल्या प्रयोगशाळांवर खर्च करतात तो वेगळाच. तसेंच हीं उद्योगकेंद्रें अथवा सरकार यांना एखाद्या निकडीच्या प्रश्नावर संशोधन हवें असल्यास त्यासाठीं पैशाची वेगळी तरतूद करण्यांत येते.

तौलनिक दृष्ट्या पाहिलें तर ब्रिटिश शास्त्रीय संस्थांवर १९३८ सालीं ९ कोटि रुपये खर्च होत व अमेरिकेंत ९३ कोटि रुपये खर्च केले जात. याशिवाय ५६६ ब्रिटिश औद्योगिक कंपन्या एकूण ७ कोटि रुपये संशोधनावर खर्च करीत असत; अमेरिकें-तील कंपन्या याहून किती तरी अधिक करीत असाव्या. सोविएत देशांत सरकारी खर्च याच सालीं १०१ कोटि रूबल (५० कोटि रुपये) होता. औद्योगिक केंद्रांच्या खर्चाचा आंकडा जमेस धरला तर इंग्लंडच्या दसपट पैसे सोविएत देशांत शास्त्रीय

संशोधनासाठीं खर्च होतात असें कांहीं इंग्रज गृहस्थांचें म्हणणें आहे. अमेरिकेंत याहून अधिक होत असावा. देशाच्या एकूण अंदाजपत्रकाशीं तुलना केली तर सोविएत देशांत शेंकडा १ टक्का रक्कम संशोधनाकरितां खर्च होते व हें प्रमाण इतर कोणत्याहि देशांपेक्षां अधिक आहे.

हिंदुस्थानांतील संशोधनाचा व्याप इतका लहान आहे कीं त्याची वरील देशांशीं तुलना करणें हास्यास्पद ठरेल. परंतु आपण किती मागें आहोंत हें ध्यानांत यावें या हेतूनें पुढील माहिती दिली आहे. चाळीस कोटि लोकवस्तीच्या या अफाट देशांत आर्टस् व सायन्सचीं फक्त ३०४ कॉलेजें व १७ विश्वविद्यालयें आहेत. व्यावसायिक कॉलेजें अवघीं ७५, असून त्यांमध्यें सहा शेतकीविषयक, सात इंजिनियरिंग; बारा वैद्यकीय आणि फक्त दोन तांत्रिक ( *Technological* ) आहेत. या सर्व कॉलेजां-पैकीं सत्तर कॉलेजांतच काय तें थोडेसें संशोधनकार्य होतें. १९४४ सालीं तयार झालेली यादी पाहिली तर त्यांत संशोधन करणाऱ्या संस्थांची संख्या २०० आहे असें आढळतें परंतु त्यांमधील बहुसंख्य संस्थांत पहिल्या प्रतीचें संशोधन होत नाहीं; कारण त्य· संस्था सरकारी खात्यांच्या नित्यव्यवहाराला उपयोगी असेच प्रश्न हातीं घेतात. पहिल्या प्रतीचें संशोधन चालू आहे अशा संस्था फारच थोडया ( *पंचविसांहूनहि कमी* ) आढळतील असा कांहीं तज्ज्ञांचा अंदाज आहे. सतरा विश्वविद्यालयांना सरकारी मदत फक्त एक कोटि तीस लक्ष रुपये होते; आणि संशोधनासाठीं किती खर्च होतो याचा आंकडा उपलब्ध नाहीं; ( इतका तो कमी असला पाहिजे असा याचा अर्थ दिसतो ! ) एवढया अवाढव्य देशाच्या प्रगतीला साजेसें राहोच पण येथें जें कांहीं थोडेफार औद्योगीकरण झालें आहे त्याला पुरेसें देखील संशोधन येथें होत नाहीं. असो.

वर उल्लेखिलेल्या नऊशेंहून अधिक सोविएत संशोधनसंस्थांचे दोन *विभाग* कल्पितां येतील. शास्त्रपरिषदेच्या देखरेखीखालील, व निरनिराळ्या खात्यांच्या देखरेखीखालील सामान्यतः तात्त्विक संशोधन ( *Theoretical* ) करणाऱ्या संस्थांचा पहिल्या विभागांत समावेश होतो. औद्योगिक व शेतीविषयक निरनिराळ्या खात्यांच्या देखरेखीखालील संस्था दुसऱ्या विभागांत मोडतात.

पहिल्या प्रकारच्या संस्था सबंध देशाच्या प्रगतीसाठीं आवश्यक असलेल्या मुख्य प्रश्नांवर संशोधन करीत असतात. उत्पादनाच्या पद्धतींमधील मूलगामी संशोधन प्रथम

येथें होतें आणि नंतर त्याचें प्रत्यक्ष व्यवहारांत रूपांतर करण्यासाठीं ते प्रश्न दुसऱ्या विभागांतील संस्थांकडे सोपविण्यांत येतात. तसेंच शास्त्रीय विषयांतील तात्त्विक संशोधन (उदा० गणित, विज्ञान इत्यादि) या पहिल्या प्रकारच्या संस्थांत होत असतें. उत्पादनाच्या त्या त्या शाखांत येणाऱ्या प्रासंगिक अडचणी दूर करण्याचें काम हें दुसऱ्या प्रकारच्या संस्थांचें मुख्य कार्य असतें. प्रत्यक्ष कारखान्यांत जे प्रश्न उपस्थित होतात त्यांचें प्रयोगशाळेंत पृथक्करण करून त्यावर उपाय शोधणें व उत्पादनाच्या पद्धतींत सुधारणा सुचविणें हें काम या संस्था करतात. अशा प्रश्नांचा विचार चालू असतांना त्यांमध्यें तात्त्विक अडचणी उद्भवतात अथवा नवीन संशोधनास उपयुक्त असे अनुभव प्रत्ययास येतात. त्यांचें संकलन करून योग्य मार्गदर्शनासाठीं हे प्रश्न पहिल्या प्रकारच्या संस्थांकडे पाठविले जातात. आणि अशा रीतीनें तात्त्विक व तांत्रिक (*Theoretical & Technological*) या दोन्ही प्रकारच्या संशोधनाची नीट सांगड घातली जाते. याच हेतूनें निरनिराळ्या उद्योगकेंद्रांना व सामुदायिक शेतांना जोडून काढलेल्या प्रयोगशाळांत येणाऱ्या अडचणी व अनुभव यांचा वरील दोन्ही प्रकारच्या संस्थांशीं संबंध जोडला जातो.

संशोधनाच्या या बहुविध व्यापाची संघटित जुळणी करणें किती आवश्यक होत असेल याची कल्पना केली, कीं सोविएत देशांत शास्त्रीय संशोधनांतहि, नियोजनाची (*Planning*) पद्धति का अवलंबिली जाते याचा उलगडा होतो. शास्त्रीय संशोधन हें हुकमी असूं शकत नाहीं; त्यामध्यें अनपेक्षिततेचा भाग असतोच; मग संशोधनांत पूर्वनियोजन कसें होऊं शकेल असा प्रश्न साहजिकच पुढें येतो. शास्त्रीय नियोजनाचा अर्थ अमुक एका मुदतींत अमुक एक शोध लावलाच पाहिजे असा लावणें हास्यास्पद ठरेल. झालेल्या संशोधनाचें संकलन करणें; नवीन वर्षीं कोणतें संशोधन हातीं घ्यावयाचें आहे; कोणत्या संस्था, कोणते संशोधक तें हातीं घेणार आहेत; त्यांमध्यें प्रायोगिक काम अंदाजें किती होईल व त्यापासून कोणते निष्कर्ष निघण्याचा संभव आहे या गोष्टींचा विचार करणें हें नियोजनाच्या कार्याचें स्वरूप असतें. असें करणें अगदीं शक्य असतें व शिवाय फायद्याचें असतें. एकतर यामुळें देशांतील एकंदर संशोधन-कार्याचें स्थूल चित्र प्रत्येक शास्त्रीय कार्यकर्त्यास माहीत होतें; शास्त्राचा ओघ व त्यांमधील आपल्या संशोधनाचें स्थान त्यास उत्तम तऱ्हेनें अजमावतां येतें. दुसरें असें कीं नियोजनामुळें संशोधनाची द्विरुक्ति आणि एकमेकांवरील अतिव्याप्ति (*Over-lapping*) टळते. तिसरा व सर्वांत महत्त्वाचा फायदा असा कीं नियोजनामुळें

शास्त्रीय प्रगति व देशाची एकंदर प्रगति यांचा नीट मेळ घालतां येतो आणि म्हणून शास्त्र व शास्त्रज्ञ समाजाच्या जीवनापासून अलिप्त राहात नाहींत. *शास्त्र हें समाजाच्या अभ्युदयासाठीं आहे आणि त्याचा पाया शेवटीं सामाजिक जीवन आहे हा* दृष्टिकोन ठेवून सोविएत संशोधक आपलें शास्त्रीय संशोधनाचें, *सामाजिक महत्त्वाचें कार्य* पार पाडतात. शास्त्रीय नियोजनाचें सोविएत राष्ट्रीय जीवनांत केवढें महत्त्व आहे याची कल्पना तिसऱ्या पंचवार्षिक योजनेंत (सन १९३८–४२) शास्त्रीय संशोधनाचा जो कार्यक्रम आंखण्यांत आला होता त्याच्या पुढील सूत्रवाक्यावरून चटकन ध्यानांत येतें. "या पांच वर्षांच्या आंत सोविएत देशांतील तांत्रिक ज्ञानाचा दर्जा इतका वाढला पाहिजे कीं सोविएत देशांतील दर माणशीं उत्पादन भांडवलशाही देशांतील उत्पादनापेक्षां अधिक झालें पाहिजे."

"*शुद्ध*" (*Pure*) आणि "*उपयुक्त*" (*Applied*) असा भेद सोविएत संशोधक मानीत नाहींत. सर्व संशोधन "*उपयुक्त*" च (*Applied*) असतें असा त्यांचा ठाम समज आहे. त्यांच्या मतें गणितांतील अगदीं गुंतागुंतीचे तात्त्विक प्रश्न देखील अखेर शास्त्राच्या त्या वेळच्या प्रगतीमुळें, म्हणजेच समाजाच्या त्या-वेळच्या परिस्थितींतून, उद्भवलेले असतात. उलट एखाद्या विषयांतील संशोधनाचा एकंदर सामाजिक व शास्त्रीय प्रगतीशीं असलेला स्वाभाविक आधार तोडून तें संशोधन कृत्रिमपणें त्यापासून अलिप्त ठेवण्यांत आलें, तर त्याची प्रगति लवकरच कुंठित होईल. संशोधन "शुद्ध" असणें शक्य नाहीं व योग्यहि नाहीं. यावरून तात्त्विक संशोधनाकडे (*Theoretical*) तेथें लक्ष दिलें जात नाहीं असा समज करून घेणें मात्र चुकीचें ठरेल. शास्त्रपरिषदेचा वृत्तांत पुढें दिला आहे त्यावरून ही गोष्ट सिद्ध होईल.

सोविएत देशांत नागरिकांच्या दैनंदिन जीवनाशीं शास्त्राचा कसा निकटचा संबंध येतो हें पाहाण्यासारखें आहे. लहानपणीं मुलांच्या मनावर शास्त्रीय दृष्टिकोन पहिल्यापासून बिंबावा असा प्रयत्न शाळेंतील शिक्षक करतात; अभ्यासक्रमांत शास्त्रीय विषयांना प्राधान्य दिलें जातें; मुलांच्या शास्त्रविषयक आवडीला अभ्यासक्रमाबाहेरील चळवळीच्या द्वारा हरतऱ्हेनें उत्तेजन देण्यांत येतें; आणि प्रौढ कामगार व शेतकरी यांना हौशी विज्ञानमंडळें स्थापून शास्त्राकडे लक्ष देण्यास प्रवृत्त केलें जातें. नामांकित शास्त्रज्ञ या मंडळांना भेट देऊन त्यांस मार्गदर्शन करतात. कारखाने, शेतें व इतर

उद्योगकेंद्रें यांना जोडून निघालेल्या प्रयोगशाळांमुळेंहि हीच गोष्ट साध्य होते. कामगार व शेतकरी शास्त्रीय ज्ञान व संशोधन यांविषयीं किती उत्साही बनत आहेत याची या प्रयोगशाळांच्या वाढत्या संख्येवरून, सहज कल्पना करतां येईल.

विशेषतः शेतकरी जीवनाशीं शास्त्रीय संशोधनाचा कसा घनिष्ठ संबंध येतो हें ध्यानांत घेणें आवश्यक आहे. प्रत्येक सामुदायिक शेतावर एक शेतीशास्त्रतज्ज्ञ असतो आणि शेताला जोडून प्रयोगशाळा ( *Cottage Laboratory* ) असते. तेथें बींबियाण्यांची निवड, खतें, कलमें यांवरील प्रयोग नेहमीं चालू असतात. अनेक शेतकरी प्रख्यात शेतीशास्त्रज्ञांशीं आपल्या प्रयोगांविषयीं सतत पत्रव्यवहार करतात. खेड्यांतील ग्रंथालयांत शास्त्रविषयक पुस्तकांचा उत्तम संग्रह असतो. १९३८ सालीं केलेरकृत "*वनस्पतींचें जीवन*" आणि "*रसायनशास्त्र*" ही पुस्तकें *दोन लाखांहून*" अधिक सोविएत शेतकरी वापरीत होते! यावरून हीं गोष्ट उघड होते कीं, इतर देशांप्रमाणें सोविएत शेतकरी परंपरागत रूढ शेतीपद्धति व साधनें वापरणारा व त्यांत समाधान मानून राहणारा धिम्मा शेतकरी राहिलेला नाहीं. शेतीच्या पद्धती कशा सुधारतां येतील, काय केल्यानें कमी श्रमांत अधिक उत्पन्न निघेल, अशा शास्त्रीय दृष्टिकोनांतून शेतीकडे पाहण्यास तो शिकत आहे.

इतर देशांत शास्त्रीय ज्ञान व संशोधन हीं समाजाशीं कधींच एकरूप पावत नाहींत; तेथें शास्त्रज्ञांचा सामाजिक जीवनाशीं संबंध येऊं नये अशी जणुं काय खबरदारीच घेतली जाते. न जाणों, समाजाशीं संबंध आला तर ते सामाजिक घटनांकडे शास्त्रीय दृष्टिकोनांतून पाहातील व त्यांवर विदारक प्रकाश पाडून सध्यांची समाजपद्धति कुचकामी ठरवितील, अशी भीति तर याच्या मुळाशीं नसावी ना? कांहींहि असो, शास्त्र व शास्त्रज्ञ यांविषयीं इतर देशांतील सत्ताधारी वर्गाचें मत "चांगली गोष्ट आहे; असूं द्या; पण त्यांनीं भलत्या भानगडींत ( सामाजिक व राजकीय ) पडतां कामा नये; शुद्ध ( *Pure* ) शास्त्राकडेच त्यांनीं लक्ष द्यावें." याहून दुसरें नसतें. परंतु सोविएत देशांत शास्त्रीय ज्ञान समाजजीवनापासून अलग राखलेलें नाहीं; अर्थातच, शास्त्रीय संशोधन व शास्त्रज्ञ यांना त्या देशांत बहुमानाचें स्थान आहे. शास्त्रीय विषयांवरील पुस्तकांचा इतका मोठा खप दुसऱ्या कोणत्याहि देशांत नाहीं. प्रो. डिरॅककृत 'शक्तींच्या अणूंचें शास्त्र" ( *Quantum Mechanics*) या पुस्तकाच्या ३००० प्रती तेथें कांहीं महिन्यांच्या अवधींत संपल्या आणि

इंग्लंडमध्यें तीन वर्षांच्या काळांत २००० प्रतीसुद्धां खपल्या नाहींत. तीच गोष्ट *प्रो. आयन्स्टाईनकृत* गणितविषयाच्या अवघड ग्रंथांसंबंधीं. शास्त्रीय ज्ञानाच्या प्राथमिक पुस्तकांच्या लाखोंवारी खपाचा उल्लेख वर आलाच आहे.

*शास्त्रीय संशोधन ही केवळ चैनीची बाब नसून जीवन बदलण्यासाठीं, सुधारण्यासाठीं, समृद्ध करण्यासाठीं त्याची आवश्यकता आहे* ही गोष्ट त्यांना पटली आहे आणि शास्त्रीय संशोधनापासून होणारे सामाजिक फायदे आम जनतेला त्या देशांत प्रत्यक्ष जीवनांत हरघडी अनुभवास येत आहेत. म्हणूनच शास्त्रपरिषदेमध्यें नव्या सभासदांची निवड चालू असली कीं त्याविषयीं जिकडे-तिकडे मोठें कुतूहल निर्माण होतें व चर्चा सुरू होते. शास्त्रीय शोधांची व शास्त्र-परिषदेची बातमी वर्तमानपत्रांत *पहिल्या पानावर पांच कॉलमी मथळा देऊन* छापण्यांत येते ! शास्त्रज्ञ व संशोधन यांच्या लोकप्रियतेचा आणखी पुरावा देण्याची जरूरी नाहीं.

सोविएत देशास गेल्या वर्षी जाऊन आलेले केंब्रिज येथील प्रसिद्ध शारीरशास्त्रज्ञ *प्रो. इ. डी. ॲड्रियन* एफ्. आर. एस्. यांनीं व्यक्त केलेलें खालील मत पाहा. "...... शास्त्रपरिषदेच्या सदस्याला ( *Academician* ) जगांत अन्यत्र कोठेंही या देशाइतकें महत्त्व दिलेलें आढळून येत नाहीं. शास्त्राला एवढा बहुमान मिळावा असें कोणतें महत् कार्य शास्त्रानें येथें बजाविलें आहे ? इतर देशांप्रमाणें येथेंहि गेल्या महायुद्धांत शास्त्रीय संशोधनानें महत्त्वाची कामगिरी बजाविली हें खरें; तसेंच शास्त्राशिवाय सोविएत देशाची आजमितीला दिसून येणारी एवढी मोठी प्रगति झाली नसती हें उघड आहे. परंतु सामान्य नागरिकाचा शास्त्रीय प्रगतीशीं संबंध मेट्रो ( मॉस्कोमधील प्रख्यात भूमिगत रेल्वे ) आणि शेतीच्या पिकांमधील वाढ यांच्या रूपानेंच येतो असें नव्हे; तर सामान्य नागरिक पदार्थविज्ञान व ख-ज्योतिष ( *Astronomy* ) या विषयांवरील ग्रंथ वाचतो असेंहि दिसतें! शास्त्राला सोविएत देशांत आज जो इतका बहुमान मिळतो त्याचें कारण, कांहीं अंशीं तरी, तेथील शासनसंस्थेला आधारभूत असलेली विचारप्रणाली असली पाहिजे हें उघड आहे. या तत्त्वप्रणालीनें प्रेरित झाल्यामुळेंच तेथील सरकार सर्व प्रकारच्या संशोधनावर विपुल पैसा खर्च करीत आहे; आणि म्हणूनच या महायुद्धाच्या काळांत, सर्वच बाबतींत चणचण भासत असून देखील मुख्यतः तात्त्विक अशा संशोधनासाठीं ( *Problems*

*of more academic type* ) इनके संशोधक खपत होते..." ( *Nature* २२ ऑगस्ट ४५ )

सोविएत शास्त्र-परिषद ( *Academy of Sciences* )

सन १९४५ च्या जून महिन्यांत सोविएत शास्त्रपरिषदेचा २२० वा वाढदिवस मॉस्को व लेनिनग्राद या शहरांत एक पंधरवडाभर मोठ्या थाटानें साजरा करण्यांत आला. अठरा देशांतील अनेक थोर शास्त्रज्ञ या प्रसंगीं निमंत्रित पाहुणे म्हणून हजर होते. सोविएत देशांतील व परदेशांतील मिळून १२०० हून अधिक संशोधकांचा मेळावा जमला होता. या समारंभासाठीं आपल्या देशातर्फे कलकत्त्याचे *प्रो. मेघनाद साहा* हे सुप्रसिद्ध पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ खास निमंत्रणावरून गेले होते. सभा, चर्चा, प्रयोगशाळांची पाहाणी, एकमेकांशीं ओळख, प्रेक्षणीय स्थळांना भेटी, असा पंधरा दिवसांचा भरगच्च कार्यक्रम या परदेशस्थ पाहुण्यांसाठीं ठेवण्यांत आला होता. शिवाय मेजवान्या, नाटकें, ऑपेरा इत्यादि करमणुकीचा कार्यक्रम होता तो वेगळाच. युरोपीय महायुद्ध संपल्यानंतर अवघ्या दीड महिन्याच्या आंत ही घटना घडून आली ही गोष्ट ध्यानांत घेतली कीं, सोविएत देशांत शास्त्रीय संशोधन व शास्त्रज्ञ यांचें स्थान किती मानाचें आहे याची खात्री पटते. गेल्या पंचवीस वर्षांत त्या देशांत संशोधनाचा व्याप कितीतरी पटीनें वाढला आहे हें आपण वर पाहिलेंच आहे. या सर्व शास्त्रसंशोधनाला नियोजन, नियंत्रण व मार्गदर्शन करण्याचें कार्य ही सोविएत शास्त्र-परिषद करते. हिचा वृत्तान्त आपण आतां पाहूं.

वरवर पाहिल्यास ही शास्त्रपरिषद इतर देशांतील शास्त्रपरिषदांप्रमाणें ( उदाहरणार्थ, इंग्लंडमधील रॉयल सोसायटी, अमेरिकेंतील नॅशनल ॲकेडेमी ) असावी असा वाचकांचा ग्रह होईल. पण पुढील माहितीवरून सोविएत परिषदेचें स्वरूप व कार्य इतर देशांतील तत्सम संस्थांहून कसें निराळें आहे हें समजून येईल. १९१७ सालापूर्वी मात्र ती इतर देशांसारखीच होती. *पीटर दि ग्रेट* या प्रसिद्ध रशियन राजानें १७२५ सालीं या शास्त्रपरिषदेची स्थापना केली. सुरवातीस तिच्या सदस्यांची ( *Academicians* ) संख्या *पंधरा* होती व त्यांच्या वेतनासाठीं व इतर खर्चासाठीं सुमारें ५००० पौंड खर्च केले जात. तेव्हांपासून नोव्हेंबर क्रांतीपर्यंत, सुमारे दोनशें वर्षांत, एवढा दीर्घकाल व या कालांत इतर देशांत झालेली प्रगति

ध्यानांत घेतां, या शास्त्रपरिषदेची फारशी प्रगति झाली नाहीं हें पुढें दिलेल्या कोष्टकावरून दिसून येतें. पण क्रांतिपूर्व कालांत रशियामध्यें थोर शास्त्रज्ञ कोणीच नव्हते असें मात्र नाहीं. *मेंडेलिफ, पावलोव, लोमोनोसोव, कार्पिन्स्की* इत्यादि जगप्रसिद्ध रशियन शास्त्रज्ञ झारशाही शास्त्रपरिषदेचे सदस्य होते. परंतु तिचा व्याप एकंदरींत अतिशय लहान होता. अनेक शास्त्रज्ञांची द्रव्याभावीं कुचंबणा होत असे. असें सांगतात कीं प्रख्यात मानसशास्त्रज्ञ *पावलोव* यांना आपल्या मदतनीसांचा पगार स्वतांच्या मिळकतींतून द्यावा लागे! सोविएत सत्तेच्या गेल्या वीसपंचवीस वर्षांत शास्त्रपरिषदेच्या फैलावांत किती वाढ झाली आहे, पाहा.

शास्त्रपरिषदेची प्रगति

| सन | १९१७ | १९४१ |
|---|---|---|
| सदस्य ( *Academician* ) | ४५ | १४२ * |
| संशोधन संस्था( *Research Institutes*) | १ | ९४ |
| इतर शास्त्रविषयक संस्था | २५ (हून कमी ) | १०० (हून अधिक) |
| संशोधक | २१२ | ५००० |
| सरकारी खर्च | १५ लक्ष रूबल | १३१ कोटि रूबल |
| ग्रंथालयांतील ग्रंथसंख्या | ९½ लक्ष | १·१ कोटि |
| परिषदेतर्फे निघणारीं नियतकालिकें | १२ | ४४ |
| संशोधनांचा मजकूर ( दरसाल ) | ६०० पृष्ठें | १०,००० पृष्ठें |

या पंचवीस वर्षांत परिषदेतर्फे निरनिराळ्या ५०० समित्यांनीं भूगोल, अर्थशास्त्र, वंशशास्त्र, प्राणि, वनस्पति आणि खनिज संपत्ति यासाठीं सोविएत देशांतील निरनिराळ्या प्रदेशांची पाहाणी केली व हें काम अद्यापहि सतत सुरू आहे.

शास्त्रपरिषदेच्या कार्याचा व्याप एवढा वाढला त्यांमधील एक महत्त्वाची गोष्ट अशी कीं झारशाहींत ज्या रशियनेतर गुलाम राष्ट्रांत शास्त्रीय संशोधनाचें नांवसुद्धां

* याशिवाय सध्यां शास्त्रपरिषदेचे
२०० मान्यवर ( *Corresponding Members* )
सदस्य आहेत.

माहीत नव्हतें त्या राष्ट्रांत आतां शास्त्रपरिषदेच्या शाखा व संशोधन संस्था यांचें जाळें पसरलें आहे. मध्यआशिया व पूर्वेकडील प्रदेश यांमध्यें सध्यां परिषदेच्या *सात* शाखा आहेत. त्या अशाः- *काझाकिस्तान, किरगीजिस्तान, ताजिकिस्तान, तुर्कोमेनिस्तान, ऊरलप्रदेश, पश्चिम सायबेरिया आणि काझान.* शिवाय *अतिपूर्वेकडील प्रदेश, कोला आणि कोमी* येथें *तीन उपशाखा* असून उत्तरेकडील बर्फमय टंड्रा प्रदेशांत *आर्केंजल* येथेंहि एक संशोधनसंस्था आहे. यांमधील किरगीजिस्तान व पश्चिम सायबेरिया येथील शाखा युद्धकालांत उघडण्यांत आल्या आणि काझान शाखा तर नुकतीच सुरू झाली. या सर्व शाखा व त्यांच्या देखरेखीखालील संस्था मिळून सुमारें ३००० कार्यकर्ते संशोधनकार्यांत गुंतले आहेत.

या शाखांशिवाय *सात स्वतंत्र राष्ट्रांच्या स्वतंत्र शास्त्रपरिषदा* असून त्यांचें कार्य वरील शास्त्रपरिषदेप्रमाणें चालतें. या परिषदा पूर्वी सोविएत परिषदेच्या शाखा होत्या, पण पूर्ण वाढ झाली तशा त्या स्वतंत्रपणें कार्य करूं लागल्या. प्रथम *यूक्रेनची* शास्त्रपरिषद १९२५ सालीं स्थापन झाली; नंतर *श्वेतरशिया* शास्त्रपरिषद सुरू झाली; १९४० सालीं *जॉर्जियन* शाखा स्वतंत्र परिषद बनली; १९४३ मध्यें *आर्मीनिया* व *उजबेकिस्तान*; आणि १९४५ च्या मार्च महिन्यांत *अझरबैजान* राष्ट्रानें आपली स्वतंत्र शास्त्रपरिषद उघडली. या स्वतंत्र शास्त्र-परिषदा आणि सोविएत परिषदेच्या वरील शाखा यांनीं आपापल्या राष्ट्रांच्या प्रगतीला अनुरूप अशी बहुमोल भर संशोधन कार्यांत टाकली आहे.

सोविएत शास्त्र परिषदेचें कार्य कोणतें ? तिचें मुख्य कार्य देशांतील संशोधनाला मार्गदर्शन करण्याचें व देखरेख करण्याचें आहे. परिषदेच्या नियोजन कार्यावर एकंदर राष्ट्रीय प्रगतीचें नियोजन करणाऱ्या समितीचें थोडेंफार नियंत्रण असतें. परंतु संशोधनकार्यावर परिषदेचा पूर्ण अधिकार असतो. परिषदेच्या घटनेंतील पुढील कलमावरून तिचें उद्दिष्ट स्पष्ट होतें. "*सोविएत देशांत सर्व शास्त्रांमध्यें व्यापक प्रगति घडवून आणणें, अद्ययावत् शास्त्रीय संशोधनाचा अभ्यास करणें आणि सोविएत देशाची उत्पादनक्षमता वाढविण्यासाठीं, श्रमजीवि जनतेची सांस्कृतिक पातळी उंचावण्यासाठीं व वर्गविरहित समाजरचनेचें ध्येय पूर्ण करण्यासाठीं या संशोधनाचा उपयोग करणें,*" हें शास्त्रपरिषदेचें

उद्दिष्ट आहे. त्याच्या पूर्ततेसाठीं परिषद् नियोजनपूर्वक संशोधनकार्य चालविते. सदस्य अथवा मान्यवर सदस्य, कार्यकारी मंडळ आणि अध्यक्ष यांची निवड व परिषदेचा कारभार परिषदेच्या लोकशाही घटनेनुसार होते. गेल्या वर्षापर्यंत प्रो. *कोमॅरोव* हे परिषद्चे अध्यक्ष होते; यावर्षी प्रो. *वाविलाव* यांची निवड झाली आहे.

१९१७ सालीं परिषदेचे *तीन* विभाग होते :—पदार्थविज्ञान व गणित; रशियन भाषा व वाङ्मय; आणि इतिहास व तत्त्वज्ञान. १९२६ सालच्या पुनर्घटनेंत, गणित व विज्ञान; आणि समाजशास्त्र; असे दोनच विभाग कल्पिण्यांत आले. परिषदेची जागा १९३४ मध्यें लेनिनग्रादहून मॉस्को येथें हलविण्यांत आली आणि तिसरा विभाग तांत्रिक शास्त्रें ( *Technological Sciences* ) स्थापण्यांत आला. १९३८ सालीं घटनेंत पुनः एकदां बदल झाला. तेव्हांपासून परिषदेचें कार्य आठ विभागांत वांटून देण्यांत आलें आहे. ते *आठ विभाग* असे :—

*१. पदार्थविज्ञान शास्त्र व गणित,*

*२. रसायन,*

*३. भूगर्भशास्त्र व भूगोल,*

*४. वनस्पति व प्राणिशास्त्र,*

*५. तांत्रिक शास्त्रें ( Technological Sciences ),*

*६. इतिहास व तत्त्वज्ञान,*

*७. अर्थशास्त्र व कायदा, आणि*

*८. भाषा व वाङ्मय.*

म्हणजे सध्यां पांच विभाग भौतिक शास्त्रांचे असून तीन सामाजिक शास्त्रांचे आहेत. संशोधन कोणत्याहि शास्त्रांतील असो त्याला प्रेरणा देणारें तत्त्वज्ञान *द्वंद्वात्मक भौतिकवाद* ( *Dialectical Materialism* ) आहे. प्रयोगाची शास्त्रीय पद्धति अवलंबिण्यांत येते आणि प्रत्यक्ष आचार ( *Practice* ) ही त्याची कसोटी समजण्यांत येते. परिषदेतर्फे निघत असलेल्या अर्थशास्त्र व तत्त्वज्ञान या विषयांना वाहिलेल्या मासिकाचें "*मार्क्सवादाच्या झेंड्याखालीं*" ( *Under the Banner of Marxism* ) हें नांव वरील तत्त्वाला साजेसें आहे.

सर्व शास्त्रें "*उपयुक्त*" ( *Applied* ) आहेत. "*शुद्धत्वा*" ची कल्पना चुकीची आहे असें सोविएत शास्त्रज्ञांचें मत आहे, याचा उल्लेख मागें आला आहे. पण ज्याचा उपयोग आतांच होईल अशा प्रकारचेंच सर्व संशोधन सोविएत शास्त्रज्ञ करतात असें म्हणणें मात्र बरोबर होणार नाहीं. ताबडतोबीनें ज्याचा कांहीं एक उपयोग नाहीं असें तात्त्विक संशोधन ( *Theoretical* ) सोविएत देशांत फार मोठ्या प्रमाणावर चालतें. प्रो. *विनोग्रादोव* या गणितज्ञाचें संख्याशास्त्रावर संशोधन सुरू असून सुप्रसिद्ध पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ प्रो. *कापित्झा* यांनीं "अतिद्रवीभवन" ( *Super-Fluidity* ) हा तात्त्विक दृष्ट्या अतिशय महत्त्वाचा शोध तर युद्धकालांत लावला. प्रो. *ॲड्रियन* या इंग्रज शास्त्रज्ञाचें मत वर दिलें आहे. प्रो. *एल्टंटन* या रसायनविज्ञाच्या मतें "सोविएत देशांत तात्त्विक संशोधनाला *इंग्लंडपेक्षां अधिक* वाव मिळतो; इंग्लंडमध्यें बरेंचसें संशोधन तात्कालिक प्रश्नांसंबंधीं असतें." प्रोफेसर महाशय कांहीं वर्षें सोविएत देशांत संशोधन करीत होते. प्रो. *मेघनाद साहा* यांच्या म्हणण्याप्रमाणें पाहिलें तर "सोविएत देशांत तत्त्विक संशोधनाचें महत्त्व उत्तम रीतीनें जाणण्यांत येतें; *परंतु वास्तविक पाहातां तात्त्विक व व्यावहारिक असा संशोधनामध्यें भेद करतां यावयाचा नाहीं.*"

सोविएत संशोधनाचा योग्य परामर्श घेणें या ठिकाणीं शक्य होणार नाहीं. फक्त कांहीं महत्त्वाच्या संशोधनाचा पुढें उल्लेख केला आहे. प्रो. *जोफे* या रसायनविज्ञांनीं अभेद्य (नेहमींपेक्षां हजार पटीनें भक्कम) कांच शोधून काढली आहे; शिल्पशास्त्रावर या शोधाचा दूरगामी परिणाम होईल यांत शंका नाहीं. प्रो. *मिचूरिन* या प्रख्यात वनस्पतिशास्त्रज्ञांनीं निरनिराळ्या झाडांचा संयोग घडवून नवीं फळझाडें निर्माण केलीं आहेत; आतां बर्फमय टंड्रा प्रदेशांत द्राक्षें पिकतात. प्रो० *त्सित्सिन* यांनीं दोन महिन्यांत पीक देणारी गव्हांची जात आणि अनेक हंगामांत पीक देणारें गव्हाचें रोप शोधून काढलें आहे. प्रो. *लायसेंको* यांनीं "वसंतीकरण" ( *Vernalization* ) कृत्रिम रीतीनें रोप लवकर वाढविणें, हा शोध लाविला आहे. प्रो. *लाविलाव* यांनीं जगभर ६० वेळा फेऱ्या करून तीन लक्ष वनस्पतींचे नमुने जमा केले आहेत. उत्तर ध्रुवावरील स्वारींत भाग घेणारे प्रो. *श्मिट* हे सर्व पाश्चात्य मुलांच्या परिचयाचे झाले आहेत. रक्तसंचय करून ठेवतां येतो हा शोध प्रथम सोविएत देशांत लागला. आज अणुविच्छेदन व अणुबॉंब यांचा उल्लेख सर्वांच्या तोंडीं येतो. सोविएत देशांत

यावर बरेंच संशोधन झालेलें आहे व एक शक्तिमान् सायक्लोट्रॉन ( अणुविच्छेदनाचें यंत्र ) लेनिनग्राद येथें आहे. अणुबाँबहि तेथें तयार झाले असावेत असा कांहीं परदेशस्थ शास्त्रज्ञांचा अंदाज आहे ! प्रस्तुत लेखकाच्या मतें मात्र अणुशक्तीचा उपयोग संहारापेक्षां समाजोपयोगी कार्याकडे ( इंजिनें चालविणें वगैरे ) कसा करतां येईल यावर सोविएत संशोधकाचें अधिक लक्ष असावें.

युद्धकालाची गोष्ट घेतली तरी या कालांत नानाविध संशोधन झालेलें दिसतें. मॉस्को-वरील विमान–हल्ल्यांची पूर्वसूचना मिळण्यासाठीं आणि लोकांस ती कळविण्यासाठीं विद्युत्शक्तीच्या साहाय्यानें चालणारे "नेत्र, कान व आवाज" ( *Electric Eyes, Ears and Voicé* ) वापरण्यांत येत असत. प्रो. *कापित्झा* यांचा अतिद्रवी-भवनाचा शोध या काळांतील आहे. तसेंच द्रवरूप ऑक्सिजन तयार करण्याची जगांतील सर्वांत मोठी प्रयोगशाळा त्यांच्या देखरेखीखालीं तयार झाली. लेनिनग्राद येथील वनस्पतिशास्त्राच्या संस्थेतर्फे, हिवाळ्यांत पानांचे रंग टिकून नजरभूल ( *Camouflage* ) करणें सोपें व्हावें यासाठीं संशोधन करण्यांत आलें. तसेंच तेथें वेढा पडला असल्यामुळें भाजीपाला व फळें यांचा दुष्काळ पडला होता. म्हणून त्यामधील जीवनसत्त्वें इतरत्र शोधून काढण्यासाठीं गवत, झाडेंझुडपें, शेवाळ यांवर संशोधन करण्यांत आलें. परंतु या युद्धोपयोगी संशोधनामुळें "*सोविएत देशांतील वनस्पति*" या ग्रंथराजाचे जे दोन खंड प्रसिद्ध व्हावयाचे, त्या कामांत खंड पडला नाहीं ! मज्जावाहिनींना बसलेला जबर धक्का कसा दूर करतां येईल व रक्तस्रावामुळें झालेली हानि लवकर कशी भरून काढता येईल यांवर बहुमोल संशोधन झालें व युद्धांत जखमी झालेल्या वीरांचे प्राण वांचविण्यासाटीं त्याचा उपयोग झाला.

इतर देशांच्या मानानें सोविएत संशोधनाचा दर्जा कोणत्या प्रतीचा ठरेल ? या प्रश्नाचें उत्तर प्रो. *मेघनाद साहा* यांच्या शब्दांत दिलेलें बरें. त्यांच्या मतें, भूगर्भशास्त्र, वनस्पतिशास्त्र, यांमध्यें सोविएत देशाचें स्थान पहिलें आहे. प्रो. *कार्पिन्स्की, वेर्नादस्की, वाविलाव व लायसेंको* हे शास्त्रज्ञ या क्षेत्रांत प्रसिद्ध आहेत. पदार्थविज्ञान, रसायन व गणित या विषयांत सोविएत संशोधन अमेरिका, फ्रान्स अथवा जर्मनी यांच्या मागें आहे. परंतु या विषयांमध्येंहि प्रो. *विनोग्रादोव* (गणित) व *कापित्झा* (पदार्थ विज्ञान) हे शास्त्रज्ञ पहिल्या प्रतीचे आहेत. वैद्यक शास्त्रांत सोविएत शास्त्रज्ञांनीं रक्तसंक्रमण ( *Blood Transfusion* ) पेनिसिलिन,

धक्क्यानें 'मृत' झालेल्यांचें संजीवन इत्यादि शाखांत बरेंच संशोधन केलें आहे. इतकें कीं अमेरिकेंत आतां सोविएत वैद्यकावर एक खास नियतकालिक प्रसिद्ध होतें ! नवीन प्रयोगशाळा उत्तम तन्हेनें बांधण्यांत येत आहेत आणि दहा वर्षांच्या अवधींत अद्यावत् अमेरिकन प्रयोगशाळांना त्या मागें टाकतील. संशोधनाच्या कारभारांत ( *Organisation* ) सोविएत देशाला अमेरिका व जर्मनी यांपासून अद्याप बरेंच शिकण्यासारखें आहे. सोविएत देशांत संशोधनास पद्धतशीर सुरवात झाल्याला फक्त पंधरा वर्षें झालीं ही गोष्ट ध्यानांत घेतल्यास प्रो. *साहा* यांना दिसून आलेली वरील प्रगति चांगलीच आहे असें म्हणण्यास बिलकूल हरकत नाहीं.

सोविएतवरून आपली नजर हिंदुस्थानाकडे वळविली तर काय दिसतें ? हिंदुस्थानांतील संशोधन किती तोकडें आहे याची कल्पना मागें दिली आहे. येथें होत असलेल्या संशोधनाचा दर्जाहि कमी प्रतीचा असतो. प्रो. *मेघनाद साहा*, *सर चंद्रशेखर रामन्*, प्रो. *कृष्णन्*, प्रो. *बिरबल साहानी* अशासारखे पहिल्या प्रतीचे संशोधक फारच थोडे आहेत, ही गोष्ट सर्वमान्य आहे. पण याचा अर्थ असा नव्हे कीं आपल्या देशांत संशोधक बुद्धीची वाण आहे. कारण कित्येक वर्षें खर्डेघाशी करीत बसलेले कै. *'रामानुजम्* संधि मिळतांच उच्च प्रतीचे गणितज्ञ म्हणून चमकले आणि गणितांतील त्यांचें संशोधन पाहून केंब्रिज येथील पंडितांनीं आश्चर्यानें तोंडांत बोटें घातलीं. योग्य संधीच्या अभावीं संशोधनबुद्धीचा होत असलेला कोंडमारा व त्यामुळें होणारी देशाची अपरिमित हानि पाहिली कीं ब्रिटिश साम्राज्यशाहीनें आपल्या सर्वांगीण जीवनास केवढी जबरदस्त मगरमिठी मारली आहे याची पुनः एकवार खात्री पटते. परंतु स्वातंत्र्यसंपादनानंतर आपल्या देशाचा मागासलेपणा चुटकीसरसा जाईल असें म्हणतां येणार नाहीं. कित्येक शतकांची ही दुरवस्था नाहींशी करण्यासाठीं योजनापूर्व आणि पराकाष्ठेचे प्रयत्न करावे लागतील.

गेल्या युद्धकालांत औद्योगिक व शास्त्रीय क्षेत्रांतील मागासलेपणा साम्राज्यशाहीच्या येथील हस्तकांनाहि तीव्रतेनें जाणवूं लागला, तेव्हां औद्योगिक व शास्त्रीय संशोधन वाढीस कसें लागेल या प्रश्नाचा विचार करून योजना ठरविण्यासाठीं सरकारनें एक समिति नेमली व एक नवीन खातें उघडण्यांत आलें. या समितीवर

सर आर्देशीर दलाल यांसारखे उद्योगधंद्यांचे प्रमुख व सर भटनागर यांसारखे शास्त्रज्ञ घेण्यांत आले होते; परंतु समितीचें कार्य व पुढील योजना निराशाजनक आहेत. आश्चर्य असें कीं येथील भांडवलदारांनींहि अद्याप संशोधनाचें महत्त्व ओळखलेलें नाहीं. सरकारी नियोजनाचें स्वरूप *प्रो. मेघनाद साहा* यांच्या पुढील उद्गारांवरून स्वच्छ दिसतें. सोविएत देशांत शास्त्रज्ञांना मिळालेलें मानाचें स्थान व आपल्या देशांतील शास्त्रज्ञांची परिस्थिति यांची तुलना करतांना ते म्हणतात, "राष्ट्रीय प्रगतीची दिशा व धोरण ठरवून तें पार पाडण्यासाठीं सोविएत सरकार शास्त्रज्ञांना विश्वासांत घेतें; शासनसंस्थेच्या अगदीं आंतल्या गाभाऱ्यांत त्यांना प्रवेश मिळतो. पण आपल्या देशांत मात्र त्यांची बोळवण, श्रीमंत मनुष्यांच्या गरीब नातलगांप्रमाणें, बंगल्यापासून दूर गडीमाणसांच्या चाळींत करण्यांत येते; आणि हें केवळ धोरण ठरविण्याच्या बाबतींतच नव्हे तर ज्यामध्यें प्रत्यक्ष शास्त्रीय ज्ञानाची आवश्यकता असते अशा बाबतींतहि ! शास्त्रीय ज्ञान कशाशीं खातात याचीहि ज्यांना माहिती नाहीं असे राजकीय पुढारी, भांडवलशाहीचे प्रतिनिधि आणि उद्धट सरकारी नोकर, यांचाच येथें अधिक प्रभाव पडतो !" साम्राज्यशाहीच्या छायेंत शास्त्रीय प्रगति होईल अशी आशा करणें कसें साफ चुकीचें आहे हें या स्पष्टोक्तीवरून उघड होतें. असो.

निरनिराळ्या देशांतील शास्त्रज्ञांनीं एकत्र येऊन एकमेकांशीं सहकार्य केलें पाहिजे असें सोविएत शास्त्रज्ञांस निश्चयानें वाटतें. शास्त्रपरिषदेच्या २२० व्या वाढदिवसासाठीं अनेक परदेशस्थ शास्त्रज्ञांस दिलेलें आमंत्रण, त्यांच्यासाठीं आंखलेला भरगच्च कार्यक्रम, त्यांच्या सुखसोयींकडे पुरविण्यांत आलेलें लक्ष व सोविएत जनतेनें केलेलें त्यांचें स्वागत या गोष्टी हेंच दर्शवितात. *प्रो. कापित्झा* यांच्या शब्दांत सांगावयाचें तर असें म्हणतां येईल कीं "शास्त्रसंशोधनाच्या कामीं आंतरराष्ट्रीय सहकार्य असलें पाहिजे याची सोविएत देशाला जाणीव आहे; याकरितां शास्त्रपरिषद पुढील प्रकारें सुरवात करणार आहेः ( १ ) शास्त्रपरिषदेतर्फे होणारें संशोधन रशियन, इंग्रजी व फ्रेंच या भाषांत प्रसिद्ध करण्यांत येईल. ( २ ) आंतर्राष्ट्रीय अधिवेशनामध्यें सोविएत शास्त्रज्ञ भाग घेतील व सोविएत परिषद तशीं अधिवेशनें स्वतां भरवील. ( ३ ) सोविएत देश व इतर देश यांमध्यें संशोधकांची देवाणघेवाण व्हावी असें धोरण सोविएत शास्त्र-परिषद ठेवील."

शेवटीं शास्त्राविषयीं सोविएत समाजाचा दृष्टिकोन सोविएत जनतेचे पुढारी स्तालिन यांच्या शब्दांत देऊन हें विवेचन पुरें करतों. १७ मे १९३८ रोजीं उच्च-शिक्षणसंस्थांत अध्यापनाचें व संशोधनाचें काम करणाऱ्या सोविएत विद्वानांची परिषद क्रेमलिनमध्यें भरली होती. त्यावेळीं शास्त्रांविषयीं बहुमान व्यक्त करतांना *स्तालिन* म्हणाले, "...*ज्या योगें शास्त्रज्ञ रूढ शास्त्रीय ज्ञानाचें महत्त्व व सामर्थ्य ओळखून त्याचा शास्त्राच्या प्रगतीसाठीं उपयोग करतील पण त्या रूढ ज्ञानाचे गुलाम बनून मात्र राहणार नाहींत; ज्यायोगें जुनाट झाल्यामुळें प्रगतीला रोखून धरीत असलेल्या जुन्या रूढी, प्रमाणें व मतें मोडून काढण्याचें धैर्य व निश्चय शास्त्रज्ञांच्या अंगीं उत्पन्न होईल; आणि जी प्रगति नव्या परंपरा, नवीं प्रमाणें व नवीं मतें निर्माण करूं शकेल; अशा प्रकारच्या शास्त्रीय प्रगतीला अभिवादन असो !*" खऱ्या शास्त्रज्ञाचा शास्त्राविषयीं याहून वेगळा असा कोणता दृष्टिकोन असणार ?

# अध्यापनसंस्था आणि शिक्षकवर्ग ९

सोविएत देशांतील निरनिराळे शिक्षणक्रम व तो शिकविणाऱ्या शिक्षणसंस्था यांचा आपण आतांपर्यंत विचार केला. या सर्व शिक्षणसंस्थांमध्यें ज्याची भूमिका सर्वांत विशेष महत्त्वाची तो सोविएत शिक्षकवर्ग व त्याला अध्यापनशास्त्राचें शिक्षण देणाऱ्या अध्यापनसंस्था यांची विशेष माहिती या प्रकरणांत करून देण्याचें योजिलें आहे.

सध्यां सोविएत देशांत मुख्यतः *तीन* प्रकारच्या अध्यापनसंस्था आहेत :

## १ प्राथमिक शिक्षकांच्या अध्यापनशाळा ( *Teaching Schools*)

या संस्थांत दाखल होणाऱ्या विद्यार्थ्यानें सप्तवार्षिक शिक्षणक्रम पुरा केलेला असतो म्हणजे त्याच्या वयास पंधरा वर्षे पूर्ण झालेलीं असतात. अध्यापनशाळेंतील शिक्षणक्रम तीन वर्षांचा असतो. पहिल्या वर्षी अध्यापनासंबंधीं शिक्षण दिलें जात नाहीं. या वर्षाचा अभ्यासक्रम वरिष्ठ दुय्यम शाळेंतील अभ्यासक्रमासारखा, म्हणजे सर्वसाधारण शिक्षणाचा ( *General Education* ) असतो; आणि तो शिकविण्याची

पद्धतीहि दशवार्षिक शाळेसारखीच असते. दुसऱ्या वर्षापासून कॉलेजांप्रमाणें शिकविण्यांत येतें; शाळेंतील वर्गांप्रमाणें धडे न घेतां अध्यापक व्याख्यानें देतो व विद्यार्थ्यांना बराचसा अभ्यास ग्रंथालयांच्या मदतीनें स्वतः करावा लागतो. तसेंच अध्यापनशास्त्रांतील विषय शिकविण्यास आतां सुरुवात होते. तिसऱ्या वर्षीच्या अभ्यासक्रमांत शिक्षणशास्त्र, मानसशास्त्र, शिक्षणपद्धति ( *Methods* ) इत्यादि विषयांवर भर देण्यांत येतो, आणि या वर्षी शाळेंत शिकविण्याचा प्रत्यक्ष अनुभव घ्यावयाचा असतो. प्रथम आठवड्यांतून एक दोन तास शिकविण्यास सुरुवात होते. आणि वर्षअखेरीस एक सबंध आठवडाभर शाळेंत शिकवणें आवश्यक समजलें जातें. एकूण दहा आठवडे प्रत्यक्ष शिकविण्याचें काम झालें पाहिजे, असा निर्बंध आहे. परीक्षेची पद्धति इतर शिक्षणसंस्थांप्रमाणें असते. अध्यापनशाळांत अध्यापनाचें शिक्षण घेतलेले शिक्षक बालसंस्थांमध्यें अथवा प्राथमिक शाळेंत पहिल्या चार इयत्ता शिकवितात. या शिक्षकांना आपापल्या वर्गाचे सर्व विषय शिकवावयाचे असतात.

### २ दुय्यम शिक्षकांच्या अध्यापनशाळा ( *Teachers' Institutes* )

दुय्यम शिक्षणाच्या वर्गांत, म्हणजे पांचव्या इयत्तेपासून, प्रत्येक विषय शिकविण्यासाठीं त्या विषयाचा तज्ज्ञ दुय्यम शिक्षक असतो. पांचवी, सहावी व सातवी या इयत्तांना शिकविणारे हे दुय्यम शिक्षक वरील अध्यापनसंस्थांत अध्यापनशास्त्राचें शिक्षण घेऊन तयार होतात. या संस्थांत प्रवेश मिळविणाऱ्या विद्यार्थ्यानें दशवार्षिक शिक्षणक्रम पुरा केलेला असावा, निदान नववी इयत्ता पूर्ण केलेली असावी, असा नियम आहे. शिक्षणक्रम दोन वर्षांचा आहे; पण तो तीन वर्षांचा व्हावा, अशी खटपट सध्यां चालू आहे. इतर व्यवसायांच्या शिक्षणक्रमांप्रमाणें या शिक्षणक्रमांतहि भाषा, वाङ्मय, मार्क्सवाद, समाजशास्त्र, शारीरिक व लष्करी शिक्षण हे सर्वसाधारण विषय असतातच; शिवाय शिक्षणशास्त्र, मानसशास्त्र, शिक्षणपद्धति हे अध्यापनशास्त्रांतील विषय असतात. तसेंच ज्या विषयाचा तज्ज्ञ शिक्षक व्हावयाचें असेल, त्याचा अध्यापनाच्या दृष्टीनें विशेष अभ्यास करावयाचा असतो. शास्त्रीय विषयाचा शिक्षक होऊं इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांस आपल्या विषयाचें प्रायोगिक ज्ञानहि प्रयोगशाळेंत स्वतां प्रयोग करून मिळवावयाचें असतें. एकूण आठ ते दहा आठवडे

प्रत्यक्ष दुय्यम शाळेंत शिकविण्याचा अनुभव घेतला पाहिजे. १९४० सालापासून दुय्यम शाळांत इंग्रजी, फ्रेंच अथवा जर्मन यांमधील एक परकीय भाषा आवश्यक करण्यांत आली आहे. यामुळें या भाषा शिकविणाऱ्या तज्ज्ञ शिक्षकांची एकदम मोठीच जरूर भासूं लागली. यासाठीं दोन ते चार वर्षे परकीय भाषेचें शिक्षण घेतलेले तज्ज्ञ दुय्यम शिक्षक तयार करण्यासाठीं खास अध्यापनसंस्था वरील धर्तीवर काढण्यांत आल्या आहेत.

३ *अध्यापनाचीं कॉलेजें ( Education Institutes )*:

आठवी, नववी व दहावी या इयत्तांना शिकविणारे दुय्यम शिक्षक आणि प्राथमिक शिक्षकांच्या अध्यापनशाळांत शिकविणारे प्राध्यापक यांना अध्यापनशास्त्राचें शिक्षण देण्यासाठीं या तिसऱ्या प्रकारच्या अध्यापनसंस्था आहेत. यांचा दर्जा उच्च शिक्षणसंस्थांइतका, म्हणजे कॉलेजांइतका, समजण्यांत येतो. यांपैकीं कांहीं कॉलेजें विश्वविद्यालयांतील अध्यापनविषयक शाखा आहेत. तर कांहीं स्वतंत्रपणें चालविण्यांत आलेलीं आहेत. या कॉलेजांत दशवार्षिक शिक्षण पूर्ण केलेल्या विद्यार्थ्यांस प्रवेश मिळतो; मात्र त्यांना इतर कॉलेजांप्रमाणें येथेंहि प्रवेश परीक्षा द्यावी लागते. अध्यापन कॉलेजांचा शिक्षणक्रम चार ते पांच वर्षांचा असतो. इतर विषयांच्या कॉलेजांप्रमाणें येथेंहि सर्वसाधारण शिक्षणाचे इतिहास, समाजशास्त्र, भाषा, वाङ्मय, मार्क्सवाद वगैरे विषय असतातच. शिवाय मानसशास्त्र, शिक्षणशास्त्र, इतिहास, शिक्षणपद्धति इत्यादि अध्यापनाच्या विषयांचा विशेष अभ्यास करावयाचा असतो. तसेंच ज्या विषयाचा तज्ज्ञ शिक्षक व्हावयाचें असेल तो शिकविण्याकडे खास लक्ष द्यावयाचें असतें. शेवटच्या वर्षी आठरहा आठवडे शिकविण्याचा प्रत्यक्ष अनुभव घेणें आवश्यक असतें.

फक्त शेवटच्या वर्षी प्रत्यक्ष कामाचा अनुभव घेतल्यामुळें शिक्षकाची तयारी व्हावी तितकी होत नाहीं अशी तक्रार पुढें आल्यावरून १९४४ सालापासून त्यामध्यें सुधारणा सुचविण्यांत आली आहे. आतां अभ्यासक्रमाच्या चारही वर्षांत होतकरू शिक्षकांचा दुय्यम शाळेंतील वर्गांशीं संबंध यावा, अशी व्यवस्था करण्यांत येणार आहे. तसेंच सर्व प्रकारच्या अध्यापनसंस्थांमधील प्राध्यापकवर्गानें कांहीं तरी प्रत्यक्ष शिकविण्याचें काम नियमितपणें केलें पाहिजे; असें केल्यानेंच त्यांचा दुय्यम

शिक्षणाशीं सतत निकटचा संबंध राहील, अशी सूचनाहि पुढें आली आहे व बहुधा ती स्वीकारली जाईल. सध्यां अशी तजवीज नाहीं, आणि म्हणून इतर कॉलेजांप्रमाणें या अध्यापनसंस्थांचा विश्वविद्यालयीन शिक्षणाकडे अवास्तव कल झुकतो; त्यांचा प्रत्यक्ष शिकविण्याशीं यावा तितका संबंध येत नाहीं; अशी अनिष्ट प्रवृत्ति बळावूं लागली होती. तिच्यावर उपाय म्हणून वरील सुधारणा सुचविण्यांत आल्या आहेत.

या अध्यापनाच्या कॉलेजांना जोडून अध्यापनाचें याहून अधिक उच्च प्रतीचें शिक्षण देण्यासाठीं व अध्यापनविषयक संशोधनासाठीं खास संस्था स्थापण्यांत आल्या आहेत. यांमध्यें शिक्षण घेतल्यावर त्या शिक्षकांना शिक्षणखात्यांतील अधिकारी, अध्यापनकॉलेजांतील प्राध्यापक, इत्यादि जागीं नेमण्यांत येतें, आणि ज्यांनीं संशोधनांत विशेष प्रगति केली आहे असे शिक्षक पुढें संशोधनकार्याला वाहून घेतात. हा सर्वोच्च अध्यापन–अभ्यास करणाऱ्या शिक्षकांनीं प्रथम पांच वर्षांचा अध्यापन कॉलेजांचा शिक्षणक्रम पुरा केलेला असून त्यानंतर एखाद्या दुय्यम शाळेंत प्रत्यक्ष शिकविण्याचा अनुभव तीन वर्षे तरी घेतलेला असावा, असा नियम आहे. शिकविण्याच्या प्रत्यक्ष अनुभवाची एवढी जोड असल्याशिवाय कोणालाच एकदम प्राध्यापक अथवा वरिष्ठ प्रतीचा शिक्षणाधिकारी होतां येत नाहीं.

वरील तीन प्रकारच्या अध्यापनसंस्थांशिवाय शाळातपासनीसांसाठीं वेगळ्या संस्था आहेत व त्यांमध्यें दाखल होणाऱ्या विद्यार्थ्यांस वरील सर्व नियम लागू आहेत. अर्थात् कोणालाहि प्रत्यक्ष शिक्षकाचें काम केल्याशिवाय एकदम शाळातपासनीस होतां येत नाहीं. या बाबतींत आपल्याकडील परिस्थितीशीं तुलना करण्यासारखी आहे; कारण आपल्याकडे प्रत्यक्ष शिकविण्याचा अनुभव नसलेले शाळातपासनीस असूं शकतात !

शारीरिक व्यंग असलेल्या मुलांना शिकविण्यासाठीं ( उदा० आंधळे, बहिरे, मुके ), तसेंच बौद्धिक कमतरता ( *Handicapped* ) असलेल्या मुलांना शिकविण्यासाठीं विशेष प्रकारचा शिक्षकवर्ग आवश्यक असतो. त्यांच्या शिक्षणाकरितां अध्यापन-कॉलेजांत वेगळी खास सोय केलेली असते. हा अभ्यासक्रम सुमारें पांच वर्षांचा असतो.

गेल्या पंचवीस वर्षांत सोविएत देशांत शिक्षणाचा प्रसार फार मोठ्या प्रमाणांत

झाला आहे; विशेषतः प्राथमिक व दुय्यम शिक्षणामध्यें गेल्या पंधरा वर्षांत विलक्षण झपाट्यानें वाढ झाली. शाळाकॉलेजांतील एकूण विद्यार्थ्यांचे पुढील आंकडे पाहा.

शाळा कॉलेजांतील एकूण विद्यार्थी

| | |
|---|---|
| सन १९१४ | ८१ लक्ष |
| ,, १९२९ | १५० ,, |
| ,, १९३९ | ४७७ ,, |

यांमधील बहुसंख्य विद्यार्थी प्राथमिक व दुय्यम शाळांतील असणार, हें उघड आहे. उदाहरणार्थ १९३६ सालीं आठ ते अठरा वर्षें वयाचीं ३ कोटी ६० लक्ष मुलें शिक्षण घेत होतीं.

यावरून प्रथम प्रथम शिक्षकांची वाण किती तीव्रतेनें भासली असेल याची कल्पना येते. अर्थातच प्रथम नेमण्यांत आलेल्या सर्वच शिक्षकांना अध्यापनशास्त्राचें पद्धतशीर शिक्षण देण्याची व्यवस्था झालेली नव्हती. सध्यां जो शिक्षकवर्ग प्राथमिक व दुय्यम शाळांत शिकवीत आहे, त्यापैकीं बहुसंख्य शिक्षकांनीं थोडेंसें अध्यापनशास्त्र शिकून ताबडतोब शाळेंत शिकविण्यास सुरुवात केलेली होती. या जुन्या शिक्षकांना अध्यापनाचें पूर्ण व पद्धतशीर शिक्षण मिळावें, या हेतूनें अल्पावधीचे अभ्यासक्रम आंखण्यांत येतात आणि पत्रव्यवहारानेंहि शिक्षण देण्यांत येतें. सध्यां शिकवीत असलेल्या प्रत्येक शिक्षकानें आवश्यक असलेलें अध्यापनाचें किमान ज्ञान शक्य तितक्या लवकर मिळवून 'शिक्षित' (ट्रेंड) शिक्षक बनावें यासाठीं बरेच प्रयत्न करण्यांत आले व येत आहेत. आणि नवीन शिक्षकांनीं वरील अध्यापनसंस्थांपैकीं कोणत्या तरी संस्थेचा अभ्यासक्रम पुरा केलेला असला पाहिजे, असा आतां सक्त नियम करण्यांत आला आहे. यामुळें अ'शिक्षित' (अन्‌ट्रेंड) शिक्षकांचें प्रमाण आतां खूपच कमी आहे.

अध्यापनशाळांतील अभ्यासक्रम पुरेसा नाहीं; प्राथमिक व दुय्यम शिक्षणाचा दर्जा वाढविण्यासाठीं शिक्षकांना अध्यापनशास्त्राचें याहूनहि अधिक शिक्षण देण्यांत आलें पाहिजे, याची जाणीव सोविएत अध्यापनविशारदांना आहे. या उणीवा नाहींशा करण्यासाठीं प्रयत्न करण्यांत येत आहेत. एकंदर देशाची गरज भागविण्याला पुरेसे शिक्षक निर्माण करण्याइतक्या दुय्यम अध्यापनसंस्था निघाल्या कीं पहिल्या प्रकारच्या प्राथमिक अध्यापनशाळा बंद करण्यांत येतील, असा मिसेस बी. किंग या इंग्रज शिक्षण-शास्त्रज्ञ लेखिकेचा अंदाज आहे; आणि *अंतिम उद्देश असा आहे कीं प्रत्येक प्राथमिक आणि दुय्यम शिक्षकानें अध्यापनकॉलेजांत शिक्षण घेतलेलें असावें.* या दृष्टीनें प्राथमिक शिक्षकांच्या अध्यापनशाळा विश्वविद्यालयांना जोडून घेण्यास आरंभ झाला आहे.

सोविएत देशांत प्राथमिक व दुय्यम शिक्षणांत ही जी प्रचंड प्रगति झाली, त्या प्रगतीसाठीं शिक्षकांच्या संख्येंतहि मोठया प्रमाणांत वाढ होणें आवश्यक होतें. शिक्षकांच्या संख्येच्या वाढीचे आंकडे पुढें दिले आहेत. त्यावरून शिक्षक निर्माण करणाऱ्या अध्यापनसंस्थांचा प्रश्न किती नेटानें पुढें आला असेल, याची कल्पना करतां येईल,

क्रांतीपूर्वी, १९१४ सालीं, प्राथमिक शिक्षकांची संख्या १,८८,२०० असून दुय्यम शिक्षक फक्त ४२,८०० होते. १९२० ते ३० या दहा वर्षांच्या काळांत २,६५,००० प्राथमिक शिक्षक आणि १,२४,००० दुय्यम शिक्षक अध्यापनाचें शिक्षण घेऊन बाहेर पडले. परंतु प्राथमिक व दुय्यम शिक्षकांमध्यें खरी वाढ यापुढील काळांत झाली. पुढील आंकड्यांवरून हें स्पष्ट होईल.

शिक्षकांच्या संख्येंतील वाढ :

| साल | १९१४ | १९३८ | वाढ |
|---|---|---|---|
| दुय्यम शिक्षक | ४२,८०० | ३,७७,३०० | नऊ पट |
| प्राथमिक शिक्षक | १,८८,२०० | ६,४९,८०० | साडेतीन पट |
| एकूण | २,३१,००० | १०,२७,१०० | साडेचार पट |

१९३८ सालच्या तिसऱ्या पंचवार्षिक योजनेप्रमाणें दुय्यम शिक्षणाचा प्रसार सर्व देशभर व्हावयाचा होता. यासाठीं दरवर्षी दुय्यम शिक्षकांची फार मोठ्या संख्येनें जरूरी होती. म्हणून दुय्यम शिक्षक निर्माण करणाऱ्या अध्यापनशाळांत अधिक विद्यार्थी घेण्यांत येऊं लागले. खुद्द १९३८ सालींच ३५,७०० नवीन दुय्यम शिक्षक या संस्थांत अध्यापनाचें शास्त्र शिकून दुय्यम शाळांत शिकवूं लागले. पुढें युद्धकालांत दशवार्षिक शिक्षणाची योजना स्थगित करावी लागली. त्यामुळें शिक्षकांच्या संख्येंत १९४० नंतर या वेगानें वाढ झाली नाहीं. परंतु आधींच्या संकल्पित कार्यक्रमांत १९३८ ते ४२ या चार वर्षांत एकूण साडेपांच ते सहा लक्ष नवीन प्राथमिक व दुय्यम शिक्षक तयार व्हावयाचे होते, यावरून ही योजना किती विस्तृत होती याची खात्री पटते. १९४३ सालीं सोविएत देशांत १४७ दुय्यम अध्यापनसंस्था होत्य आणि सध्यां ३१२ अध्यापनाचीं कॉलेजें आहेत. एकूण उच्च शिक्षणसंस्थांमध्यें शेंकडा ४० टक्के अध्यापनसंस्था आहेत.

युद्धकालांत कित्येक शिक्षकांनीं सैन्यांत, आरमारांत अथवा हवाई दलांत नांवें नोंदविलीं. यामुळें शिक्षकांची वाण पुन्हां फार मोठ्या प्रमाणांत भासूं लागली. ही वाण भरून काढण्यासाठीं तात्पुरते, थोडया मुदतीचे, अध्यापनाचे अभ्यासक्रम आंखण्यांत आले होते. पुढें पुढें शिक्षकांना होतां होईल तों सैन्यांत दाखल होण्यास उत्तेजन द्यावयाचें नाहीं, अध्यापनाचें अतिशय आवश्यक आणि राष्ट्रीय दृष्टया महत्त्वाचें कार्य त्यांनीं सोडूं नये, असा आग्रह धरण्यांत येऊं लागला. तरीहि अद्याप शिक्षकांचा तुटवडा फार भासतो. कारण युद्धाचा काळ असूनहि या अवधींत शाळांच्या संख्येंत कित्येक ठिकाणीं वाढ झाली. तसेंच १९४४ सालापासून प्राथमिक शिक्षणाच्या आरंभाची वयोमर्यादा ( आठव्या वर्षावरून सातव्या वर्षावर ) एक वर्षानें खालीं आणण्यांत आली. या फेरबदलामुळें २० लक्ष नवीन मुलें प्राथमिक शाळांत दाखल झालीं. म्हणून सोविएत देशाला अद्याप शिक्षकांची फार जरूरी आहे !

झारशाहीला मूठमाती मिळाल्यावर अध्यापनशास्त्राच्या दृष्टीनें सोविएत शिक्षणांत कसकसा बदल होत गेला हें पाहणें येथें उचित होईल. झारशाहीच्या काळांत अध्यापनशास्त्रांत विशेष प्रगति व संशोधन झालें नव्हतें, असें म्हणणें चुकीचें होईल.

*उस्पेन्स्की, पिसारेव, शात्स्की* हे नामांकित शिक्षणशास्त्रज्ञ त्या काळीं होऊन गेले. पण त्या अनियंत्रित राजसत्तेच्या अमदानींत शासनसंस्थेचें शिक्षणाकडे अत्यंत दुर्लक्ष होतें आणि त्यामुळें या थोर शास्त्रज्ञांच्या शैक्षणिक संशोधनाचा प्रत्यक्ष अध्यापनाच्या कामीं शिक्षकांना उपयोग होऊं शकला नाहीं. शात्स्कीचीं शिक्षणविषयक प्रमेयें अनुसरणाऱ्या थोड्याशा शाळा चालविण्यांत आल्या होत्या. रशियांत याच काय त्या आधुनिक पद्धतीनें शिक्षण देणाऱ्या शाळा होत्या.

क्रांतीनंतर शिक्षणविषयक सर्व जुनीं प्रमेयें झुगारून देण्याकडे नवीन शिक्षण-शास्त्रज्ञांची प्रवृत्ति होती. जुनें तें सर्व टाकाऊ आणि तिरस्करणीय, क्रांतिपूर्व शिक्षण-तज्ज्ञांचीं मतें कुचकामाचीं, असा आग्रह धरण्यांत येऊं लागला. परदेशांतील, विशेषतः अमेरिकेंतील नवीन शिक्षणपद्धतींचें अनुकरण सर्वत्र होऊं लागलें. कित्येक शिक्षक स्वतांच नवीन प्रयोग करून आडाखे बसवीत व नवीं प्रमेयें प्रतिपादन करीत. सोविएत देशाच्या शैक्षणिक इतिहासांत या काळाला '*प्रयोगस्वातंत्र्याचा काळ*' असें नांव पडलें आहे! डाल्टन योजना, प्रोजेक्ट पद्धति, सामुदायिक प्रोजेक्ट पद्धति इत्यादि नवीन शिक्षणप्रकार जसेच्या तसे अथवा त्यांमध्यें थोडाफार फरक करून निरनिराळ्या ठिकाणीं चालू होते. नेहमींच्या पद्धतीनें द्यावयाचे शाळेंतील धडे, कॉलेजमधील व्याख्यानें, प्रयोगशाळेंतील पद्धतशीर प्रयोग वगैरे रूढ शिक्षण-पद्धतींना साफ फांटा देण्यांत आला. परीक्षांची समूळ उचलबांगडी करण्यांत आली! शाळाकॉलेजांचा कारभारहि कित्येक ठिकाणीं विद्यार्थ्यांनीं आपल्या हातीं घेतला. शिक्षणक्षेत्रांतील हें अराजक सोविएत सरकारला मान्य होतें असें नव्हे. पण या, पहिल्या दहा वर्षांत सोविएत सरकारला शिक्षणशास्त्राकडे विशेष लक्ष देण्यास अवसर सांपडला नाहीं. अधिकाधिक शाळा उघडणें आणि साक्षरतेची मोहीम या देशाच्या दृष्टीनें अतिशय महत्त्वाच्या, अशा दोनच गोष्टींवर त्यांनीं आपलें सर्व लक्ष केंद्रित केलें होतें.

पुढें १९२८ मध्यें पहिली पंचवार्षिक योजना अंमलांत येऊं लागली. देशाची आर्थिक प्रगति वेगानें सुरू झाली, तसतसा पूर्वी बहुशः उदासीन व कांहीं अंशीं नव्या समाजपद्धतीला उघडउघड विरोधी असलेला शिक्षकवर्ग देशाच्या प्रगतींत अधिकाधिक लक्ष घालूं लागला. तसेंच आतां नव्या परंपरेंत वाढलेला, नव्या समाजाचा अभिमानी तरुण शिक्षकवर्ग निर्माण झाला होता. हळूहळू या शिक्षकांना या

शैक्षणिक अराजकाची तीव्र जाणीव होऊं लागली. ही परिस्थिति बदलली पाहिजे, एकसूत्री शिक्षणपद्धति सुरू केली पाहिजे, असें केलें तरच शिक्षणाचा दर्जा वाढेल, असे विचार प्रदर्शित करण्यास प्रथम शिक्षकांनींच सुरवात केली. अखेर शिक्षण एकसूत्री व्हावें, यासाठीं सार्वत्रिक शिक्षणाची एक व्यापक योजना तयार करण्यांत आली व ती ताबडतोब अंमलांत आणावयाचें ठरलें. ही शिक्षणयोजना व्यवहारांत उतरूं लागल्यानंतर थोड्याच काळांत असें दिसून आलें कीं डाल्टन योजना व प्रोजेक्ट पद्धति हे शिक्षणप्रकार त्यावेळच्या परिस्थितींत ( शिक्षण सार्वत्रिक व्हावें, ही त्यावेळीं देशाची सर्वांत महत्त्वाची गरज होती ) उपयुक्त नाहींत म्हणून बंद करण्यांत आले आणि वर्गातील धडा व कॉलेजांतील व्याख्यान या रूढ पद्धती त्यांमध्यें अवश्य ते फेरबदल करून पुन्हां सुरू करण्यांत आल्या. यानंतर परीक्षापद्धतीहि नव्या स्वरूपांत अंमलांत आली. मध्यंतरीच्या काळांत कांहीं शाळा मिळून एक शिक्षणविषयक मानसशास्त्रज्ञ ( *Pedologue* ) नेमला जात असे. पण याचा परिणाम असा झाला कीं अपवादात्मक 'अवखळ' ( *Difficult* ) मुलांची संख्या अवास्तव फुगण्याकडे प्रवृत्ति दिसूं लागली ! या मानसशास्त्रज्ञाचा मुलांशीं सतत संबंध येत नसे म्हणून त्याला या मुलांचें अचूक निदान करणें खरोखर तितकेंसें शक्यहि नव्हतें. तेव्हां १९३६ सालीं असे मानसशास्त्रज्ञ नेमणें बंद करण्यांत आलें. त्याऐवजीं शक्य तों सर्व शिक्षकांनीं, निदान प्रत्येक शाळेंत दोनचार शिक्षकांनीं, मानसशास्त्राचें विशेष शिक्षण घ्यावें, असें ठरविण्यांत आलें. मात्र तशीच आवश्यकता भासल्यास डॉक्टर आणि मानसशास्त्रतज्ज्ञ यांना बोलावून त्यांचें मत घेण्यांत येतें व त्यांनीं सांगितलेले इलाज अवखळ मुलांबाबत करून पाहाण्यांत येतात.

सध्यां उच्च संशोधनसंस्थांमध्यें शिक्षणशास्त्र व मानसशास्त्र याविषयीं अनेक प्रकारचें संशोधन चालू आहे. संशोधनाचा फायदा सर्व शिक्षकांस मिळावा या हेतूनें संशोधनापासून निघालेले निष्कर्ष व सिद्धांत नियतकालिकांतून प्रसिद्ध होतात. या संशोधनकार्याची विस्तृत माहिती येथें देणें अप्रस्तुत ठरेल. पुढील गोष्टींचा उल्लेख उदाहरणादाखल केला आहे. भरपूर हवा व उजेड येण्यासाठीं वर्गाचीं दालनें कशीं बांधावीं, मुलांना बसण्यासाठीं योग्य व सुखावह बांक वा आसन कसें असावें, प्रत्येक मुलाला नीट बसण्यासाठीं किती जागा लागते, याविषयीं प्रयोगाअंतीं कांहीं सिद्धांत बसविण्यांत आले आहेत. विशेषतः सोविएत देशांत बालसंस्थांचा व्याप इतर देशांच्या मानानें किती तरी मोठा असल्यामुळें सात वर्षांखालील बालकांच्या

शिक्षणाविषयीं त्या देशांत बहुमोल संशोधन झालेलें आहे. तसेंच, मुलांमुलींना वयाच्या बाराव्या वर्षापासून अठराव्या वर्षापर्यंत अलग शाळांत शिकविण्यांत आलें तर शिक्षणाचा दर्जा व कार्यक्षमता वाढतात, असें दिसून आल्यामुळें अलीकडे तेथें अलग शाळा निघूं लागल्या आहेत. (हा बदल इतका मौलिक स्वरूपाचा आहे कीं त्याबद्दल फारशी चर्चा येथें न करतां त्याचा विचार परिशिष्ट ३ मध्यें केला आहे. संशोधनाचें एक उदाहरण म्हणून त्याचा उल्लेख येथें केला आहे. )

### *सोविएत शिक्षक*

गेल्या पंचवीस वर्षांत शिक्षकाच्या परिस्थितींत कसा बदल होत गेला याचा आतां विचार करूं.

झारशाहींत शिक्षकांची सर्वथा उपेक्षाच होत असे असें म्हणण्यास हरकत नाहीं. सर्वसाधारण प्राथमिक शिक्षकाला अध्यापनशास्त्राचें सामान्य ज्ञानहि नसे. अशीच परिस्थिति सध्यां आपल्या देशांत आहे; कारण बरेच शिक्षक 'शिक्षित' ( *Trained* ) नसून केवळ व्ह. फा. पास झालेले असतात. उशीन्स्की नांवाच्या झारच्या एका शिक्षणमंत्र्यानें तर असें मत व्यक्त केलें होतें कीं, प्राथमिक शिक्षकाला सर्वसाधारण विषयांचें व्यापक ज्ञान असण्याची मुळींच जरूरी नाहीं ! त्या काळीं शिक्षकाचा पगार अगदीं तुटपुंजा असे आणि समाजांत त्याला फारसा मान नसे. जे कोणी विशेष बुद्धिमान् आणि पुरोगामी विचारसरणीचे शिक्षक होते, त्यांच्यामागें झारच्या गुप्त पोलिसांचा ससेमिरा सारखा चालू राही. सारांश, त्यावेळचा रशियन शिक्षक दरिद्री, मागासलेला आणि एकंदरींत हिंदुस्तानांतील सध्यांच्या शिक्षकाप्रमाणें सरकार व जनता या दोघांच्याही उपहासाचा व उपेक्षेचा विषय होऊन बसला होता.

क्रांतीनंतर पहिलीं दहा वर्षें बहुसंख्य शिक्षकवर्ग नव्या समाजपद्धतीविषयीं उदासीन व कांहीं अंशीं विरोधीहि होता, याचा उल्लेख मागें आला आहे. परंतु हळूहळू ही परिस्थिति बदलूं लागली आणि सोविएत सत्तेचा अभिमानी, नव्या पिढीचा उत्साही तरुण शिक्षक पुढें आला. यानंतर शिक्षकांमध्यें सोविएत सरकारविषयीं आपुलकी उत्पन्न होऊं लागली. १९३० सालानंतर प्राथमिक शिक्षणाचा सर्वत्र वेगानें प्रसार होऊं लागला. या नव्या शाळांत शिकविणाऱ्या शिक्षकांना आतां अध्या-

पनाचें थोडेंफार ज्ञान मिळालेलें असे. शिक्षक 'शिक्षित' (ट्रेंड) असावा, याकडे आतां अधिकाधिक लक्ष देण्यांत येऊं लागलें. देशाची सर्वांगीण प्रगति होण्यासाठीं सोविएत देशाला शिक्षकांची अतिशय गरज आहे, म्हणून देशाभिमानी तरुणांनीं शिक्षकाचा पेशा स्वीकारला पाहिजे, अशा प्रकारे तरुणांच्या उत्साहाला व देशभक्तीला आवाहन करण्यांत आलें. त्याचबरोबर शिक्षकाचें जीवन व आर्थिक परिस्थिति सुधारावी या हेतूनें पुरेसा पगार, राहावयास चांगली जागा, उत्तम ग्रंथालयें इत्यादि सुखसोयींकडे लक्ष पुरविण्यांत येऊं लागलें. १९३२ सालीं असें ठरविण्यांत आलें कीं शिक्षकाचें वेतन कारखान्यांतील यंत्रकुशल कामगारांच्या वेतनापेक्षां कमी असतां कामा नये. सोविएत समाजांत शिक्षकाचें स्थान अतिशय मानाचें आहे, असा शिक्षकाच्या पेशाचा गौरव करण्यांत येऊं लागला. १९३६ सालीं शिक्षकाचें वेतन जवळजवळ दुपटीनें वाढविण्यांत आलें आणि १९४३ सालीं त्यामध्यें पुन्हां एकदां वाढ करण्यांत आली. वेतनाच्या आंकड्यांवरून आर्थिक सुस्थितीचा अंदाज बांधणें शक्य होत नाहीं, हें खरें. परंतु तुलनात्मक दृष्टीनें पाहिल्यास सोविएत शिक्षकाचा १९३६ नंतरचा आर्थिक दर्जा इतर पाश्चात्य देशांतील शिक्षकांच्या दर्जापेक्षां खचित कमी नव्हता, असें सोविएत शिक्षणाविषयीं माहितगार व्यक्तींचें मत आहे. १९४३ सालच्या पगारवाढीमुळें सोविएत शिक्षकाची आर्थिक सुस्थिति सोविएत देशांतील डॉक्टर, वकील, किंवा आर्किटेक्ट (इंजिनियर) यांच्या तोडीची झाली आहे, असेंहि ते म्हणतात; आणि त्यांच्या मतें सोविएत समाजांत शिक्षकाला इतर कोणत्याही देशापेक्षां किती तरी बहुमानानें वागविण्यांत येतें.

सोविएत देशांत शिक्षकाला किती पगार मिळतो? प्राथमिक शिक्षक, दुय्यम शिक्षक, प्रिन्सिपॉल वगैरे अधिकारीवर्ग यांना मिळणाऱ्या पगाराचें प्रमाण निरनिराळें आहे. कोणाहि "शिक्षित" (ट्रेंड) शिक्षकाला मासिक ४०० रूबलहून कमी पगार मिळत नाहीं. कांहीं ठिकाणीं अद्याप अ'शिक्षित' (अन्‌ट्रेंड) शिक्षक आहेत, पण त्यांनाहि दर महिन्यास किमान ३२५ रूबल पगार मिळतो. दुय्यम शाळेच्या शिक्षकाला जास्तींत जास्त महिना १००० रूबलपर्यंत पगार मिळूं शकतो. १९४० सालीं सोविएत देशांतील दर माणशीं सरासरी उत्पन्न ४०७० रूबल होतें; या मानानें पाहातां शिक्षकाचें वार्षिक उत्पन्न सरासरीपेक्षां थोडें अधिकच पडतें

प्राथमिक शिक्षक (इयत्ता १ ते ४) वर्गाचे सर्व विषय शिकवितो आणि

त्याला दर महिन्यांत पंचेचाळीस मिनिटांचे १०० तास काम करावें लागतें. दुय्यम शिक्षकाला ( इयत्ता ५ ते १० ) आपापला विशिष्ट विषय शिकवावयाचा असून त्याला महिन्यांतून ७५ तास द्यावे लागतात. गणित व भाषा या विषयांच्या शिक्षकांना वह्या तपासण्याचें काम बरेंच असतें, म्हणून त्यांना महिना ५० रूबल अधिक मिळतात. तसेंच वर्गांतील सर्व मुलांविषयीं विशेष जबाबदारी वर्गशिक्षकावर असते, म्हणून त्याला महिन्याला ५० रूबल जादा पगार मिळतो. वर दिलेल्या ठराविक तासांपेक्षां अधिक तास काम केल्यास त्याबद्दल अधिक वेतन ( *Overtime* ) देण्यांत येतें. कित्येक ठिकाणीं अद्याप दुवक्त पद्धति चालू आहे; तेथें शिक्षकांचीही वाण असल्यामुळें कांहीं शिक्षक दोन्ही वेळां शिकवितात. याबद्दल त्यांना अर्थातच जादा पगार दिला जातो.

पंचवीस वर्षें नोकरी केल्यावर सोविएत शिक्षकाला पेन्शन घेण्याचा हक्क आहे. नोकरीच्या काळांत आर्थिक सुरक्षिततेची–नोकरी कायम असण्याची–हमी दिलेली असते. दरवर्षी दोन महिने भरपगारी रजा मिळते. तसेंच सर्वप्रकारची वैद्यकीय मदत मोफत मिळते.

शिक्षकाचा पेशा ध्यानांत घेऊन त्याला खास सवलती देण्यांत येतात. वाचन निर्वेधपणें करतां यावें, यासाठीं शिक्षकाची बिऱ्हाडाची जागा इतरांपेक्षां अधिक मोठी व निवांत असावी अशी सोय पाहिली जाते. बिऱ्हाडाची सोय सरकारकडून होते व याबद्दल पगाराच्या शेंकडा १० टक्के भाडें आकारण्यांत येतें. शिक्षकांना आवश्यक असणारीं व इतर पुस्तकें त्यांना स्वस्त किंमतींत मिळतात. तसेंच दूध, भाजीपाला व फळफळावळ हे बुद्धिजीवि मनुष्यांस आवश्यक असलेले जिन्नस प्रथम शिक्षकांस पुरविण्यांत यावेत, असा कटाक्ष बाळगण्यांत येतो.

सिनेमा, नाटकें व इतर करमणुकीचे कार्यक्रम यांसाठीं शिक्षकांना सवलतीच्या दरानें तिकिटें मिळूं शकतात. सुट्टीचे दिवस एखाद्या रम्य स्थळीं घालवितां यावेत, अशी व्यवस्था करण्यांत येते. ज्यांना विश्रांतीची अथवा हवेच्या ठिकाणीं जाऊन राहण्याची जरूरी असेल, त्यांची थोडक्या खर्चांत विश्रांतिस्थानीं राहाण्याची सोय होते.

आंधळे, बहिरे, मुके आणि बौद्धिक कमतरता असलेल्या मुलांसाठीं खास शिक्षण-संस्था आहेत, याचा उल्लेख मागें आलाच आहे. या संस्थांत काम करणाऱ्या

शिक्षकांना सामान्य शिक्षकांपेक्षां वेतन, रजा, पेन्शन इत्यादि बाबतींत अधिक सवलती मिळतात.

खेड्यांतील शिक्षकांना सामान्यपणें अधिक सोयी व सवलती असतात. राहात्या घराबद्दल खेड्यांतील शिक्षकाकडून भाडें घेण्यांत येत नाहीं. त्याला भाजीपाल्याच्या लागवडीसाठीं दीड एकर जमीन दिलेली असते व जळण मोफत मिळतें. खेड्यांतील शिक्षकांना शहरी शिक्षकांपेक्षां अधिक लवकर पेन्शन मिळूं शकतें. सुट्टींत प्रवास करतां यावा यासाठीं रेल्वे, आगबोटी इत्यादींचे शिक्षकासाठीं खास सवलतीचे दर असतात. खेडें शहरांपासून जितकें अधिक दूर, तितक्या प्रमाणांत खेड्यांतील शिक्षकाला अधिक सवलती दिल्या जातात. उदाहरणार्थ, उत्तरेकडील थंड प्रदेशांत जाऊन राहणाऱ्या शिक्षकांना अधिक पगार मिळतो व दहा वर्षे नोकरी केल्यावर पेन्शन मिळतें! खेड्यांतील शिक्षकांविषयीं सोविएत देशांत दाखविण्यांत येणारी आस्था आपल्याकडील खेड्यांत राहाणाऱ्या मराठी प्राथमिक शिक्षकाच्या अनवस्थेशीं तुलना करण्यासारखी आहे!

अध्यापनाचा अभ्यासक्रम पुरा करून शाळेंत शिकविण्यास सुरुवात केली कीं यापुढें आपल्याला आणखी कांहीं शिकावयाचें राहिलें नाहीं असें उत्तम शिक्षक कधींच समजत नाहीं. परंतु विकास करून घेण्याची तीव्र इच्छा असूनहि त्यासाठीं साधनें उपलब्ध नसलीं, तर शिक्षकाला आपलें ज्ञान अद्यावत् ठेवणें शक्य होत नाहीं. सोविएत देशांत शिक्षकाला अध्यापनशास्त्रांत उत्तरोत्तर व अधिकाधिक प्रगति करून घेतां यावी, या हेतूनें मोठ्या प्रमाणावर तरतूद केलेली आहे. आणि शिक्षकानें या सोयीचा फायदा घेऊन आपला दर्जा सुधारावा यासाठीं अनेक प्रकारें उत्तेजनहि दिलें जातें. सध्यां तेथें सर्व प्रकारच्या शिक्षकांची व विशेषतः दुय्यम शिक्षकांची अतिशय जरूरी असल्यामुळें जे शिक्षक आपला अध्यापनविषयक दर्जा वाढवितात, त्यांना लवकर बढती मिळते.

अध्यापनाच्या कामीं शिक्षकाला साहाय्य करणारी एक महत्त्वाची संस्था म्हणजे शाळांची तपासणी करणारे शाळातपासनीस. कारण सोविएत देशांत या तपासनीसांचें काम शिक्षकांना मार्गदर्शन करण्याचें असतें. अर्थात् शाळातपासनीसांना (*Inspectors*) तेथें *मार्गदर्शक* (*Instructors*) हें अन्वर्थक नांव आहे, यांत नवल

नाहीं ! कोणाहि शिक्षकाच्या अध्यापनपद्धतींत उणीवा दिसल्या तर शाळातपासनीस त्यांजकडे शिक्षकाचें लक्ष वेधून त्या नाहींशा करण्यासाठीं त्याला साहाय्य करतो. तसेंच एखाद्या शिक्षकाची शिकविण्याची पद्धति विशेष अनुकरणीय आहे असें आढळून आल्यास त्या पद्धतीची त्या प्रदेशांतील सर्व शिक्षकांस माहिती देण्याची व्यवस्था तपासनीसांकडून केली जाते.

प्रत्येक प्रादेशिक विभागांत एक मध्यवर्ति शिक्षणकेंद्र असून तेथेंच शाळातपासनीसांची कचेरी असते. या केंद्रातर्फे वेळोवेळीं नांवाजलेल्या शिक्षकांकडून आपल्या विषयाच्या अध्यापनांतील लहानसहान बारकाव्यांविषयीं माहिती दिली जाते, विशेष मुद्यांवर चर्चा होते व या चर्चांचें निष्कर्ष अभ्यासक्रम व पाठ्यपुस्तकें ठरविणाऱ्या समितीकडे विचारार्थ पाठविण्यांत येतात. निरनिराळ्या शाळांतील शिक्षक या ठिकाणीं जमून आपल्याला आलेले अनुभव एकमेकांना सांगतात आणि विचार-विनिमय करतात. निरनिराळे विषय शिकविणें सुलभ होण्यासाठीं कोणतीं उपकरणें ( वस्तु, आकृति, आराखडे वगैरे ) वापरावींत, याची शिक्षणकेंद्रांत मांडणी केलेली असते. एखाद्या शिक्षकानें नवीन उपकरणें वापरलीं असल्यास तीं उपकरणें व त्याविषयींचे त्याचे अनुभव लिहून ठेवण्यांत येतात. तसेंच शिक्षणकेंद्रांतील अध्यापन-तज्ज्ञांचा सल्ला विचारण्यासाठीं शिक्षक वारंवार केंद्रांना भेट देतात आणि आपल्या अडचणी पुढें ठेवतात. सारांश, प्रत्येक शिक्षकानें त्या त्या विषयाच्या अध्यापनाची उत्तम पद्धति आणि साधनें आत्मसात करावींत, हा शिक्षणकेंद्र चालविण्याचा उद्देश असतो.

शाळेंतील शिक्षकांच्या सभा दर महिन्याला होऊन सभेंत प्रत्येक शिक्षकाच्या शिकविण्यांतील गुणदोषांवर चर्चा व टीका होते. प्रिन्सिपाल आणि सुपरवायझर हे शाळाधिकारी सर्व शिक्षकांच्या तासांना मधून मधून हजर राहातातच; पण शिक्षकहि एकामेकांच्या वर्गांत धडा चालू असतांना मागील बाकांवर बसून निरीक्षण करतात. उत्तम व अनुभवी शिक्षक नवशिक्या व्यवसायबंधूंना वेळोवेळीं सहाय्य देऊन शिकविण्यांतील त्यांचे दोष दूर करण्यास मदत करतात. हें दोषदिग्दर्शन, चर्चा व टीका मोकळ्या मनानें व अध्यापनाचा दर्जा सुधारण्याच्या दृष्टीनें केलेली असते म्हणून त्याबद्दल कोणीहि विषाद वाटून घेत नाहीं; अथवा आपला अपमान झाला असें समजत नाहीं. मुलांनीं केलेली टीकासुद्धां विचारांत घेऊन त्यांतील ग्राह्य भाग स्वीकारला जातो.

सालअखेरीस सर्व वर्षांतील शिक्षणाचा, परीक्षांच्या निकालांचा व इतर गोष्टींचा आढावा घेतला जातो. या वर्षीच्या कार्यपद्धतींत कोणत्या अडचणी आल्या, कोणत्या उणीवा भासल्या, हें नमूद करण्यांत येऊन त्या काढून टाकण्यासाठीं पुढील वर्षी कोणते उपाय योजावेत, यासंबंधी निर्णय घेतले जातात. तसेंच या वार्षिक सभेंत उत्तम शिक्षकांची निवड होते व त्यांना पारितोषिक देऊन त्यांचा गौरव व्हावा, अशी प्रादेशिक शिक्षणकेंद्रांकडे शिफारस करण्यांत येते.

प्रादेशिक शिक्षणकेंद्रातर्फेंहि टर्मच्या शेवटीं आणि वर्षाच्या अखेरीस त्या विभागांतील सर्व शिक्षक, शाळाधिकारी, शाळातपासनीस या सर्वांची संयुक्त सभा भरते. सभेंत, त्या मुदतींतील शैक्षणिक कार्याचा आढावा घेऊन त्यावर विस्तृत चर्चा होते. शिक्षकांनीं शिक्षणाधिकाऱ्यांवर केलेल्या टीकेला कधींकधीं इतकी धार असते कीं, ती ऐकून आपल्याकडील शिक्षक व अधिकारी थक्क होतील ! सालअखेरीच्या सभेस स्नेहसंमेलनाची जोड दिलेली असते. तसेंच या दिवशीं त्या प्रदेशांतील उत्तम शिक्षकांची निवड जाहीर होऊन त्यांचा सन्मान करण्यांत येतो. बहुमोल वस्तु, रजा, उत्तम विश्रांतिस्थानीं सुट्टी घालविण्याची संधि, बढती वगैरे रूपांनीं अथवा द्रव्यरूपानें उत्तम शिक्षकांस पारितोषिकें दिलीं जातात. आपल्या देशांत शिक्षकांना आपल्या व्यवसायांत विशेष लक्ष घालून प्रावीण्य मिळविण्यास कोणत्याहि प्रकारचें उत्तेजन मिळत नाहीं, हा फरक कोणालाहि स्पष्टपणें दिसेल.

शिक्षकाच्या दैनंदिन कार्यांत त्याला कसें साहाय्य मिळतें, हें आपण आतांपर्यंत पाहिलें. त्याशिवाय शिक्षकांना पद्धतशीरपणें अध्यापनशास्त्राचें अधिकाधिक ज्ञान मिळवितां यावें, या हेतूनें नियमित आणि हंगामी असे दोन्हीं प्रकारचे वर्ग चालविण्यांत येतात. या सोयींचा आपण आतां विचार करूं.

मोठ्या शहरांत तेथील अध्यापनकॉलेजांतर्फे सायंकाळचे वर्ग चालू असतात; आणि या वर्गांत वेगवेगळया विषयांचें अध्यापन व अभ्यासक्रमाबाहेरील शिक्षणाचें मार्गदर्शन यांविषयींचें शिक्षण दिलें जातें. सायंकालीन वर्गाचे अभ्यासक्रम कधीं कधीं दोन तीन वर्षांचें देखील असतात. तसेंच या कॉलेजांतर्फे पत्रव्यवहारानें अध्यापनशास्त्राचें मर्यादित शिक्षण घेण्याची सोय असते. सुट्टीच्या दिवसांत शिक्षकांच्या यूनियनतर्फें हंगामी अध्यापनवर्ग चालविण्यांत येतात व विशेषतः खेड्यांतील शिक्षक

यांचा फायदा फार मोठ्या प्रमाणावर घेतात. या वर्गांत दाखल होणाऱ्या शिक्षकांचा प्रवास, राहणें, जेवणें इत्यादींचा सर्व खर्च शिक्षणखातें अथवा स्थानिक स्वराज्याच्या संस्था यांजकडून होतो. मोठ्या शहरांत शिक्षकांचे क्लब अध्यापनवर्ग चालवितात.

तसेंच अध्यापनकॉलेजांकडून शिक्षणशास्त्रास वाहिलेलीं नियतकालिकें प्रकाशित होत असून त्यांमध्यें शिक्षणविषयक अनेक प्रश्नांचा ऊहापोह केलेला असतो.

शिक्षणाचा दर्जा सुधारावयाचा असेल तर अध्यापनाची मनापासून आवड असणारे तरुण शिक्षकाचा पेशा स्वीकारतील अशी योजना कोणत्याहि समाजाला करावी लागेल. सोविएत देशांत या दृष्टीनें पहिल्यापासून काळजी घेतली जाते. प्रथम एक गोष्ट ध्यानांत ठेवली पाहिजे. सोविएत यूनियनमध्यें प्रत्येक धंदा व पेशा यांसाठीं '*शिक्षित*' ( *Trained* ) लोकांचो अतिशय जरूरी आहे, आणि बेकारी कोठेंच नाहीं. म्हणून ज्यांना शिक्षक होण्याची आवड असेल अशींच तरुण मुलें सामान्यतः अध्यापनसंस्थांत प्रवेश मिळविण्यासाठीं पुढें येतात. दरवर्षी अध्यापनकॉलेजांतील अनुभवी प्राध्यापक निरनिराळ्या शाळांना भेट देऊन शिक्षकांचें कार्य कोणत्या प्रकारचें आहे, त्यांच्याबद्दल समाजाच्या कोणत्या अपेक्षा आहेत, शिक्षकाचें काम किती महत्त्वाचें आहे, इत्यादि गोष्टी शाळेंतील प्रौढ विद्यार्थ्यांपुढें स्पष्टपणें मांडतात. अध्यापनकॉलेजांत प्रवेश मिळवूं इच्छिणाऱ्या प्रत्येक नवीन विद्यार्थ्याची कॉलेजांतील अधिकारी मंडळीसमोर मुलाखत होते. यामुळें शिक्षक होण्यास अगदीं अपात्र असलेलीं मुलें आपोआप गळतात. अध्यापनाच्या क्षेत्रांत पाऊल टाकणाऱ्या होतकरू शिक्षकांना हरतऱ्हेनें उत्तेजन देण्यांत येतें. याविषयीं पुढील उदाहरण पहाण्यासारखें आहे. हा भावी शिक्षक शिकविण्याचा प्रत्यक्ष अनुभव प्रथमच घेण्यासाठीं वर्गांत जाण्यापूर्वी, शाळेचे प्रमुख शिक्षक त्या वर्गांतील मुलांची सभा घेतात. सोविएत देशाला उत्तम शिक्षकांची किती व कशी गरज आहे, आणि मुलांनीं दंगा करून नवशिक्या शिक्षकांस त्रास दिल्यास तो शिक्षकाचा पेशा सोडून देण्याचा व त्या पेशाविषयीं त्याच्या मनांत तिरस्कार उत्पन्न होण्याचा कसा संभव आहे, या गोष्टी मुलांना नीट समजावून सांगण्यांत येतात. यामुळें वर्गांतील मुलें भावी शिक्षकांशीं चांगल्या रीतीनें वागून सहकार्य करतात, असें दिसून येतें.

अध्यापनशास्त्र शिकून शिक्षक प्रत्यक्ष काम करूं लागल्यानंतर त्याला निर-

निराळ्या तऱ्हांनीं कशी मदत करण्यांत येते हें आपण वर पाहिलेंच आहे. एखाद्याच्या शिक्षणपद्धतींत दोष दिसल्यास ते दाखवून त्याला सुधारण्याची संधि वारंवार दिली जाते. परंतु इतकें सर्व झाल्यावरहि एखादा शिक्षक अध्यापनाच्या पेशाला सर्वस्वीं अयोग्य आहे, असें सिद्ध झाल्यास त्याला हा व्यवसाय सोडावा लागतो. सोविएत देशांत दुसरा अनुरूप व्यवसाय मिळणें कठीण नाहीं; म्हणून अशा बाबतींत त्या मनुष्यावर अन्याय होतो असें म्हणतां येणार नाहीं. यावरून बहुसंख्य सोविएत शिक्षकांस आपल्या व्यवसायाची आवड असते, दुसरा कोणताहि धंदा जमत नाहीं म्हणून ते शिक्षकाच्या व्यवसायाकडे वळलेले नसतात, ही गोष्ट स्पष्ट होईल.

### *शिक्षकसंघ*

शिक्षकांच्या हितास सतत जपणारी संस्था म्हणजे शिक्षकसंघ अथवा शिक्षकांची यूनियन. या संस्थेचें आपल्याकडील शिक्षकसंघापेक्षां कामगारसंघाशींच अधिक साम्य आहे, हें तिच्या कार्यपद्धतीवरून दिसून येईल. सोविएत देशांत प्रत्येक व्यवसायाचें अथवा धंद्याचें वेगळें यूनियन असतें. अध्यापनक्षेत्रांत काम करणाऱ्या सर्वांची मिळून अखिल देशाची *शैक्षणिक कार्यकर्त्यांची यूनियन* ( *Union of Educational Workers* ) आहे.

या संघाची ( अथवा यूनियनची ) प्रत्येक शाळेंत शाखा असते आणि, सोयी-साठीं जरी शिक्षकसंघ असें नांव दिलें असलें, तरी प्रिन्सिपाल, सुपरवायझर हे शिक्षणाधिकारी वगळून शाळेंतील बाकीचे सर्व नोकर ( शिक्षकांपासून झाडूवाली-पर्यंत ) संघाचे सभासद असतात व संघांत या सर्व सभासदांचा समान दर्जा असतो. दरवर्षी संघाचे सभासद एक लहान समिति निवडतात व ही समिति इतर सभास-दांच्या सहकार्यानें संघाचें कार्य चालविते. समितीच्या सभांना संघाच्या कोणाही सभासदाला हजर राहातां येतें व चर्चेंत भाग घेतां येतो. समितीचे सभासद व त्यांना मदत करणारे इतर सभासद यांनीं संघाचीं हीं कामें समाजकार्य ( *Social Work* ) म्हणून स्वेच्छेनें अंगीकारलेलीं असतात.

अधिकारीवर्गाच्या सहाय्यानें शाळेंतील सर्व नोकरांची परिस्थिति सर्व प्रकारें सुधारणें आणि शाळेचा शैक्षणिक दर्जा वाढविणें, हे संघाचे मुख्य उद्देश समजले जातात. संघ प्रत्येक सभासदाची आपुलकीनें काळजी वाहातो, त्याच्या अडचणी,

दूर करण्याचा प्रयत्न करतो व जरूर लागेल त्याप्रमाणें योग्य सल्ला व सहाय्य देतो. संघाची वर्गणी पगाराच्या शेंकडा १ टक्का असते आणि त्यांमध्यें शाळेकडून आणखी १ टक्का भर घालण्यांत येते.

संघाचीं प्रमुख कार्यें कोणतीं ? प्रत्येक सभासद आपलें शाळेंतील काम व इतर सामाजिक कर्तव्यें नीटपणें पार पाडतो कीं नाहीं, हें पाहाण्याची जबाबदारी संघावर असते. या कामीं इतर सभासद त्याला सहाय्य करतात आणि सुधारण्याच्या इच्छेनें दोष दाखवून उघड टीकाहि करतात. टीका करणें हें सोविएत समाजांत सुधारणेस चालना देण्याचें प्रभावी साधन आहे. अशा प्रकारच्या टीकेची आपल्याकडे मुळींच संवय नाहीं. या टीकेंत कडकपणा व उपरोध असला, तरी वैयक्तिक हेवादावा मात्र नसतो. सामायिक जबाबदारी डावलून निसटूं पाहाणाऱ्या सभासदांवर जोराचें सामाजिक दडपण आणण्यांत येतें. शैक्षणिक दर्जा वाढविण्याच्या कामीं '*समाजवादी चढाओढ*' ( *Socialist Competition* ) आणि '*उत्साही गट*' ( *Shock Brigades* ) या साधनांचा अतिशय उपयोग होतो. निम्म्याहून अधिक सभासद या चढाओढींत भाग घेतात आणि शिकविण्याचें काम न करणारे शाळेचे इतर नोकरहि या चढाओढींत उत्साहानें पडतात, असा अनुभव आहे. या चढाओढींची व्यवस्था पाहाण्याचें काम संघाकडे असतें.

शाळेंत चाललेल्या सर्व चळवळींकडे संघ बारकाईनें लक्ष पुरवितो आणि त्याविषयीं सूचना करून मदत करतो. शाळेंतील व बाहेरील समाजासंबंधींचीं निरनिराळीं समाजकार्यें ( *Social Work* ) संघाच्या वेगवेगळ्या सभासदांकडे नेमून देण्याची जबाबदारी संघावर असते. तसेंच सभासदांच्या वैयक्तिक व खाजगी अडचणी समजून घेऊन त्या दूर करणें, हें संघाचें एक महत्त्वाचें काम असतें.

सभासदांना योग्य त्या प्रमाणांत वेतन, कामाचे तास, राहाण्याची जागा, अन्नपदार्थ, वस्त्रपुरवठा, वैद्यकीय मदत इत्यादि मिळवून देण्यासाठीं संघ हरप्रयत्न करतो. या व इतर कोणत्याहि बाबतींत अधिकारीवर्गाच्या एखाद्या निर्णयाविरुद्ध संघाच्या सभासदानें तक्रार केल्यास संघ मध्यस्थाची भूमिका घेतो. संघसमितीपुढें तक्रार करणारा सभासद आणि शाळेचा प्रिन्सिपाल आपापली बाजू मांडतात आणि समिति त्या दोघांसमक्ष त्याबद्दल चर्चा करते. शेवटीं समिति निर्णय देते. समितीचा हा निर्णय प्रिन्सिपॉलच्या विरुद्ध असला व त्यास तो मान्य नसला, तर हा प्रश्न प्रादेशिक

संघ आणि प्रादेशिक शिक्षणाधिकारी यांच्याकडे सोपविला जातो. प्रादेशिक संघानें दिलेला निर्णय मात्र बंधनकारक समजला जातो.

संघाचें विशेष महत्त्वाचें काम म्हणजे सभासदांच्या शैक्षणिक व सांस्कृतिक विकासाची तरतूद करणें, हें आहे. यासाठीं निरनिराळीं कलामंडळें, अभ्यासमंडळें व अध्यापनवर्ग संघातर्फे चालविण्यांत येतात. प्रादेशिक संघातर्फे वा शिक्षणकेंद्रांनर्फे चालणाऱ्या वर्गांना सभासदांस हजर राहातां यावें अशी व्यवस्था शाळेचा संघ करतो. संघातर्फे सभासदांस पुस्तकें व वर्तमानपत्रें मिळतात आणि बाहेरील ग्रंथालयांमध्यें सभासदांस प्रवेश मिळवून देण्याचें कामहि संघामार्फत होतें. तसेंच शाळेंतील भिंतपत्रिका उत्तम रीतीनें चालविण्याचें काम संघाचेंच असतें.

सिनेमा, नाटकें व इतर करमणुकीच्या कार्यक्रमांचीं तिकिटें मिळवून देणें, तसेंच विश्रांतिस्थानीं सुट्टी घालविण्याची, प्रवासाची अथवा सफर काढण्याची सोय करणें, या सर्वांची व्यवस्था संघ करीत असतो. या सर्व बाबतींत शाळेच्या संघाला प्रादेशिक संघ व शिक्षकांचे क्लब यांचें सहकार्य नेहमीं मिळतें. शिक्षकांचे क्लब हे इतर प्रौढ मनुष्यांच्या क्लबांप्रमाणें उत्तम तऱ्हेनें सजविलेले असून तेथें अध्यापनवर्ग, शैक्षणिक उपकरणांचा संग्रह इत्यादींपासून तों तहत नृत्यालयापर्यंत सर्व तऱ्हेची सोय असते.

शाळेच्या संघसमितीची सभा दर पंधरा दिवसांनीं भरते आणि संघाच्या सर्व सभासदांची सभा महिन्यांतून एकदां असते. मे-दिन, क्रांतिदिन, आंतर्राष्ट्रीय महिला दिन,* यांसारखे विशेष दिवस मोठ्या समारंभानें साजरे केले जातात. टर्मच्या शेवटच्या दिवशीं मेजवानीचा बेतहि असतो. प्रादेशिक संघाची साधारण सभा दर तीन महिन्यांनीं भरते, आणि प्रादेशिक संघाची समिति शालेय संघांना मार्गदर्शन करून सर्वतोपरी साहाय्य करते. प्रतिवर्षी सुरवातीस प्रादेशिक संघाचे पदाधिकारी निवडले जातात. सांस्कृतिक विकासाच्या सोयी, करमणुकीचे कार्यक्रम, संमेलनें इत्यादि शालेय संघाचें कार्य प्रादेशिक संघातर्फे अधिक व्यापक प्रमाणावर होतें.

सोविएत शाळेचें चित्र मागील एका प्रकरणांत रेखाटण्यांत आलें आहे. त्याला

* पुष्कळशा शाळांत बहुसंख्य शिक्षक महिला असतात. एकंदरींत स्त्रीशिक्षकांचें प्रमाण शेकडा ६२ आहे.

वरील माहितीची जोड दिली कीं सोविएत शाळेंतील विद्यार्थी, शिक्षक, शिक्षणाधिकारी, पालक व बाहेरील समाज यांचे परस्परसंबंध अधिक स्पष्टपणें ध्यानांत येतील. तसेंच सोविएत शिक्षक विद्यार्थ्यांशीं इतका खेळीमेळीनें वागूनहि शिस्त कसा राखूं शकतो, याचाहि उलगडा होईल. विद्यार्थ्यांनीं शिक्षकांस आदर दाखविला पाहिजे याबद्दल सोविएत समाज व सरकार अतिशय कटाक्ष ठेवतात. विद्यार्थ्यांच्या वर्तणुकीसंबंधींच्या वीस नियमांपैकीं एक नियम याविषयींचा आहे. तसेंच सोविएत शिक्षकाचें समाजांतील महत्त्वाचें कार्य व मानाचें स्थान याविषयीं चौथ्या इयत्तेच्या (वय वर्षें १२) समाजशास्त्रविषयक अभ्यासक्रमांत दोन धडे मुद्दाम समाविष्ट करण्यांत आलेले आहेत.

सोविएत शिक्षकाला काम भरपूर असतें आणि फुरसतीचा वेळ फार थोडा मिळतो. शाळेंतील काम, मुलांच्या अभ्यासक्रमाबाहेरील विकासाचें मार्गदर्शन, स्वतांची शैक्षणिक प्रगति आणि सांस्कृतिक विकास, शिक्षकसंघाचें व इतर समाजकार्य, पालकांच्या भेटी घेणें, इत्यादि कामांत शिक्षकाचा दिवसांतील बराचसा वेळ जातो. खेडयांतील शिक्षक तर तेथील सांस्कृतिक जीवनाचें केंद्रस्थान असल्यामुळें त्याची भूमिका व कार्य अतिशय महत्त्वाचीं असतात. बाहेरच्या जगांतून ज्ञान व प्रगति यांचें लोण खेडयांतील जनतेप्रत पोंचवून तिची सांस्कृतिक उंची वाढविण्याची जबाबदारी शिक्षकावर असते. अर्थात् सोविएत शिक्षकाला खेडयांत मोठा मान असतो व सर्व लोक त्याच्याकडे मोठ्या आदरानें व विश्वासानें पाहातात. खेडयांतील शिक्षकांच्या सुखसोयींकडे सोविएत सरकार विशेष आस्थेनें लक्ष पुरवितें, या सर्व गोष्टींचा उल्लेख मागें आलाच आहे.

शहरांतील व खेडयांतील शिक्षकांच्या या कर्तव्यतत्परतेमुळें सोविएत देशांत शिक्षकांना मोठा मान आहे व समाजाकडून आणि सरकारकडून या त्यांच्या बहुमोल कामगिरीचें चीज व गौरव करण्यांत येतो. सोविएत देशाची वरिष्ठ सोविएत सभा व राष्ट्राराष्ट्रांच्या सोविएत सभा यांमध्यें जनतेनें आपल्यातर्फे कित्येक शिक्षकांस आपले विश्वासू प्रतिनिधि म्हणून निवडून दिलें आहे. परवांपर्यंत आर्. एस्. एफ्. एस्. आर्. या रशियन राष्ट्राच्या सोविएतसभेची उपाध्यक्ष एक स्त्रीशिक्षिका होती. सरकारनें शिक्षकांसाठीं खास विश्रांतिस्थानें ( *Rest Homes* ) बांधून आपली कृतज्ञता व्यक्त केली आहे. "विशेष महत्त्वाची शैक्षणिक कामगिरी बजावल्याबद्दल,

अनेक वर्षे सतत उत्तम प्रकारे अध्यापनकार्य पार पाडल्याबद्दल, अथवा *समाजाच्या जीवनांत विशेष आपुलकीनें भाग घेतल्याबद्दल*" सुमारे ४००० हून अधिक शिक्षकांचा विविध रूपानें सन्मान करण्यांत आला आहे. यामधील शेवटच्या वाक्य-खंडावरून शिक्षक व समाज यांचे संबंध अतिशय निकटचे असावेत, अशी अपेक्षा व आग्रह सोविएत देशांत धरण्यांत येत असला पाहिजे, हें उघड होतें. '*सोविएत देशाचा माननीय शिक्षक*' ही पदवी कित्येक शिक्षकांस देण्यांत आली आहे. या शिक्षकांचा सामाजिक दर्जा शास्त्रीय संशोधकांच्या तोडीचा समजला जातो. अवघ्या पंधरा वीस वर्षांपूर्वी उदासीन असलेला सोविएत शिक्षक आज सोविएत समाजाचा खंबीर व देशाभिमानी आधारस्तंभ बनला आहे यांत शंका नाहीं.

## निरक्षरतेविरुद्ध मोहीम

## १०

आपल्या देशाची झपाट्यानें सर्वांगीण प्रगति व्हावी या हेतूनें टाटाबिर्लायोजना, जनता – योजना इत्यादि अनेक योजना सध्यां सुचविल्या जात आहेत. परंतु कोणतीही योजना अंमलांत आणावयाचें ठरविलें तरी निरक्षर असलेल्या बहुसंख्य जनतेला साक्षर केल्याशिवाय हिंदुस्तानचें पाऊल फारसें पुढें पडणार नाहीं ही गोष्ट उघड आहे. झारशाही रशियन साम्राज्यांतील बहुजनसमाज हिंदी जनतेप्रमाणें निरक्षर होता. पण क्रांतीनंतर अवघ्या पंधरावीस वर्षांच्या अवधींत तेथील बहुतेक सर्व स्त्रीपुरुष साक्षर झाले आहेत. या विस्मयजनक घटनेचा वृत्तांत आपल्या दृष्टीनें खचित बोधप्रद होईल, म्हणून तो येथें स्वतंत्रपणें लिहिला आहे.

१९१४ सालीं रशियन साम्राज्यांतील साम्राज्यवादी आणि म्हणून सर्वांत पुढारलेलें राष्ट्र जें रशिया त्यामध्यें साक्षरतेचें प्रमाण अवघें शेंकडा ३६ टक्के होतें. इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका, जर्मनी इत्यादि इतर पाश्चात्य देशांत जवळजवळ सर्व लोक यावेळीं साक्षर होते ही गोष्ट ध्यानांत घेतली पाहिजे. काझाकिस्तान, ताजिकिस्तान या मध्य आशियांतील गुलाम राष्ट्रांत तर शेंकडा ९८ हून अधिक जनता निरक्षर होती ! आणि एकंदर रशियन साम्राज्याचा विचार केला तर

साक्षरतेचें प्रमाण शेंकडा २८ टक्के होतें. साक्षरतेचें मान इतकें कमी असण्यास झारशाहींतील शिक्षणविषयक धोरणच कारणीभूत होतें यांत शंका नाहीं. रशियाशिवाय इतर राष्ट्रांतील जनतेच्या शिक्षणाकडे साम्राज्यसरकारनें कधींच लक्ष दिलें नाहीं. इतकेंच नव्हे तर उलट, मातृभाषेंतील शिक्षणाला विरोधच केला, आणि शिक्षणविषयक सर्व चळवळ दडपून टाकण्यांत येत असे. खुद्द रशियांत, लोकशिक्षणासाठीं झटणाऱ्या उदारमतवादी व क्रांतिकारक पुढाऱ्यांनीं साक्षरता-प्रसारार्थ ज्या कांहीं संस्था चालविल्या होत्या त्यांच्या मार्गांत अडथळे पेरण्यांत आले; आणि त्यामुळें या संस्था चालविणें कठीण होऊन बसलें. सरकारनें पुरस्कार केलेल्या "रविवारच्या शाळा" (*Sunday Schools*) किंवा सहकारी पतपेढ्यांनीं चालविलेले वर्ग यांसारख्या फक्त कांहीं शिक्षणसंस्था पहिल्या महायुद्धापूर्वी कांहीं वर्षे निघाल्या होत्या. परंतु झारशाही सरकारला जनतेला साक्षर करण्यासाठीं विशेष खटपट करावयाची नव्हती हें त्याच्या प्राथमिक शिक्षणाविषयींच्या धोरणावरून स्पष्ट होतें. १९१४ सालीं दर एक हजार लोकवस्तीपैकीं शाळकरी वयाच्या मुलांची संख्या २२० होती, पण त्यांतील फक्त ४७ मुलेंच शाळेंत जात असत! प्राथमिक शिक्षण सक्तीचें व सार्वत्रिक करावें असा तत्कालीन शिक्षणखात्याचा मुळींच उद्देश नव्हता, असें नव्हे. पण सर्व देशभर ही योजना अंमलांत येण्यास १९९९ साल उजाडेल असा त्यांचा अंदाज होता! लोकशिक्षणासाठीं कोणतेही विशेष प्रयत्न झारशाही सरकारला करावयाचे नव्हते हें तत्कालीन शिक्षणाधिकाऱ्यांनीं वेळोवेळीं काढलेल्या उद्गारांवरूनही स्पष्टपणें दिसून येतें. आम जनता साक्षर व सुशिक्षित बनली तर आपल्या अनियंत्रित सत्तेला व शोषणाला भलताच धोका उत्पन्न होईल ही साम्राज्यवाद्यांना सर्वत्र नेहमीं वाटणारी भीतीच याच्या मुळाशीं असली पाहिजे यांत तिळमात्र शंका नाहीं! शिक्षणाच्या या अवनत परिस्थितींत पहिल्या महायुद्धाच्या काळांत रशियाच्या आर्थिक व्यवस्थेबरोबरच त्यावेळची तुटपुंजी व दुर्बल शिक्षणयोजनाही कोसळून पडली आणि खेड्यापाड्यांतून अनेक शाळा ओस पडल्या यांत नवल नाहीं.

क्रांतीनंतर स्थापन झालेल्या सोविएत सरकारनें सार्वत्रिक शिक्षणाचें व तमाम जनतेला साक्षर व सुशिक्षित बनविण्याचें आपलें ध्येय ताबडतोब जाहीर केलें. साक्षरतेशिवाय क्रांतीचें पाऊल पुढें पडणार नाहीं, जनतेचें

सामर्थ्य टिकून राहाणार नाहीं, याची सोविएत सरकारला पूर्ण जाणीव होती. *निरक्षर मनुष्याला राजकारण समजणें कठीण जातें; निंदा, कुटाळकी आणि दुराग्रह यामध्येंच अक्षरशत्रु मनुष्याची सर्व शक्ति खर्च होते; राजकारण आणि समाजकारण यांमध्यें जाणतेपणें भाग घेण्यासाठीं सर्वांनीं साक्षर झालें पाहिजे* असें *लेनिननें* अनेकवार प्रतिपादन केलें होतें. *लेनिनच्या* प्रेरणेनेंच २६ डिसेंबर १९१९ रोजीं सोविएत सरकारनें असें जाहीर केलें कीं आठ वर्षांपासून पन्नास वर्षांपर्यंतच्या सर्व स्त्रीपुरुषांनीं साक्षर झालें पाहिजे. अशा रीतीनें साक्षरतेच्या प्रश्नाला चालना मिळाली. परंतु अंतर्गत यादवी, परकीय आक्रमण आणि १९२२–२३ मधील भयंकर दुष्काळ यामुळें जवळजवळ १९२४ पर्यंत साक्षरतेच्या प्रसारासाठीं संघटित प्रयत्न मोठया प्रमाणावर होऊं शकले नाहींत.

अखेर १९२४ सालीं साक्षरता चळवळीसाठीं एक मध्यवर्ति संस्था स्थापन झाली. ह्यामध्यें अर्थातच साक्षरताप्रसार करणाऱ्या निरनिराळ्या गटांनीं व संस्थांनीं पुढाकार घेतला होता. सरकारचा या संस्थांना पाठिंबा होताच; परंतु *या चळवळीचें खरें अधिष्ठान जनता* असून सर्व कार्य स्वयंस्फूर्तीनें निरनिराळ्या स्वयंसेवक मंडळांनीं स्वतां होऊन अंगावर घेतलेलें होतें. *निरक्षरतेचा नाश करणारी संस्था* ( *Down with Illiteracy League* ) या नांवाची संस्था प्रथम स्थापण्यांत आली आणि तिच्या शाखा व उपशाखा सर्व देशभर पसरल्या. कारखान्यांतील कामगार संघ, उद्योगकेंद्रांतील चालक मंडळी, तरुण विद्यार्थी या सर्वांच्या पाठिंब्यावर आणि सर्वांच्या सहकार्यानें साक्षरतेच्या मोहिमेला ( *Literacy Campaign* ) धडाक्यानें सुरवात झाली. १९२८ पासून औद्योगिक प्रगतीची पहिली पंचवार्षिक योजना अंमलांत आल्यावर आणि १९२९–३० पासून शेती सामुदायिक होण्यास सुरवात झाल्यावर या मोहिमेला विलक्षण जोर चढला. कारण या योजना यशस्वी होण्यासाठीं कामगार व शेतकरी यांना किमान यांत्रिक ज्ञान असणें आवश्यक होतें; आणि ही गोष्ट साक्षरतेशिवाय साध्य होणें शक्य नव्हतें. निरनिराळे कारखाने, सामुदायिक शेतें व इतर उद्योगकेंद्रें, तसेंच शहरांतील चाळी, घरें, आणि खेडेगांवांतील झोंपड्या, यांमध्यें अधिकाधिक प्रौढ स्त्रीपुरुष साक्षर होण्यासाठीं मोठ्या अहमहमिकेनें साक्षरता वर्ग चालविण्यांत येऊं लागले. साक्षरतेच्या मोहिमेचा वेग किती होता

आणि साक्षरतेचें प्रमाण कसकसें वाढत गेलें याची कल्पना येण्यासाठीं खालील आंकडे दिले आहेत.

१९२८ ते ३२ या अवधींत साक्षरताप्रसाराचा फायदा घेणाऱ्या प्रौढ लोकांत झालेली वाढ पाहा.

साक्षरता प्रसार

| | |
|---|---|
| १९२७–२८ | ७·३२ लक्ष |
| १९२८–२९ | १९·७ ,, |
| १९२९–३० | ७४·५ ,, |
| १९३०–३१ | १½ कोटि |
| १९३१–३२ | २ कोटि |

एका काळीं साक्षरताप्रसाराच्या व इतर प्रौढ शिक्षणसंस्थांमध्यें ५ कोटि प्रौढ स्त्रीपुरुष शिकत होते. आणि एकंदर *८ कोटि मुलें व प्रौढ मनुष्यें म्हणजे देशांतील निम्मी जनता* या ना त्या प्रकारचें शिक्षण घेत होती ! साक्षरतेची वाढ कशी होत गेली हें पुढील आंकड्यांवरून दिसतें.

साक्षरतेची वाढ

| | |
|---|---|
| १९१४ | शेंकडा २८ टक्के |
| १९३० | ,, ६२.६ ,, |
| १९३९ | ,, ८१.२ ,, |

या पंधरा वर्षांत सुमारें ५ कोटींहून अधिक प्रौढ साक्षर झाले आणि एकट्या १९३२ सालीं ७५ लक्ष लोक साक्षर होऊन बाहेर पडले. यावरून १९३० ते ३२ या कालांत साक्षरतेचा वेग किती मोठा होता हें दिसून येतें.

इतक्या थोडया अवधींत एवढें मोठें कार्य करून दाखविणें अर्थातच सोपें नाहीं. या कामीं सोविएत देशांत कोणत्या अडचणी आल्या व त्या कशा दूर करण्यांत आल्या हें पाहणें आपल्या दृष्टीनें उपयुक्त ठरेल. सोविएत देशाच्या त्यावेळच्या परिस्थितींत सर्वच वस्तूंची अतिशय वाण होती. साक्षरतेचे वर्ग भरविण्यासाठीं जागा मिळणें कठीण होतें. पुस्तकें, पाट्यापेन्सिली आणि इतर शिक्षणोपयोगी उपकरणें यांचा सर्वत्र तुटवडा होता. सर्वांत मोठी अडचण होती ती या अनेक स्त्रीपुरुषांना शिकविण्यासाठीं शिक्षकवर्ग मिळण्याची. तसेंच निरक्षर प्रौढांची यादी करणें, साक्षर होण्यासाठीं त्यांचें मन वळविणें यापासून तों त्यांना चार इयत्तांचें प्राथमिक शिक्षण देण्यापर्यंतच्या सर्व कामासाठीं लक्षावधि स्वयंसेवकांची जरूर होती.

साक्षरतेच्या कार्याचा हा प्रचंड भार कांहीं थोडया व्यक्ति आणि संस्था यांच्या-कडून उचलला जाणें अशक्य होतें. यासाठीं सुशिक्षित वर्गाच्या देशाभिमानाला जागृत करून त्यांना या कार्यांत स्वयंस्फूर्तीनें ओढतां आलें तरच ही गोष्ट साध्य होणार होती. या उद्देशानें मध्यवर्ती संस्थेच्या प्रेरणेनें निरक्षरतेविरुद्ध मोहीम करण्यासाठीं *"संस्कृतिसेना"* (*Culture Army*) उभारण्यांत आली. प्रौढ शाळकरी मुलें आणि कॉलेजांतील तरुण विद्यार्थी, ऑफिसमधील नोकरवर्ग, सुशिक्षित कामगार वर्ग, ज्यांना ज्यांना थोडेसें वाचन, लेखन आणि हिशोबठिशोब शिकवितां येणें शक्य असेल त्या त्या सर्व सुशिक्षित लोकांच्या देशभक्तीला आवाहन करण्यांत आलें. या हांकेला ओ देऊन संस्कृतिसेनेंत दाखल होण्यासाठीं लक्षावधि स्वयंसेवक अहमहमिकेनें पुढें सरसावले! कोमसोमोल, (तरुण कम्युनिस्ट संघ) पायोनियर बालवीर दल, कामगार संघ, किसान संघ, कम्युनिस्ट पक्ष या सर्व संस्थांनीं या मोहिमेंत धडाक्यानें भाग घेतला. *साक्षरतेच्या चळवळीला अशा रीतीनें देशव्यापी स्वरूप प्राप्त झालें, आम जनता त्यामध्यें सामील झाली.*

साक्षरतेचे वर्ग चालविण्याच्या मार्गांत निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळे अडथळे येत. कामगारांसाठीं कारखान्याला जोडून साक्षरतेचे वर्ग काढणें आवश्यक होतें. त्या-करितां प्रथम एखादी बरीशी खोली शोधावी लागे. त्यानंतर कामगारांच्या कामाच्या वेळा संभाळून शिक्षणासाठीं दररोज तास अर्धा तास वेळ काढणें अवश्य होतें. कित्येक ठिकाणीं रात्रीचे वर्ग उघडण्यांत आले. पण दिवसभर श्रम करून थकलेल्या कामगारांचें शिक्षणाकडे लक्ष वेधविणें ही गोष्ट सोपी नव्हती. स्त्रियांना घरकाम संभाळून

साक्षरतेच्या वर्गाला दूरवर जाणें अशक्यच होतें; म्हणून स्त्रियांसाठीं दुपारच्या वेळीं घरकाम संपल्यावर, त्यांच्या चाळीजवळच साक्षरतेचा वर्ग चालविण्यांत येई. ज्यांना लहान लहान मुलें होतीं त्यांचीं मुलें संभाळण्याचें कामही शाळकरी स्वयंसेवक आपल्या अंगावर घेत आणि अशा रीतीनें आयांना साक्षर होण्यास साहाय्य करीत. खेड्यांतील शेतकऱ्यांचा प्रश्न अधिकच कठीण होता. लोकवस्ती विरळ असल्यामुळें कधींकधीं खेड्यांतून पांचपांच, आठआठ शेतकऱ्यांचे साक्षरतावर्ग चालविणें भाग पडत असे. लावणी–कापणीचे हंगाम सांभाळावे लागत. तसेंच शतकानुशतकें अज्ञानांत राहिलेल्या या शेतकऱ्याला आणि खेडूत स्त्रीला साक्षर होण्याचें महत्त्व पटवून देऊन साक्षरतेच्या वर्गांत दाखल होण्याविषयीं त्यांचें मन वळविणें ही गोष्ट मुळींच सोपी नव्हती. 'आपल्याला शिकून काय करावयाचें आहे?' अशा प्रकारची उदासीन वृत्ति शेतकऱ्याच्या ठिकाणीं नेहमीं सर्वत्र आढळून येते.

एवढ्या प्रचंड प्रमाणावर साक्षरतेचे वर्ग चालविण्यासाठीं अध्यापनाचें शिक्षण घेतलेले 'शिक्षित' ( *trained* ) शिक्षक मिळणें शक्यच नव्हतें परंतु असा 'शिक्षित' शिक्षकवर्ग निर्माण होइपर्यंत वाट पाहाणें मूर्खपणाचें ठरलें असतें. ज्याला म्हणून दुसऱ्याला शिकवितां येणें शक्य असेल तो तो शिक्षकाचें काम करण्यास लायक समजला जाई. बहुसंख्य लोक वेतन न घेतां स्वयंसेवक म्हणून शिक्षकाचें काम करीत. परंतु जरूर असेल तेथें शिक्षकांना वेतनही दिलें जाई.

ज्यांचें अर्धेअधिक आयुष्य उलटलें आहे अशा प्रौढ स्त्रीपुरुषांना या वयांत साक्षर होण्यासाठीं मन वळविणें ही गोष्ट किती कठीण आहे हें फक्त अनुभवानेंच कळूं शकेल. एवढें मोठें वय झाल्यावर आपल्याला लिहितां वाचतां येईल याबद्दल त्यांना खात्रीच पटत नसे. परंतु साक्षरतावर्गांत गेल्यावर एक आठवड्याच्या आंतच आपल्यालाही शिकतां येणें शक्य आहे, असा विश्वास त्यांच्यामध्यें उत्पन्न होत असे. वास्तविक लहान मुलांपेक्षां प्रौढ मनुष्यांना साक्षर होण्यास कमी वेळ लागतो. साधारणपणें आठ नऊ महिन्यांत त्यांना चांगलें लिहितां वाचतां येऊं लागतें. पण आपल्याला आतां एवढ्या प्रौढ वयांत शिकून काय करावयाचें आहे, असें वाटून बहुसंख्य प्रौढ निरक्षर शिकण्याविषयीं अतिशय उदासीन असत.

या उदासीनतेविरुद्ध फारच मोठा झगडा करावा लागला. सर्व निरक्षर प्रौढांनीं साक्षर होणें आवश्यक आहे हें पटविण्यासाठीं देशभर जोराचा प्रचार करण्यांत

आला. कारखाने, सामुदायिक शेतें, क्लब, सार्वजनिक जागा या सर्व ठिकाणीं सभा घेऊन लोकांना साक्षर होण्याचें महत्त्व पटवून दिलें जाई. संस्कृति–सेनेतर्फे मोठमोठ्या मिरवणुकी व निदर्शनें करण्यांत आलीं; साक्षरता–दिन पाळण्यांत आले. जाहिराती, पोस्टर्स, व्यंगचित्रें, भिंतपत्रिका, वर्तमानपत्रें या साधनांचा साक्षरतेच्या प्रचारासाठीं फार मोठ्या प्रमाणांत उपयोग करण्यांत आला. निरक्षर कामगारांवर त्यांच्या कामगार संघाकडून आणि कारखान्यांत त्यांच्या इतर कामगार भाईकडून कधीं मन वळवून, तर कधीं उपरोधात्मक टीका करून दडपण आणण्यांत येई. घरीं मुलें आपल्या आईबापांपाशीं त्यांनीं लौकर साक्षर होण्याचा हट्ट व आग्रह धरून बसत असत. समाजवादी चढाओढीचा याकामीं विलक्षण उपयोग झाला. "आमच्या कारखान्यांत आतां कोणीही निरक्षर नाहीं, आमच्या आळींतील सर्व स्त्रीपुरुष दोन महिन्यांच्या आंत साक्षरतेच्या वर्गांत दाखल झाले; आमच्या खेड्यांतील सर्व लोक म्हातारीं आजीआजोबासुद्धां, लिहूं वाचूं लागले आहेत" असें जो तो मोठ्या अभिमानानें सांगण्यासाठीं धडपड करीत असे. कधीं कधीं साठी उलटून गेलेले वृद्ध स्त्रीपुरुष शिकण्याविषयीं अतिशय उत्साह दाखवीत आणि स्वतां साक्षरतेच्या मोहिमेला पाठिंबा देत. यामुळें त्या भागांत चळवळीला अधिक जोर चढत असे. लवकर साक्षर होऊन अधिकाधिक शिक्षण घेणाऱ्या कामगार शेतकऱ्यांना त्यांच्या योग्यतेनुरूप अधिक मानाची नोकरी मिळे, त्यांचा जाहीर गौरव केला जाई, आणि त्यांना इतरांपेक्षां अधिक सवलती मिळत. या सर्व गोष्टींचा परिणाम असा झाला कीं, बहुसंख्य लोकांनीं उदासीनता सोडून उत्साहानें शिक्षण घेण्यास सुरवात केली. एका वर्षीं सुमारें १० लक्ष स्वयंसेवक साक्षरतेचे वर्ग चालवीत होते आणि त्या वर्गांत ५ कोटि प्रौढ शिक्षण घेत होते. म्हणजे प्रत्येक कुटुंबांतील कोणीं ना कोणी लिहायला वाचायला शिकत होतें !

शाळकरी मुलांनीं आणि कॉलेज विद्यार्थ्यांनीं या कामीं विलक्षण उत्साहानें भाग घेतला आणि अतिशय महत्त्वाचें कार्य केलें. ज्या उत्साहानें आज "इन्किलाब झिंदाबाद" अशा घोषणा करीत आपल्या देशांत मुलें सर्वत्र मिरवणूक काढतात त्याच उत्साहानें सोविएत मुलें साक्षरतेच्या प्रसारासाठीं "साक्षर व्हा," "आम जनता साक्षर झाली तरच देशाची प्रगति होईल" अशा घोषणा करीत मिरवणुका काढीत. निरक्षर प्रौढांची यादी करण्यासाठीं हे छोटे स्वयंसेवक गटागटांनीं गल्ल्याबोळांतून चाळीचाळींतून हिंडत. कित्येक ठिकाणीं त्यांच्या गडबडीबद्दल त्यांना खाष्ट स्त्रियां-

करून शिव्याशापांचा प्रसाद मिळे, तर कित्येकदां केरकचरा, सांडपाणी यांचा वर्षावही त्यांच्यावर होत असे ! पण त्याला न जुमानतां हे बालवीर कधीं उघडपणें तर कधीं चाहूल लागूं न देतां सर्वत्र वावरत आणि हवी ती माहिती मिळवीत !

तसेंच चर्चा, वादविवाद करून आणि शेवटीं मुलाचें खास अस्त्र जें हट्ट व रोदन, त्याचा उपयोग करून तीं आपल्या निरक्षर आईबापांना साक्षरतेच्या वर्गात दाखल होण्यास भाग पाडीत. कित्येकदां विलक्षण दृश्यें पाहायला मिळत असत. एखाद्या साक्षरतेच्या वर्गात तरुण मुलगा त्याच्या आईबापांसह, आणि क्वचित् वृद्ध आजोबासह मूळाक्षरें शिकण्यांत मग्न झालेला दिसे ! दुसऱ्या एखाद्या वर्गात डोकावून, फळ्याशीला टेकलेल्या प्रौढ स्त्रीपुरुषांस आंकडे कोण शिकवीत आहे म्हणून पहावयास जावें, तर फळ्यापर्यंत हात पोंचत नाहीं म्हणून खुर्चीवर उभी राहून शिकविणारी बालमूर्ति दृष्टीस पडत असे. वृद्ध आजीला अंकलिपि शिकवण्यांत नात रंगून गेली आहे, असें दृश्य कित्येक घरीं आढळून येई. परकीय आक्रमणासारख्या देशावरील संकटप्रसंगीं अनेक देशांत अनेक वेळां तरुण पिढी देशकार्यासाठीं धांवून आली आहे. परंतु शांततेच्या काळांत सोविएत मुलांनीं निरक्षरतेविरुद्ध मोहिमेंत जी उज्वल देशसेवा बजावली आहे तिला तोड नाहीं असेंच म्हणावें लागेल.

या अफाट चळवळीला मार्गदर्शन करण्यासाठीं आणि कार्यात पद्धतशीरपणा आणण्यासाठीं साक्षरतेच्या मध्यवर्ति संस्थेच्या प्रांतनिहाय, जिल्हानिहाय आणि स्थानिक शाखा काढण्यांत आल्या. साक्षरतेचे वर्ग स्थापून शिक्षणक्रम ठरविण्याची आणि शिक्षण देण्याची व्यवस्था करणें, वर्गणी जमवून व जमाखर्च ठेवून आर्थिक व्यवस्था पाहाणें, पुस्तकें, पाट्यापेन्सिली इत्यादि सामुग्री पुरविणें, साक्षर होण्यासाठीं आणि शिक्षण घेण्यासाठीं लोकांना उत्तेजन देण्याच्या हेतूनें प्रदर्शनें आणि इतर शैक्षणिक महत्त्वाचे सांघिक कार्यक्रम ठरविणें इत्यादि कामें साक्षरता मंडळें करीत असत. ज्या स्वयंसेवकांनीं शिक्षक म्हणून नांवें नोंदविलीं असतील त्यांना थोडेसें अध्यापनशास्त्र व शिक्षणपद्धती शिकविलीं जात. दुय्यम शाळेंतील वरच्या वर्गातील विद्यार्थी आणि कॉलेजचे विद्यार्थी यांनींच हें काम अनेक ठिकाणीं हातीं घेतलें होतें. दरवर्षी येणाऱ्या नवीन स्वयंसेवकांना शिक्षणपद्धती शिकवून त्यांची संघटना करणें आणि या बदलत्या कार्यकर्त्यांना हाताशीं धरून कार्यपरंपरा टिकविणें ही गोष्ट सोपी नव्हती. तसेंच स्वेच्छेनें पुढें आलेल्या या प्रचंड स्वयंसेवक सेनेंत शिस्त व

संघटना राखणें अतिशय अवघड असतें. या सर्व अडचणींना साक्षरता संस्थेनें यशस्वी तऱ्हेनें तोंड दिलें. साक्षरता प्रसारांत येणाऱ्या अडचणी निवारण कशा करतां येतील हें ठरविण्यासाठीं मधून मधून साक्षरता मंडळांच्या वतीनें साक्षरताकार्यकर्ते आणि शिक्षणाधिकारी यांच्या प्रादेशिक परिषदा भरविण्यांत येत असत. या परिषदांमध्यें कामगार संघ व सोविएत सभा भाग घेत; आणि त्यांमध्यें शाळेसाठीं अवश्य असलेल्या जागा, साधनें, शिक्षक इत्यादि सर्व गोष्टींचा विचार होत असे.

प्रौढ निरक्षरांना साक्षर करण्यासाठीं शाळेंतील नेहमींचा अभ्यासक्रम सोयीचा नसतो. प्रौढ मनुष्यें लहान मुलांपेक्षां वेगानें शिकतात. सामान्यतः दर आठवड्यांतून एकूण सहा ते अकरा तास साक्षरतेचा वर्ग चालत असे. पहिल्या नऊ महिन्यांत अक्षरओळख होऊन सोपें वाचन लेखन, आणि साधें अंकगणित शिकविलें जात असे. या अभ्यासक्रमाच्या शेवटीं साक्षरतेची पहिली परीक्षा घेतली जात असे. पुढील नऊ महिन्यांत अस्खलित वाचन, व्याकरण, अंकगणित, भूगोल, इत्यादि विषय असून अभ्यासक्रमाची व्याप्ति साधारणपणें प्राथमिक चार इयत्तांच्या अभ्यासक्रमाइतकी असे. यानंतर दुसरी परीक्षा घेण्यांत येई. अशा रीतीनें दीड वर्षांत प्रौढ मनुष्यांचें प्राथमिक शिक्षण पूर्ण होत असे. साक्षरतेच्या वर्गासाठीं प्रौढ कामगार व शेतकरी यांना योग्य अशीं सोपीं क्रमिक पुस्तकें छापण्यांत आलीं होतीं. तसेंच अन्य सोपीं पुस्तकें आणि वर्तमानपत्रें प्रसिद्ध करण्यांत येत असत. सभा, चर्चा, वादविवाद यांचाही या कामीं बहुमोल उपयोग झाला.

साक्षर झालेल्या व्यक्तीनें आपली लेखनवाचनाची संवय टिकविली नाहीं तर तो पुन्हां निरक्षर होतो! सातारा जिल्ह्यांतील कांहीं खेड्यांत केलेल्या पाहाणीवरून असें दिसून आलें आहे कीं, ज्यांचीं नांवें तिसऱ्या इयत्तेपर्यंत हजेरीपटावर होतीं अशा कित्येक मनुष्यांनीं आपल्या शाळेनंतरच्या आयुष्यांत पुन्हां कधींही पुस्तक हातीं न धरल्यामुळें तीं पुन्हां निरक्षर बनलीं. इंग्लंडमध्यें दुसऱ्या महायुद्धांत ज्यावेळीं ठराविक वयोमर्यादेखालील सर्व तरुण स्त्रीपुरुषांची युद्धकार्याकरितां नोंदणी करण्यांत आली त्यावेळीं शेंकडा एक दोन टक्के मनुष्यांना लिहितांवाचतां येत नाहीं असें आढळून आलें! साक्षरता टिकण्यासाठीं साक्षर लोकांना वाचनाची गोडी लावून त्यांना पुस्तकें व वर्तमानपत्रें पुरविण्याची सोय करणें अवश्य असतें. सोविएत समाजांत व्यक्तींना केवळ साक्षर करणें हें ध्येय नसून त्यांचा उत्तरोत्तर सांस्कृतिक विकास करणें हें ध्येय

असल्यामुळें साक्षर प्रौढांना उत्तेजन देण्यासाठीं अनेक प्रकारें तरतूद करण्यांत आली.

नवीनच साक्षर झालेल्या स्त्रीपुरुषांसाठीं खास पुस्तकें लिहवून घेण्यांत आलीं आणि खेडेगांवांतील लोकांना ज्याविषयीं विशेष जिज्ञासा आहे अशा विषयांवरील लेख व बातम्या प्रसिद्ध करणारीं वर्तमानपत्रें काढण्यांत आलीं. ठिकठिकाणीं वर्तमानपत्रांसाठीं खेडयांतून बातमी लिहून पाठविण्यास आणि आपल्या तक्रारी जाहीरपणें अथवा बिनसहीनें पुढें मांडण्यास शेतकऱ्यांस उत्तेजन दिलें जातें. सध्यांहि असे २० लक्ष शेतकरी वर्तमानपत्रांना नियमितपणें वृत्तांत पाठवीत असतात. सामुदायिक शेतावरील, कारखान्यांतील अथवा क्लबमधील भिंतपत्रिका यांमध्यें लिहिण्यास उत्तेजन देऊन हीच गोष्ट साधण्यांत येते.

कामगारांचे क्लब, शेतकरी क्लब ( *Peasant Homes* ), लाल कोने, या सर्व जागीं ग्रंथालय आणि वाचनमंदिर यांची सोय असते प्रथम प्रथम खेडयांतून एखाद्या खोलींत ( *Reading Hut* ) जमून तेथें दिवसाच्या बातम्या व मनोरंजक गोष्टी वाचून दाखविल्या जात आणि अशा रीतीनें वाचनाचें महत्त्व पटविलें जाई. यामुळें कित्येक निरक्षर प्रौढांना स्वतां वाचायला शिकण्यास स्फूर्ति येत असे! ग्रंथालयांचा प्रसार तर विलक्षण झपाट्यानें झाला आहे. तसेंच क्लबांत, कारखान्यांत, शेतावर किंवा सोविएत सभेंत निरनिराळ्या सामाजिक आणि राजकीय प्रश्नांवर सभा घेऊन चर्चा करण्यास उत्तेजन दिलें जातें. सोविएत शेतकऱ्यांना व कामगारांना चर्चा व वादविवाद करण्याची विलक्षण हौस असते. प्रदर्शनें, चित्रसंग्रह, सिनेमा, नाटकें, रेडियोचे कार्यक्रम यांची सोयही मोठया प्रमाणांत वाढली असल्यामुळें साक्षर प्रौढांची साक्षरता टिकून राहण्यास आणि सांस्कृतिक विकास साधण्यास खूप मदत होते.

सोविएत देशांत बहुजनसमाजाची वाचनाची आवड व भूक अतिशय वाढली आहे असें सोविएत यूनियनमध्यें प्रत्यक्ष जाऊन आलेले पुण्याचे सुप्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ डॉ. ग. श्री. खैर यांनीं आपल्या पुस्तकांत नमूद केलें आहे. साक्षरताप्रसारासंबंधीं सोविएत सरकारकडून सांगण्यांत आलेली प्रगति खरोखरी कितपत बरोबर आहे हें जाणण्याच्या हेतूनें त्यांनीं एक मौजेची युक्ति योजली होती. शहरांतून फिरत असतांना एकदां डॉ. खैर व त्यांचे स्नेही रशियन शब्दकोश बरोबर घेऊन गेले; आणि पोशाख व चेहरा यावरून मागासलेल्या वाटणाऱ्या निरनिराळ्या व्यक्तींस अनेक

वस्तूंचीं रशियन नांवें शब्दकोशांत दाखविण्यास त्यांनीं सांगितलें. त्या सर्वांनीं अचूकपणें ते शब्द काढून दाखविले आणि अशा रीतीनें आपण खरोखरच साक्षर ( नुसते सही करण्यापुरते नव्हे ) असल्याबद्दल खात्री पटवून दिली.

१९३४ पर्यंत जोरानें चाललेली साक्षरतेची मोहीम पुढेंपुढें मंदावली असें दिसतें. १९३९ सालीं शेंकडा ८१ टक्के लोक साक्षर होते. कित्येक प्रदेशांत शेंकडा २४ इतके लोक निरक्षर आहेत असें आढळून आलें, तेव्हां १९४० मध्यें जनतेचें लक्ष पुन्हां एकदां निरक्षरतेच्या कलंकाकडे वेधण्यांत आलें. शिक्षकांना व शाळांतील प्रौढ विद्यार्थ्यांना साक्षरतेच्या प्रसारार्थ स्वयंसेवक होण्यास पाचारण करण्यांत आलें. कारखाने व इतर औद्योगिक केंद्रें आणि खेड्यांतील सामुदायिक शेतें यांनीं या कामीं पुन्हां नेटानें पुढाकार घेतला. साक्षरतेच्या शाळांत काम करणाऱ्या शिक्षकांना अध्यापनाचें नीट शिक्षण मिळालेलें असलें पाहिजे असा आग्रह आतां शिक्षणखात्यानें धरला होता व आतां तें शक्यही होतें. निरक्षरतेविरुद्ध काढण्यांत आलेल्या या अखेरच्या मोहिमेचा वर्तमानपत्रांतून हिरीरीनें पुरस्कार करण्यांत आला. १९४२ साल संपण्यापूर्वीं निरक्षरतेचा डाग समूळ धुवून निघाला पाहिजे असा निश्चय करण्यांत आला होता. १९४१ पासून युद्ध सुरू झालें असलें तरी हा संकल्प बहुधा सिद्धीस गेला असावा.

सोविएत यूनियनमधील या साक्षरताप्रसाराची इतर देशांशीं तुलना करणें आपल्याला अनेक दृष्टींनीं उद्‌बोधक होईल. इंग्लंड, अमेरिका, जर्मनी इत्यादि पाश्चात्य राष्ट्रांना शंभर टक्के साक्षरता साध्य होण्यास ७५ ते २०० वर्षें लागलीं. इंग्लंडमध्यें पाऊणशें वर्षांपूर्वीं प्राथमिक शिक्षण सक्तीचें करण्यांत आलें ही गोष्टही येथें ध्यानांत ठेवली पाहिजे. इतर राष्ट्रांतही प्राथमिक शिक्षण सक्तीचें झाल्याला पुष्कळ दशकें लोटलीं आहेत. सर्व रशिया साक्षर करण्यास लागणाऱ्या कालावधीविषयीं झारशाहींतील शिक्षणमंत्र्यांचा अंदाज १०० ते १२५ वर्षांचा होता ! १९३१ ते ४१ या दशकांत हिंदुस्थानांतील साक्षरतेंत सर्वांत अधिक वाढ झाली—शेंकडा ८·३ पासून शेंकडा १४·६ पर्यंत वाढ झाली. ( सही करतां येणें ही हिंदुस्थानांतील साक्षरतेची व्याख्या आहे. ) हा वेग कायम धरला तरीसुद्धां आपला देश साक्षर होण्यास

१५० वर्षें लागतील ! एवढ्या काळांत इतर जग आपल्या कितीतरी पुढें जाईल. तेव्हां साक्षर होण्यासाठीं इंग्लंड, अमेरिका इत्यादि राष्ट्रांनीं जेवढा अवधि घेतला आणि त्यासाठीं जी पद्धति अनुसरली त्याचें अनुकरण करण्यानें आपलें भागणार नाहीं, ही गोष्ट उघड आहे. उलट, सोविएत यूनियननें हा १५० वर्षांचा कालखंड २० वर्षांच्या एका उडींत ओलांडला यापासून हिंदुस्तानला पुष्कळच शिकण्यासारखें आहे. आपल्या देशालाही तशाच प्रकारची साक्षरतेची देशव्यापी व योजनाबद्ध चळवळ हातीं घ्यावी लागेल. मुंबई शहरांत गेलीं सात आठ वर्षें थोडयाफार व्यक्तींच्या व संस्थांच्या सहाय्यानें प्रौढांना साक्षर करण्याचे पद्धतशीर प्रयत्न चालू आहेत. परंतु आजपर्यंत त्यांना फक्त ८०,००० प्रौढ स्त्रीपुरुष साक्षर करतां आले, यावरून अशा योजनेचा व्याप किती अपुरा पडतो आणि सबंध हिंदुस्थान देशासाठीं साक्षरता मोहीम किती व्यापक प्रमाणावर उभारावी लागेल याची उत्तम कल्पना येते. साक्षरता टिकविण्यासाठीं खास लिहविलेल्या सोप्या पुस्तकांची किती गरज आहे ही गोष्टही आतां सर्वमान्य झाली आहे.

सार्जंट–योजनेच्या प्रतिवृत्तांत प्रौढ शिक्षणसमितीच्या सूचनांचा सारांश देण्यांत आला आहे. त्यावरून असें दिसतें कीं, प्राथमिक शिक्षण अगदीं तावडतोब सर्वत्र सक्तीचें झालें असें मानलें ( ही गोष्ट अर्थात् अशक्यच आहे ) आणि फक्त चाळीस वर्षांखालील प्रौढ निरक्षरांचाच प्रश्न हातीं घेतला ( सोविएत यूनियनमध्यें ही वयोमर्यादा पन्नास वर्षांची होती ) तरीसुद्धां फक्त ब्रिटिश हिंदुस्तानांतच *नऊ कोटी* प्रौढ स्त्रीपुरुषांना साक्षर करावें लागेल ! संस्थानें जमेस धरलीं तर ही संख्या *बारा कोटींपर्यंत* सहज जाते. म्हणजे सोविएत यूनियनच्या *तिप्पट मोठा प्रश्न* आपल्याला सोडवावयाचा आहे; कारण त्या देशांत गेल्या वीस वर्षांत सुमारें पांच कोटि प्रौढांना साक्षर करण्यांत आलें. स्वातंत्र्य मिळालें कीं हा प्रश्न सहज सुटेल असें म्हणणें चुकीचें ठरेल.

सार्जंट—समितीची साक्षरताप्रसाराची योजना १५ वर्षांची आहे सरकारी खात्यांत काम करणाऱ्या नोकरांवर साक्षर होण्याची सक्ती करणें बरोबर नाहीं अशा विलक्षण सूचना सोडून दिल्या तर सुशिक्षित जनतेकडून स्वयंस्फूर्त सहाय्य मिळविण्यासाठीं शक्य ती खटपट व्हावी, शाळाकॉलेजांतील विद्यार्थ्यांना साक्षरतेच्या वर्गांत शिकवण्याचें काम करण्यास भाग पाडतां येईल किंवा कसें याविषयीं विचार

करावा इत्यादि उपयुक्त सूचना सार्जेंट समितीनें केल्या आहेत. विद्यार्थ्यांवर या कार्याचा भार टाकूं नये असें मत कांहीं हिंदी शिक्षणतज्ञ व्यक्त करतात हें प्रस्तुत लेखकास स्वानुभवानें माहीत आहे. म्हणून याविषयीं दोन शब्द मुद्दाम लिहिल्यास अस्थानीं होणार नाहीं.

१९३८ सालीं मुंबई इलाख्यांतील कॉंग्रेस मंत्रिमंडळानें साक्षरता प्रसाराच्या योजना मागविल्या होत्या. त्यावेळीं स्वयंसेवेच्या पायावर आधारलेली एक योजना प्रस्तुत लेखकानें पाठविली होती*. याच वर्षी पुण्यांतील एका सुप्रसिद्ध कॉलेजच्या बक्षिस समारंभाच्या वेळीं, "तुमच्या नेतृत्वाखालीं निरक्षरतेविरुद्ध उभारल्या जाणाऱ्या लढयांत सैनिक म्हणून काम करावयास आम्ही सज्ज आहों" असें जाहीर आश्वासन त्या कॉलेजच्या प्रिन्सिपॉलनीं श्री. बाळासाहेब खेर यांस दिलें होतें, याची आठवण कित्येक वाचकांस असेल. अलीकडे भारत सेवक समाजाचे श्री. कोदंडराव यांनींहि कॉलेज विद्यार्थ्यांचा या कारणीं उपयोग करून घ्यावा, हा मुद्दा पुढें मांडला आहे. आतां पुन्हां एकदां कॉंग्रेस मंत्रिमंडळ अधिकारावर आलें आहे व श्री. बाळासाहेब खेर शिक्षणमंत्री झाले आहेत. महाराष्ट्रांतील कांहीं कॉंग्रेस पुढारी बहुजनसमाजाच्या शिक्षणाचा प्रश्न जोरानें पुढें आणीत आहेत. अशा वेळीं पुन्हां एकदां साक्षरताप्रसाराकडे लक्ष वेधणें साहाजिक आहे. ‡ साक्षरताप्रसाराची कोणतीहि योजना अंमलांत आणावयाची म्हटली तरी ती मुख्यतः देशभक्तीच्या व स्वार्थत्यागप्रेरित स्वयंसेवेच्या पायावर उभारलेली देशव्यापी चळवळ असावी लागेल. हें सोविएत देशांतील साक्षरतामोहिमेच्या वरील वृत्तांतावरून सर्वांस मान्य होईल असें वाटतें.

---

* दुय्यम शाळांतील वरच्या वर्गांतील विद्यार्थी, आणि कॉलेजांतील विद्यार्थी यांना साक्षरता मोहिमेंत भाग घेण्यास उद्युक्त करावें, अवश्य झाल्यास कांहीं अंशीं सक्ती करावी, अशी सूचना या योजनेंत केलेली होती. दुय्यम शिक्षक व प्राध्यापक यांची मदत सरकारनें या कामीं घ्यावी असेंहि सुचविलें होतें. कांहीं मोजक्या व्यक्ति आणि संस्था यांच्या हातून हें कार्य पार पडणें शक्य नाहीं, त्यासाठीं सुशिक्षित जनतेच्या देशाभिमानास आवाहन करावें, हा मुद्दा मांडून अशा देशव्यापी चळवळीच्या क्रांतिकारक परिणामाचा निर्देशहि मुद्दाम करण्यांत आला होता.

‡ मुंबई कायदेमंडळाच्या सभासद सौ. लीलावती मुनशी यांनीं साक्षरता मोहिमेसंबंधीं एक ठराव कायदे मंडळांत आणला होता; त्यावेळीं श्री. खेर यांनीं साक्षरता योजनेचा आपण विचार करीत आहोंत असें उत्तरादाखल भाषणांत म्हटलें होतें. अद्यापि या योजनेचा तपशील बाहेर आलेला नाहीं.

## प्रौढ शिक्षण आणि सांस्कृतिक विकास

## ११

लहानपणीं सर्वसाधारण ज्ञान मिळालें आणि पुढें एखादा व्यवसाय करून उपजीविकेचा प्रश्न सोडवितां आला कीं, राष्ट्रीय शिक्षणयोजनेचें कार्य संपलें असें म्हणणें बरोबर होणार नाहीं. कारण मनुष्याचा सर्वांगीण विकास हें शिक्षणाचें उद्दिष्ट आहे आणि हा विकास अमुक एका वयानंतर थांबतो असें नाहीं. परंतु शैक्षणिक व सांस्कृतिक विकास चालू राहाण्यासाठीं इतर देशांत पद्धतशीर व्यवस्था केलेली आढळून येत नाहीं. *प्रौढ शिक्षणाची मोठ्या प्रमाणावर सोय* हा सोविएत शिक्षणाचा एक महत्त्वाचा *विशेष* आहे.

प्रौढ शिक्षणाचे दोन महत्त्वाचे उद्देश असतात. पहिला उद्देश शैक्षणिक विकास हा असून तो निरनिराळ्या प्रकारें साध्य करून घेण्याची व्यवस्था असली पाहिजे. स्वतांच्या व्यवसायांत अधिकाधिक उच्च प्रतीचें शिक्षण घेऊन आपला दर्जा सुधारण्याची संधि प्रत्येकाला मिळाली पाहिजे. तसेंच आपल्या ज्ञानाची व्याप्ति आणि उंची वाढविण्याची ज्यांची इच्छा आहे त्यांच्यासाठीं योग्य तरतूद करण्यांत आली पाहिजे. प्रौढ शिक्षणाचा दुसरा उद्देश असा कीं, प्रत्येक प्रौढ स्त्रीला अथवा पुरुषाला उत्तरोत्तर आपला सांस्कृतिक विकास करून घेण्यासाठीं निरनिराळ्या

प्रकारची सोय केलेली असली पाहिजे आणि आपला फुरसतीचा वेळ उत्तम रीतीनें आणि सुसंस्कृतपणें घालवितां येण्यासाठीं साधनेंही उपलब्ध असलीं पाहिजेत.

सोविएत प्रौढ शिक्षणामध्यें शैक्षणिक विकासासाठीं असलेल्या सोयींचा आपण प्रथम विचार करूं. सोविएत सत्तेच्या पहिल्या कांहीं वर्षांत, प्रौढ स्त्रीपुरुषांना साक्षर केल्यानंतर त्यांना यांत्रिक, शेतीविषयक, अगर दुसऱ्या एकाद्या व्यवसायांचें शिक्षण घेण्यासाठीं मोठ्या प्रमाणावर तजवीज करण्यांत आली होती. विशेषतः १९२८ सालीं औद्योगिक योजना सुरू झाल्यापासून सुशिक्षित यंत्रकुशल कामगार, यांत्रिक पद्धतीनें शेतीविषयक निरनिराळीं कामें करणारे शेतकरी, आणि डॉक्टर, शिक्षक, इंजिनियर इत्यादि अनेक पेशांचे तज्ज्ञ यांची वाण फार भासत होती. साक्षरतेनंतर दुय्यम शिक्षण देणें, दुय्यम शिक्षण संपल्यावर उच्च शिक्षण किंवा व्यवसाय शिक्षण देणें, उत्तम अधिकारीवर्ग निर्माण करण्यासाठीं योग्य तें उच्च शिक्षण देणें इत्यादि सोयी प्रौढ स्त्रीपुरुषांसाठीं करण्यांत आल्या होत्या.* त्यांचा फायदा घेऊन पूर्वी निरक्षर असलेले अनेक स्त्रीपुरुष स्वतांची पात्रता सिद्ध करून मानाच्या व जबाबदारीच्या जागेप्रत पोंचले असें दिसून येतें. केवळ प्रौढ टेक्निकल शाळांतच १९३३ सालीं १२ लक्ष प्रौढ कामगार पद्धतशीर यांत्रिक शिक्षण घेत होते. प्राथमिक शिक्षण घेऊन पुढें या ना त्या अभ्यासक्रमाचें शिक्षण घेणाऱ्या प्रौढांची संख्या त्या वर्षी १$\frac{1}{4}$ कोटीहून अधिक होती. यावरून या शिक्षणसंस्थांचा व्याप त्या काळींसुद्धां किती मोठा होता हें दिसून येतें. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या काळांत पूर्वीइतक्या निकडीनें यंत्रकुशल कामगार शेतकऱ्यांची जरूर नव्हती. सर्व प्रकारच्या शिक्षणाची आतां मोठ्या प्रमाणावर तजवीज झालेली असल्यामुळें देशाच्या औद्योगिक विकासासाठीं आवश्यक असलेले यंत्रकुशल कामगार, शेतकरी आणि व्यवसायतज्ज्ञ नव्या पिढींतील तरुणांतून येऊं लागले होते. असें असूनही

* १९३९ पर्यंत निरक्षरता पार नाहींशी झालेली नव्हती आणि कांहीं साक्षर प्रौढ पुढील शिक्षणाहि घेत होते. याविषयीं १९३९ सालचे पुढील आंकडे पाहा:—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| साक्षरता वर्गांतील | प्रौढ | विद्यार्थी | ३२ | लक्ष |
| प्राथमिक शाळांतील | ,, | ,, | ३६ | ,, |
| दुय्यम | ,, | ,, ,, | ७$\frac{1}{2}$ | ,, |

प्रौढ शिक्षणाचें मान कमी झालें नाहीं. १९४० साली एकूण पांच कोटि मुलें व प्रौढ कोणत्या ना कोणत्या तरी शिक्षणसंस्थेंत शिकत होते. यामधून ३·४ कोटि मुलांची व तरुण विद्यार्थ्यांची संख्या सोडली तर बाकीचे १·६ कोटि प्रौढ स्त्रीपुरुष होते. तिसऱ्या पंचवार्षिक योजनेंत शैक्षणिक आणि सांस्कृतिक प्रगतीची आकांक्षा किती उच्च ठेवण्यांत आली होती हें आपण अन्यत्र पाहिलेंच आहे. प्रत्येक कामगार शेतकऱ्याला किमान सर्वसाधारण बौद्धिक आणि यांत्रिक अगर व्यावसायिक शिक्षण मिळालेंच पाहिजे असें ध्येय पुढें ठेवण्यांत आलें होतें. युद्धामुळें ही योजना अपेक्षे-प्रमाणें यशस्वी होऊं शकली नाहीं हें खरें. पण प्रौढ शिक्षणाच्या प्रगतीसाठीं एवढी विस्तृत योजना आंखण्यांत आली होती यावरूनच सोवि ·त देशांत प्रौढ शिक्षणाला किती महत्त्व देण्यांत येतें ही गोष्ट स्पष्ट होते.

प्रौढ शिक्षणाच्या सध्यां ( १९४० सालीं ) कोणत्या संस्था आहेत ?

सप्तवार्षिक शिक्षण घेतल्यावर जे विद्यार्थी ताबडतोब धंदेशिक्षणाकडे वळले अथवा ज्यांनीं दुय्यम प्रतीचें यांत्रिक वा व्यावसायिक शिक्षण घेतलें, त्या प्रौढ स्त्रीपुरुषांना कामगार शाळा, शेतकरी शाळा आणि तत्सम प्रौढ शिक्षणसंस्था यांमध्यें शिक्षण घेऊन नंतर उच्च शिक्षणसंस्थांत प्रवेश मिळवितां येतो हें आपण मागें पाहिलेंच आहे. तसेंच ज्यांना वरील अभ्यासक्रम पुरा करतां येणें अशक्य असेल परंतु ज्यांनीं आपल्या कामांत प्रावीण्य दाखविलें असेल अशा कामगारांना औद्योगिक विद्यालयांत ( *Industrial Academy* ) पांच वर्षांचा अभ्यासक्रम पुरा करून उद्योगकेंद्राचे संचालक बनतां येतें. याशिवाय ज्यांची आपल्या कामांत अगर व्यवसायांत आपली अधिकाधिक प्रगति करून घ्यावयाची इच्छा आहे त्यांना कामगार संघ, व्यवसायसंघ ( *Professional Workers' Unions* ), सामुदायिक शेतें यांच्या वतीनें चालणाऱ्या वर्गांत शिक्षण घेण्याची व्यवस्था होते. या संघांच्या प्रादेशिक केंद्रांच्या ठिकाणींही लहान कालावधीचे निरनिराळे हंगामी वर्ग चालवून शिक्षण दिलें जातें. शहरांतील व सामुदायिक शेतावरील क्लब यांच्याकडूनही असे वर्ग चालविलेले असतात. हे सर्व शिक्षणक्रम मोफत असतात ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. याशिवाय पत्रव्यवहारानें यांत्रिक व इतर शिक्षण देण्याची व्यवस्था फार मोठ्या प्रमाणांत आहे. १९१४ सालीं अशी व्यवस्था मुळींच नव्हती. १९३८ सालीं ५९ लक्ष स्त्रीपुरुष या पद्धतीनें शिक्षण घेत होते.

आपल्या धंद्यांत अगर व्यवसायांत प्रगति करून घेण्याची योजना आपण पाहिली. आपल्या आवडीच्या विषयाचें ज्ञान मिळवून आपल्या ज्ञानाचें क्षितिज विस्तृत करण्यासाठीं काय सोय आहे हें आतां पाहूं. वाङ्मय, इतिहास, शास्त्रीय विज्ञान इत्यादि विषयांच्या विशेष अभ्यासासाठीं कामगार संघ, सामुदायिक शेतें आणि व्यवसाय संघ यांच्या तर्फे आणि क्लब, लालकोने, संस्कृति उद्यानें ( *Parks of Culture and Rest* ) इत्यादि संस्थांकडून निरनिराळीं अभ्यासमंडळें आणि वर्ग चालविण्यांत येतात; आणि त्याचा फायदा कित्येक प्रौढ स्त्रीपुरुष घेतात. सर्व-साधारण शैक्षणिक विकासाची ही सार्वत्रिक व्यवस्था झाली. परंतु कामगार संघाचे कार्यकर्ते, कारखान्यांचे व सामुदायिक शेतांचे संचालक, शिक्षक वगैरे तज्ज्ञांनां आपलें कार्य उत्तम रीतीनें पार पाडण्यासाठीं सद्यःकालीन परिस्थितीची यथायोग्य कल्पना आलेली असावी लागते; आणि यासाठीं अर्थशास्त्र, इतिहास, राजकारण इत्यादि विषयांचा पद्धतशीरपणें अभ्यास झालेला असला पाहिजे. यासाठीं प्रथमप्रथम सायंकालीन वर्ग सुरु करण्यांत आले. या वर्गातर्फे निरनिराळ्यां विषयांवर सुलभ व्याख्यानें देण्यांत येत, तसेंच कांहीं विषयांवर व्याख्यानमाला गुंफण्यांत येत.

युद्धकालांत अशा प्रकारच्या प्रौढ शिक्षणाची आवश्यकता अधिक तीव्रपणें भासूं लागली. परराष्ट्रीय घडामोडी, अंतर्गत परिस्थिति, विज्ञान, वाङ्मय, तत्त्वज्ञान, इतिहास या विषयांची प्राथमिक माहिती आणि विशेष शिक्षण असे दोन्ही प्रकारचे अभ्यासक्रम सुरू करण्यांत यावे अशी मागणी यावेळीं जोरानें पुढें आली. ही मागणी पुरी करण्याच्या उद्देशानें १९४३ पासून निरनिराळ्या ६० शहरांत "*लोकविद्यालयें*" ( *People's Universities* ) उघडण्यांत आलीं आहेत. प्रथम लेनिनग्राद शहरांत हा उपक्रम सुरु झाला आणि लौकरच तो सर्वत्र पसरला. यांमधील प्रत्येक केंद्रांत ६०० पासून १५०० पर्यंत प्रौढ विद्यार्थी निरनिराळ्या विषयांच्या अभ्यासासाठीं येतात. आंतरराष्ट्रीय राजकारण, अर्थशास्त्र, तत्त्वज्ञान, वाङ्मय, कला, कम्युनिस्ट पक्षाचा इतिहास, सोविएत यूनियनचा इतिहास, इत्यादि विषयांचे अभ्यासक्रम या विद्यालयांत शिकविले जातात. या विद्यालयांचें काम सामान्यतः सुट्टीच्या दिवशीं चालतें. दर दिवशीं व्याख्यानें व चर्चा यांसाठीं प्रत्येक विषयाला चार तास दिलेले असतात आणि एकाच व्यक्तीला दोन विषयांचा अभ्यास एकदम करतां यावा अशा तऱ्हेनें वेळापत्रक बनविलेलें असतें. साधारणपणें प्रत्येक विषयाचा अभ्यासक्रम एकूण १२० ते १९२ तासांचा असून तो सहा सात महिन्यांत पुरा

होऊं शकतो. शिकविण्याच्या कामीं सिनेमाचा उपयोगहि करण्यांत येतो. विश्वविद्यालयांतील प्राध्यापक आणि नामवंत साहित्यिक व कलावंत या लोकविद्यालयांत शिकवितात. प्रवेश मिळवूं इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांना त्या विषयाचें प्राथमिक ज्ञान असलें पाहिजे. त्यानें नियमितपणें तासांना हजर राहाणें आवश्यक समजलें जातें. कित्येक ठिकाणीं विद्यार्थ्यांनीं अनियमित असूं नये या हेतूनें थोडीशी फी घेण्यांत येते.

फुरसतीच्या वेळांत आपली शैक्षणिक प्रगती करून घेण्यास प्रत्येकाला संधि मिळणें जसें अवश्य आहे, तितकेंच, किंबहुना त्याहूनही अधिक, प्रत्येकाला आपल्या आवडीचे छंद अनुसरून, वाङ्मय, संगीत, कला, खेळ यांचा उपभोग घेतां येऊन, सांस्कृतिक विकास साधतां आला पाहिजे. तसेंच विश्रांतीचा काळ आनंदांत जावा यासाठीं उच्च प्रतीच्या करमणुकीचीं विविध साधनें उपलब्ध असलीं पाहिजेत. फुरसतीचा वेळ सुसंस्कृत तऱ्हेनें घालवतां येण्यासाठीं सोविएत देशांत कोणत्या सोयी आहेत ? आणि त्यांची वाढ कशी झाली ?

साक्षर झालेल्या प्रौढांचें सांस्कृतिक विकासाचें एक प्रमुख साधन म्हणजे वाचन. वाचनाची संवय लागून नुकत्याच साक्षर झालेल्या स्त्रीपुरुषांची साक्षरता टिकावी आणि त्यांच्या ज्ञानाचें क्षेत्र व्यापक व्हावें या हेतूनें जागोजाग ग्रंथालयें आणि वाचनालयें उघडण्यांत आलीं हें आपण मागील प्रकरणांत पाहिलें आहे. कारखाने, सामुदायिक शेतें व इतर उद्योगकेंद्रें यांना जोडून *लाल कोने* ( *Red Corners* ) सुरू झाले. या ठिकाणीं पुस्तकें व वर्तमानपत्रें यांच्या द्वारा वाचनाची सोय होऊन शिवाय भित्तपत्रिकेमुळें लेखनालाही वाव मिळतो. व्याख्यानें, वादविवाद, चर्चा, तसेंच करमणुकीचे कार्यक्रमही येथें लहान प्रमाणावर केले जातात. खेड्यांतून प्रथम *वाचनगृहें* ( *Reading Huts* ) आणि *वाचनमंदिरें* ( *Reading Halls* ) सुरू करण्यांत आलीं. येथें पहिल्यांदा मनोरंजक व माहितीपूर्ण पुस्तकें शेतकऱ्यांना वाचून दाखविलीं जात आणि वर्तमानपत्रांतील बातम्याही सांगितल्या जात असत. यामुळें साक्षर होऊन छापील कागदांत बंदिस्त असलेलें हें ज्ञानभांडार आपणहि हस्तगत करावें अशी स्फूर्ति अनेक प्रौढ शेतकऱ्यांना होत असे ! आणि साक्षर झालेल्यांना वाचनाची गोडी पण लागे. शहरांत प्रौढ स्त्रीपुरुषांसाठीं कारखान्यातर्फे व इतरत्र, क्लब सुरू झाले आणि हळुहळु ते सामुदायिक शेतीच्या केंद्रांत पसरले. क्लबांत ग्रंथालय व

वाचनमंदिर हीं तर असतातच पण सभेसाठीं सभागृहांची आणि निरनिराळीं अभ्यास-मंडळें व वर्ग चालविण्यासाठीं इतर व्यवस्था असते. खेळाचीं अनेक साधनें आणि करमणुकीचे बहुविध कार्यक्रम असतात. मोठया शहरांत "*संस्कृति मंदिरें*" आणि "*संस्कृति उद्यानें*" (*Houses of Culture and Parks of Culture*) नांवें असलेले मोठाले मध्यवर्ति क्लब उघडण्यांत आले आहेत. शिवाय सिनेमा नाटय-गृहें, व्यायाममंदिरें आणि क्रीडोद्यानें, वस्तु संग्रहालयें आणि चित्रमंदिरें (*Picture Galleries*) यांची स्थापनाही मोठया प्रमाणांत होत आहे.

१९२४ सालीं देशांत स्थिरस्थावर झाल्यावर या नवीन संस्था उघडण्यांत येऊं लागल्या. परंतु त्यांची खरी वाढ पहिल्या व दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या काळांत (१९२८-३२ आणि १९३२-३७) झाली. १९३२ सालीं ७२८० क्लब, १५०० हून अधिक शहरांतील मोठालीं संस्कृतिमंदिरें (*Houses of Culture*) व एक लक्षाहून अधिक लाल कोने होते, आणि खेड्यांतील वाचनगृहांची संख्या ४६,००० होती. याच सालीं ग्रंथालयांची वाढ १६००० हून अधिक झालेली होती.

१९२९ पासून १९३३ पर्यंत या निरनिराळया संस्थांत किती प्रगति झाली आहे याची कल्पना पुढील आंकडयांवरुन येईल.

सांस्कृतिक संस्थांची वाढ.

| साल | १९२९ | १९३३ | वाढ |
|---|---|---|---|
| क्लब | ३२,००० | ५४,००० | १·७ पट |
| सिनेमा गृहें (प्रवासी सिनेमा धरून) | ९,८०० | २९,२०० | ३ पट |
| वर्तमानपत्रांचा खप | १२५ लक्ष | ३६५ लक्ष | २·९ पट |

दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या काळांत या सांस्कृतिक संस्थांत अशीच वाढ होत गेली. या संस्थांची विशेष माहिती पुढें दिली आहे, तेथें १९३८ नंतरचे आंकडे सांपडतील.

अल्पावधींत इतकी मोठी सांस्कृतिक प्रगति होण्यासाठीं ज्या अनेक साधनांचा उपयोग करून घेण्यांत आला त्यांपैकीं दोन गोष्टींचा विशेष उल्लेख करणें जरूर आहे. खेडयांतील मागासलेल्या जनतेला संस्कृतीची ओळख करून देण्याच्या हेतूनें मोठया शहरांत *"किसान गृहें"* ( *Peasant Houses* ) उघडण्यांत आलीं होतीं. जे शेतकरी खेडयावरून कांहीं कामासाठीं शहरांत येत असत त्यांच्यासाठीं या संस्था मुद्दाम चालविण्यांत येत होत्या. त्यांच्या शेतकीविषयक व इतर प्रश्नांचा विचार केला जाऊन त्यांना योग्य तो सल्ला व साहाय्य मिळवून देण्याची येथें व्यवस्था होई. त्याचबरोबर त्यांना शहरी संस्कृतीची ओळख होऊन सांस्कृतिक विकासाच्या मार्गावर त्यांचें पहिलें पाऊल पडत असे. कारण हीं किसानगृहें एखाद्या क्लबाप्रमाणें सजविलेलीं असून तेथें क्लबांतील सर्व सुखसोयी व साधनें उपलब्ध असत. खेडुतांची येथें राहाण्याजेवण्याची व झोंपण्याचीही सोय होत असे. शहराकडे पहिलीच खेप असणाऱ्या शेतकऱ्याला आयुष्यांत प्रथमच विलक्षण गोष्टी पाहावयास मिळत आणि अगदीं नवीन अनुभव येत. येथें स्नानगृहांची सोय मुद्दाम केलेली असे. कारण प्रत्येकानें स्वच्छ आंघोळ केली पाहिजे यावरहि त्याकाळीं भर देणें अगत्याचें होतें ! स्वच्छता व आरोग्य यांचें महत्त्व बिंबविण्यास या किसानगृहांचा अतिशय उपयोग होत असे. या शेतकऱ्यांना शहरांतील प्रेक्षणीय स्थळें, वस्तुसंग्रहालयें, उद्योगकेंद्रें इत्यादि दाखविण्याचीही व्यवस्था केली जात असे. शहरी सुखसोयींचा आस्वाद घेऊन खेडयांत परत जाणारा हा शेतकरी संस्कृतीचें लोण घेऊन आपल्याबरोबर गेला असेल आणि या दोन्हींचा उपभोग खेडयांना मिळावा अशी तीव्र इच्छा त्याच्या मनांत उत्पन्न झाली असेल यांत शंका नाहीं.

सांस्कृतिक विकासाला जोराची चालना देणारी दुसरी संस्था म्हणजे *लाल सेना* ( *Red Army* ). या सेनेंत दाखल होणाऱ्या शेतकरी कामगारांना प्रथम साक्षर केलें जाई आणि नंतर अधिकाधिक शैक्षणिक विकास व्हावा या हेतूनें प्रयत्न केले जात. त्यांना दुय्यम शिक्षणाच्या दर्जाचें शिक्षण मिळेल अशा प्रकारें त्यांचा शिक्षणक्रम आंखला जात असे. आतां तर सर्वच नवीन सैनिकांना दुय्यम शिक्षण मिळालेलें असतें. लाल सेनेच्या सैनिकांना सध्यां एखादी तरी परकीय भाषा शिकावी लागते. बहुसंख्य सैनिक इंग्रजी शिकतात ! लाल सेनेचीं स्वतांचीं वर्तमानपत्रें व नियतकालिकें असून त्यांच्यासाठीं शालेय शिक्षणाचे व विश्वविद्यालयीन शिक्षणाचे खास सायंकालीन

वर्ग चालविण्यांत येतात. त्यांचे खास क्लब असतात आणि तेथें इतर क्लबांप्रमाणें सर्व सोयी असतातच; शिवाय लष्करी शिक्षणासाठीं सैन्यविषयक वस्तूंचें (शस्त्रास्त्रें, नकाशे, आराखडे इत्यादि) प्रदर्शन असतें. लाल सेनेच्या सैनिकांना वाचनाचा अतिशय शौक आहे आणि त्यांची वाङ्मय विषयाची आवड सर्वश्रुत आहे. परवांच संपलेल्या युद्धांत आघाडीवरील सैनिकांकडून निरनिराळ्या साहित्यविषयक ग्रंथांची मोठी मागणी येत असे. जगांतील सर्वांत सुसंस्कृत सेना अशी लाल सेनेची ख्याती आहे. लाल सेना व इतर देशांतील सेना यांमधील हा फरक लक्षांत घेण्यासारखा आहे. हे लाल सेनेंतील सैनिक लष्करी शिक्षणाचा काल संपवून खेडयांत परतल्यावर खेडयांच्या सांस्कृतिक विकासासाठीं त्यांचा किती उपयोग होत असेल याची कोणालाही सहज कल्पना करतां येईल.

सांस्कृतिक विकासाचीं प्रमुख साधनें व संस्था यांची विशेष माहिती पुढें दिली आहे. *या सर्व संस्था शिक्षणखात्याच्या कक्षेखालीं येतात*, या गोष्टीचा मुद्दाम उल्लेख करणें आवश्यक आहे.

## १ क्लब आणि संस्कृति उद्यानें (*Parks of Culture & Rest*)

फुरसतीचा वेळ गंमतीनें घालविण्याची जागा म्हणजे क्लब. कांहीं कारखाने मिळून अथवा क्वचित् मोठया कारखान्याच्या वतीनें क्लब चालविण्यांत येतात; तसेंच सामुदायिक शेत अगर उद्योगकेंद्र अथवा इतरत्रहि क्लब चालविण्यांत आले आहेत, हें आपण पाहिलेंच आहे. या क्लबांत ग्रंथालय, वाचनालय, सभागृह, अभ्यासमंडळाचे वर्ग घेतां येतील अशा खोल्या, इत्यादि सोयी असून शिवाय करमणुकीचीं साधनें असतात. कित्येक मोठया क्लबांत सिनेमागृह, रंगभूमि, स्केटिंगची जागा आणि नृत्यालयही असतें. क्लबातर्फे शैक्षणिक विकासासाठीं निरनिराळे अभ्यासवर्ग चालतात. शिवाय ज्या सभासदांस संगीत, चित्रकला, नृत्य इत्यादि कलांमध्यें प्रावीण्य मिळवावें असें वाटत असेल ते कलामंडळें चालवितात. अशाप्रकारचीं १ लक्षांहून अधिक कलामंडळें सोविएत देशांत (सन १९४०) चाललेलीं असून सुमारें ५० लक्ष स्त्रीपुरुष त्यांमध्यें भाग घेत आहेत. या मंडळांतर्फे केवळ कलांचा अभ्यास करण्यांत येतो असें नव्हे, तर निरनिराळ्या कलावंतांच्या कलाकृतींवर टीकाही होते.

कधींकधीं नामवंत कलावंत या मंडळांस भेट देऊन सभासदांशीं चर्चा करतात व कलाविषयक माहिती देऊन मार्गदर्शन करतात. तर कधींकधीं हीं कलामंडळें स्वतांच करमणुकींचे कार्यक्रम करून दाखवितात. सोविएत देशांत कला ही अल्पसंख्य लोकाची मिरास राहिलेली नसून ती आतां आम जनतेपुढें सन्मुख उभी राहिली आहे. क्लबातर्फे वाङ्‌मयमंडळ चालविलेलें असतें आणि मंडळातर्फे भिंतपत्रिका प्रसिद्ध करण्यांत येते. निरनिराळ्या साहित्यिकांच्या वाङ्मयाचा अभ्यास व परामर्ष घेतला जातो आणि सभासदांकडून निरनिराळे वाङ्मयप्रकार स्वतां हाताळले जातात. खेळाडू सभासदांसाठीं निरनिराळे बैठे व इतर खेळ खेळण्याची सोय असते. कांहीं ठिकाणीं व्यायामशाळा व क्रीडांगणें असतात. क्लबाला जोडून उपाहारगृह चालविलेलें असतें आणि स्त्रीपुरुषांना क्लबांचा उपभोग निर्वेधपणें घेतां यावा या हेतूनें कांहीं प्रौढांच्या क्लबाला जोडून शिशुगृहें ( *Créche* ) आणि लहान मुलांचे क्लब यांची सोय करण्यांत आली आहे.

झारशाहींत क्लब ही संस्था धनिक वर्ग, सरकारी अधिकारी आणि मध्यम वर्ग ( डॉक्टर, इंजिनियर वगैरे ) या उच्चवर्गीय लोकांसाठींच होती. आपल्याकडील जिल्ह्याच्या अथवा तालुक्याच्या ठिकाणीं असलेले क्लब पाहिले तर हीच परिस्थिति दिसते. उलट सोविएत देशांत क्लबाचा उपभोग लक्षावधी कामगार, शेतकरी आणि बुद्धिजीवि लोक घेत आहेत. खालील आंकडे पाहा.

क्लबांची संख्या

| | |
|---|---|
| १९१४ साल | २२२ |
| १९३९ ,, | १,११,००० |

यांतील ८८,००० क्लब खेडयांत आहेत, ही गोष्ट विशेष आहे.

मोठया शहरांत आणि कांहीं खेडयांत आतां *“संस्कृति उद्यानें”* ( *Parks & Palaces of Culture* ) नांवाच्या संस्था उघडण्यांत आल्या आहेत. यांपैकीं कांहीं खरोखरीच जुन्या काळच्या राजवाड्यांमध्यें वसविलेलीं आहेत. या

उद्यानांत, क्लबांतील निरनिराळ्या सोयी फारच मोठ्या प्रमाणावर उपलब्ध असतात. उदाहरणार्थ मॉस्को शहरांतील *गॉर्की संस्कृति उद्यान* घेऊं. हें उद्यान मॉस्को नदीच्या तीरावर चार साडेचार मैल पसरलें आहे आणि येथील सुखसोयींचा लाभ रोज सुमारें साठ सत्तर हजार स्त्रीपुरुष घेतात. सुट्टीच्या दिवशीं २½ ते ३ लक्ष लोक या ठिकाणीं येतात. या उद्यानांत सहा नाट्यगृहें, सर्कस, कित्येक सिनेमागृहें यांचा समावेश असून अनेक उपाहारगृहें चालविण्यांत आलीं आहेत. येथील व्यवस्थेचें व कार्यक्रमाचें विस्तृत वर्णन ( मनोरंजक असलें तरी सुद्धां ) या पुस्तकांत देणें अशक्य आहे. फक्त एका गोष्टीचा उल्लेख करणें योग्य होईल. या उद्यानांत एक "*मुलांचें गांव*" ( *Children's Village* ) वसविण्यांत आलें असून हें गांव म्हणजे एक मोठा थोरला मुलांचा क्लब, संस्कृति मंदिर ( *Pioneer Palace* ), आहे. तसेंच शाळकरी मुलांहून लहान वयांच्या छोट्या बालकांकरतांही एक "*शिशुनगर*" ( *Tiny Tots' Town* ) वसविण्यांत आलें आहे.

अशा प्रकारचीं, पण याहून लहान असलेलीं, १० उद्यानें मॉस्को शहरांत आहेत आणि शहराच्या परिसरांत आणखी २८ उद्यानें आहेत ! १९३८ सालीं एकूण ६०० हून अधिक "संस्कृति उद्यानें" सोविएत देशांत होतीं !

जरूर असल्यास उपचारासाठीं आणि प्रकृति सुधारण्यासाठीं कामगार, शेतकरी व इतर प्रौढ स्त्रीपुरुष यांची थोडक्या खर्चांत आरोग्यालयांत ( *Sanatoria* ) अथवा हवेच्या ठिकाणीं ( *Health Resorts* ) जाऊन राहाण्याची सोय केली जाते. तसेंच सुट्टीचे दिवस एकाद्या विश्रांतिस्थानीं ( *Rest Homes* ) घालवून विश्रांति घेतां येते. या सर्व सोयी निसर्गरम्य स्थानीं वसविलेल्या असून त्या सर्व समाजाच्या मालकीच्या असतात आणि त्याचा उपभोग लक्षावधी लोकांस घेतां येतो. तसेंच एकदोन दिवस विसावा घेण्याची व्यवस्थाहि होऊं शकते. या सर्व ठिकाणीं उत्तम तऱ्हेनें वेळ घालविण्याची आणि सांस्कृतिक विकासाची सोय असते; शिवाय वैद्यकीय देखरेखहि असते. १९३९ सालीं सुमारें १५ लक्ष कामगार स्त्रीपुरुषांनीं कामगार संघाच्या खर्चानें विश्रांतिस्थानांचा ( *Rest Homes* ) उपभोग घेतला.

सोविएत देशांत निरनिराळ्या मर्दानी खेळांची आवड सर्व समाजांत वाढत आहे.

खास वर्तमानपत्रें आहेत. बालवाचकांसाठीं वेगळीं वर्तमानपत्रें छापलीं जातात. औद्योगिक केंद्रांच्या वर्तमानपत्रांचा खप बराच मोठा असतो आणि मुलांच्या वर्तमानपत्रांपैकीं प्रमुख दैनिकाचा खप ९ लक्ष आहे ! १९३९ सालीं सोविएत देशांतील वेगवेगळ्या प्रदेशांतील स्थानिक वर्तमानपत्रांची संख्या ३९९३ इतकी होती आणि त्यांच्या ग्राहकांची संख्या ६० लक्ष होती. एकूण १८८० मासिकें व इतर नियतकालिकें १९३९ सालीं प्रसिद्ध होत असत आणि त्यांचे ४५ कोटि अंक प्रतिवर्षी विकले जात होते. निरनिराळ्या ७० भाषांत हीं नियतकालिकें प्रसिद्ध होत असतात.

वर्तमानपत्रांसंबंधीं दोन विशेष उल्लेखनीय आहेत. यांपैकीं एकाची, खेड्यांतील बातमीदारांची, माहिती अन्यत्र देण्यांत आली आहेच. दुसरा महत्त्वाचा विशेष म्हणजे "*प्रवासी*" *वर्तमानपत्रें* ( *Travelling Newspapers* ). खेडयांत लावणी कापणीचा हंगाम सुरू असतांना एक लहानसा छापखाना मोटारीवर चढवून एखाद्या वर्तमानपत्राची प्रवासी आवृत्ति शेतावरच छापण्याची व्यवस्था होते. या आवृत्तींत हवामान, पाऊसपाणी, पिकाचें मान, निरनिराळ्या शेतांमधील समाजवादी चढाओढी इत्यादि शेतकऱ्यांना उपयोगी असणारीं आणि त्यांनीं स्वतां लिहिलेलीं बातमीपत्रें छापण्यांत येतात. तसेंच नभोवाणीच्या साहाय्यानें ऐकलेल्या देशी व परदेशी बातम्यांचा गोषवाराही त्यांमध्यें देण्यांत येतो.

आतां पुस्तकप्रकाशनाकडे वळूं. एकूण पुस्तकें कितीं प्रसिद्ध झालीं व त्यांचा खप किती झाला यासंबंधींचे आंकडे पुढें दिले आहेत.

पुस्तक प्रकाशन व खप

| प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांची संख्या | | प्रतींची संख्या | |
|---|---|---|---|
| सन १९१३ | २६,२०० | सन १९१३ | ८,६० लक्ष |
| ,, १९३९ | ४३,३४० * | ,, १९३९ | ७०,१० लक्ष |
| | { ११,६९६ रशियनेतर भाषांत } | | ( आठपटीहून अधिक ) |

* अमेरिकेंत याच वर्षी १२,४३६ पुस्तकें छापलीं गेलीं.

१९३९ मध्यें छापण्यांत आलेल्या ७०·१ कोटि प्रतीपैकीं ११·७ कोटि प्रती रशियनशिवाय इतर ११० भाषांत छापलेल्या होत्या. जगांतील इतर कोणत्याहीं देशापेक्षां सोविएत यूनियनमध्यें अधिक पुस्तकें छापलीं जातात. †

मॉस्कोमधील आंतरराष्ट्रीय ग्रंथप्रकाशन संस्था या एकाच प्रकाशन संस्थेकडून निरनिराळ्या ८५ भाषांत पुस्तकें प्रसिद्ध होतात. आणि त्यांमध्यें पऱ्यांच्या गोष्टींपासून तत्त्वज्ञानावरील गहन ग्रंथांपावेतों, सर्व प्रकारच्या पुस्तकांचा समावेश होतो.

प्रकाशनाचा हा एवढा प्रचंड व्याप असला तरी नवें पुस्तक प्रसिद्ध होतांक्षणीं कधींकधीं ग्रंथविक्रेत्याच्या दुकानीं ग्राहकांच्या रांगा लागतात ! मॉक्रोमधील एका पुस्तकाच्या दुकानांतून टॉल्स्टॉयकृत *Resurrection* कादंबरीच्या १००० नव्या प्रती एका दिवसांत उडाल्या आणि पुश्किनच्या समग्र ग्रंथांच्या आवृत्तीच्या ६१० प्रती अवघ्या तीन तासांत खलास झाल्या ! वाचनाची किती विलक्षण आवड आहे ही !

सोविएत वाचकांना कोणतीं पुस्तकें आवडतात ? *गॉर्की, पुश्किन, टॉल्स्टॉय, तर्जेनेव,* या जुन्या रशियन साहित्यिकांच्या वाङ्मयाला मोठी मागणी असते. सन १९३७ पर्यंतच्या २० वर्षांत गॉर्कीच्या पुस्तकांच्या ३·२ कोटि प्रती विकल्या गेल्या. पुश्किन हा सोविएत जनतेचा लाडका ग्रंथकार आहे; त्याच्या पुस्तकांच्या सुमारें २ कोटि प्रती या वीस वर्षांत छापण्यांत आल्या. १९३७-३८ या वर्षी पुश्किनचा, शताब्दि समारंभ होता. त्या वर्षी त्याच्या ग्रंथाच्या १·३४ कोटि प्रतींना मागणीं आली ! गॉर्कीच्या ग्रंथांचे सोविएत देशांतील निरनिराळ्या ६५ भाषांत अनुवाद झाले आहेत तर पुश्किनच्या ग्रंथांचें ७२ भाषांत अनुवाद प्रसिद्ध झाले आहेत. "*रोटी*" ( *Bread* ) ही कादंबरी लिहिणारा अलेक्सी टॉल्स्टॉय आणि डॉन नदीच्या पार्श्वभूमीवर क्रांतिपूर्व व क्रांतीनंतरचें जीवन रेखाटणारा शोलोकोव, तसेंच इलिया इऱ्हेनबुर्ग हे अलीकडच्या काळांतील साहित्यिक विशेष लोकप्रिय आहेत. १९३५ ते ३८ या तीन वर्षांत अलेक्सी टॉल्स्टॉय् व शोलोकोव यांच्या ग्रंथांच्या

† १९३२ सालीं निरनिराळ्या ५५,००० पुस्तकांच्या ५० कोटि प्रती प्रसिद्ध झाल्या आणि वेब पतिपत्नींच्या मतें पुस्तकांची ही संख्या जगांतील इतर सर्व देशांत त्या वर्षी छापण्यांत आलेल्या पुस्तकांच्य संख्येपेक्षां अधिक असावी ! कँटरबरीचे डीन यांचा अंदाज, ही संख्या ब्रिटन, फ्रान्स व जर्मनी यांमध्यें प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांपेक्षां अधिक असावी असा आहे.

प्रत्येकी २६ लक्ष प्रती प्रसिद्ध झाल्या. हिंदी साहित्यिकांच्या ग्रंथांच्या आवृत्ती फार तर कांहीं हजारांपर्यंतच पोंचूं शकतात. पण पाश्चात्य साहित्यिकांपैकीं तरी कितीजणांच्या वांट्याला हें भाग्य येत असेल याबद्दल शंकाच आहे ! तरी त्यांपैकीं अनेकांनीं असंस्कृत जनतेच्या हीन भावनांना उत्तेजित करणारें शृंगारिक वाङ्मय लिहिलेलें असतें ती गोष्ट वेगळीच !

यंत्रविद्येवरील तांत्रिक पुस्तकांना सोविएत देशांत अतिशय मागणी असते. पण प्रो. आयन्स्टाइन या जगप्रसिद्ध गणितज्ञाच्या गणितशास्त्रीय ग्रंथांच्या देखील ५५,००० प्रती सन १९२७–३६ या नऊ वर्षांत संपल्या, हीं घटना विचारांत घेण्यासारखी आहे. नाझी जर्मनींत त्याच्या ग्रंथांना मज्जावच होता पण इंग्लंडमध्यें सुद्धां आयन्स्टाइनचे ग्रंथ हजारांनीं विकत घेतले जात नाहींत.

राजकारणावरील पुस्तकांचा सर्वांत मोठा खप असतो. मार्क्सवाद, लेनिनवाद यांवरील पुस्तकांचा खप पाहून मन आश्चर्यानें थक्क होतें. सन १९१७–४१ या पंचवीस वर्षांच्या काळांत यावरील ८००० ग्रंथांच्या ७२ कोटि प्रतींना मागणी आली ! यांमधील निम्म्याहून अधिक ग्रंथांचे रशियनेतर सोविएत भाषांत अनुवाद झाले आणि या अनुवादांच्या १२ कोटि प्रती संपल्या !

संगीत, कला, वाङ्मय यांमध्यें सोविएत जनतेला राष्ट्रांराष्ट्रांच्या सीमा आडव्या येत नाहींत. सर्व देशांतील उत्तमोत्तम वाङ्मयाचे ते खरे उपासक आहेत. शेक्सपियर, गटे, बाल्झाक, शिलेर हे सर्व श्रेष्ठ साहित्यिक सोविएत जनतेनें आपलेसे केले आहेत. शेक्सपियर तर त्यांचा अत्यंत आवडता नाटककार आहे. शेक्सपियरला स्वतांच्या मातृभूमींत ( इंग्लंडांत ) इतका मान व लोकप्रियता क्वचितच लाभली असेल. सर्व नाट्यसंस्था, हजारों हौशी नाटयमंडळें त्याच्या नाटकांचे प्रवेश करतात. १९३७ सालीं मॉस्को येथें " राजा लियर " या नाटकाचा प्रयोग झाला, त्या दोनतीन महिन्यांत दोन लक्षांहून अधिक प्रेक्षक तें नाटक पाहून गेले. " रोमियो व ज्यूलियेट " या नाटकाचे लागोपाठ दोन वर्षांत २०० प्रयोग झाले. काझाकिस्तान, बष्किरिया या दूरदूरच्या देशांत शेक्सपियरच्या नाटकाचे देशभाषांत प्रयोग होतात. १९४५ सालीं जाऊन आलेल्या मि. जॅान पार्कर ( पार्लमेंटांतील लेबर पक्षाचे सभासद ) या गृहस्थानीं ताशकंद येथें उज्बेकी भाषेंत " ऑथेलो " नाटकाचा सुंदर प्रयोग पाहिल्याचें

नमूद केलें आहे. आर्मीनिया या चिमकुल्या राष्ट्राची लोकसंख्या अवघी १३ लक्ष (सातारा जिल्ह्याएवढी) आहे. पण त्या देशांत १९३२ ते ३७ या पांच वर्षांत शेक्सपियरच्या नाटकांच्या ३२,००० प्रती खपल्या! खुद्द इंग्लंडमध्यें शेक्सपियरच्या ३२५ व्या जन्मदिनाची (१९४२ सालीं) कोणी दखल घेतली नाहीं; पण सोविएत देशांत हा जन्मदिनोत्सव, एक आठवडाभर साजरा करण्यांत आला. वर्तमानपत्रें, नियतकालिकें, मासिकें यांनीं त्यानिमित खास लेख लिहिले; नभोवाणी केंद्रांवर खास कार्यक्रम झाले; शेक्सपियरच्या ग्रंथांच्या नव्या आवृत्ती निघाल्या; आणि देशभर ८०० हून अधिक नाटयगृहांत त्याच्या नाटकांचे प्रयोग झाले!

डिकन्स, हेमिंगवे, सिंक्लेअर, मोपांसा, व्हिक्टर ह्यूगो, वेल्स, फ्रँक नॉरिस, हायनूरिक मान, लियाँ फॉक्टवांगेर इत्यादि अनेक साहित्यिकांच्या ग्रंथांचे अनुवाद प्रसिद्ध झाले आहेत. डिकन्सच्या ग्रंथांच्या एकोणीस वर्षांत ११ लक्ष प्रती खपल्या, इंग्लंडमध्यें सुद्धां इतक्या खपल्या नाहींत; आणि ह्यूगोच्या १८ लक्ष प्रतींना मागणी आली, खुद्द फ्रान्समध्यें एवढी मागणी आली नाहीं. कविवर्य रविंद्रनाथ टागोर, मुन्शी प्रेमचंद, मुल्कराज आनंद, या सुप्रसिद्ध हिंदी कथालेखकांच्या कलाकृती, तसेंच तुलसीदासाचें रामायण, यांचीं भाषांतरें सोविएत भाषांत प्रसिद्ध झालीं आहेत. मुल्कराज आनंद यांच्या कांदबऱ्यांच्या ३० लक्षांहून अधिक प्रती तेथें खपल्या असें म्हणतात. त्यांच्या मायभूमींत हें भाग्य त्यांना कधीं लाभेल कोणास ठाऊक!

बालवाचकांसाठीं खास पुस्तकें अनेक भाषांत प्रसिद्ध होतात. १९३७ सालीं या पुस्तकांच्या ६½ कोटीहून अधिक प्रती विकल्या गेल्या. सॅम्यूएल मार्शाक हा मुलांचा अतिशय आवडता लेखक आहे. त्याच्या पुस्तकांचें ४१ भाषांत अनुवाद झाले आहेत आणि १९३५ ते ३८ या तीन वर्षांत त्यांच्या पाऊण कोट प्रतींना मागणी आली होती.

## ४ पदार्थवस्तुसंग्रहालयें, अजबखाने, प्रदर्शनें आणि चित्रसंग्रह.

### (*Museums, Picture Galleries, Exhibitions.*)

या क्षेत्रांत सोविएत यूनियनमध्यें गेल्या वीस वर्षांत जितके परिश्रम घेण्यांत

आले तेवढे दुसऱ्या कोणल्याही देशांत एवढ्या अल्पावधींत कधींच घेतलेले नसतील. पुढील आंकडे पहा.

म्युझियमची संख्या

| | |
|---|---|
| साल १९१४ | संख्या १८० |
| ,, १९३९ | ,, ८०० |

या ८०० पैकीं ऐतिहासिक वस्तूंचीं १२६, यांत्रिक विषयांचीं ७१, सृष्टिज्ञान विषयक ४४, कलाविषयक ६६, आरोग्यविषयक ३८ आणि प्रादेशिक वैशिष्ट्य असलेलीं सुमारें ४०० म्यूझियम आहेत.

सोविएत देशांतील वस्तुसंग्रहालयें व प्रदर्शनें याविषयीं विशेष ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं त्यांचा लोकशिक्षणासाठीं फार मोठ्या प्रमाणावर उपयोग केला जातो. प्रवेश मोफत असतो अथवा फी असलीच तर ती अगदीं थोडी असते. तज्ज्ञ मार्गदर्शकांच्या नेतृत्वाखालीं हीं प्रदर्शनें दाखविण्याची व्यवस्था केलेली असते; व तीं पाहाण्यासाठीं मुलें, विद्यार्थी, सैनिक, कामगार, शेतकरी यांचे थवेच्या थवे लोटतात. याशिवाय आरोग्य कसें राखावें, गरोदरपणीं व प्रसूतीनंतर आयांनीं स्वतांची व मुलांची काळजी कशी घ्यावी आणि बालसंगोपनाचें कार्य किती महत्त्वाचें आहे, हें बिंबविण्यासाठीं आरोग्य खात्यातर्फे आणि माताबालकसंरक्षण संस्थेतर्फे ( *Institute for the Protection of Mother & Child* ) अनेक वेळां अनेक ठिकाणीं प्रदर्शनें भरविण्यांत येतात.

## ५ सिनेमा व चित्रपट.

सिनेमागृहांची वाढ कशी होत गेली हें पुढील आंकड्यांवरून दिसतें.

सिनेमांची संख्या

| साल | १९१४ | १९२८ | १९३४ | १९३८ |
|---|---|---|---|---|
| संख्या | १४१२ | ७२७१ | २५,२९३ | ३०,४०४ |

या ३०,००० सिनेमांपैकीं १९,००० खेडयांत आहेत. बहुतेक सर्व ठिकाणीं आतां बोलके चित्रपट दाखवितात. हे बोलपट निरनिराळ्या राष्ट्रभाषांत काढण्यांत येतात. परदेशी चित्रपटांपैकीं चार्ली चॅपलीनचे चित्रपट विशेष लोकप्रिय झाले आहेत. सोविएत देशांत कांहीं जगप्रसिद्ध बोलपट दहा कोटीहून अधिक प्रेक्षकांनीं पाहिले आहेत !

कला व तंत्र या दोन्ही बाबतींत सोविएत बोलपट उच्च दर्जाचे असतात हें आतां सर्वांस माहीत झालें आहे. पुदोवकिन हा जगप्रसिद्ध सिनेमा दिग्दर्शक रशियन आहे. "अलेक्झांडर नेव्स्की" "जनरल सुवोरोव" "गॉर्कीचें जीवन" "देशभक्तीची कसोटी" ( *She Defends Her Country* ) इत्यादि सोविएत बोलपट जगांत सर्वत्र नांवाजण्यांत आले आहेत.

बोलपटांतील अभिनय आणि सिनेमाशास्त्र शिकविण्यासाठीं स्वतंत्र कलाकॉलेजें आहेत. नवीन बोलपट निघावयाचा झाला कीं त्या बोलपटांत निरनिराळ्या भूमिका करणाऱ्या नटनटींना अनेक स्त्रीपुरुष आपल्या सूचना पाठवितात. एका सोविएत अभिनेत्रीला कारखान्यांतील कामगार स्त्रीची भूमिका करावयाची होती. तिला हजारों स्त्री कामगारांकडून भूमिका कशी वठवावी याचा सल्ला देणारीं पत्रें आलीं ! सामान्य जनता आतां कलाक्षेत्रांत लक्ष घालूं लागली आहे आणि तिचें या क्षेत्रांतहि कांहीं विशिष्ट म्हणणें आहे, याचें वरील उदाहरण द्योतक आहे. शैक्षणिक विकासा-साठीं बोलपटांचा फार मोठा उपयोग करण्यांत येतो. शैक्षणिक बोलपट काढण्यासाठीं वेगळ्या संस्था आहेत; आणि त्यांच्याकडून खास शैक्षणिक बोलपट तयार केले जातात.

## ६ रंगभूमि, ऑपेरा, बॅले (नृत्य) व संगीत.

या कलाक्षेत्रांत रशियन कलावंत झारशाहीच्या काळापासून अतिशय उच्च प्रतीचे म्हणून जगप्रसिद्ध आहेत. सोविएत अमदानींत हा नांवलौकिक उत्तम प्रकारें कायम राखण्यांत आला आहे. पूर्वीं या कलाक्षेत्रांचा आस्वाद फक्त अल्पसंख्य धनिक व मध्यमवर्ग यांना मिळत असे. आतां बहुसंख्य जनतेला या कलानंदाचा

उपभोग घेतां येत आहे ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. सोविएत देशांत नाटय-गृहांच्या संख्येंत किती वाढ झाली हें दाखविण्यासाठीं पुढील आंकडे दिले आहेत.

नाटयगृहांची संख्या

| साल | १९१३ | १९४० |
|---|---|---|
| संख्या | १५३ | ८२५ |

यांतील १७३ नाटयगृहें खास मुलांसाठीं आहेत आणि २७६ नाटयगृहें सामुदायिक शेतांच्या केंद्रांवर आहेत. पूर्वी रंगभूमि कलेच्या दृष्टीनें उच्च प्रतीची असली तरी बहुतेक नाटयगृहें मॉस्को आणि पेत्रोग्राद ( सध्यांचें लेनिनग्राद ) या राजधान्यांच्या शहरांत केंद्रित झालेलीं होतीं. आतां सर्व देशभर नाटयगृहांच्या संख्येंत वाढ झाली असून निरनिराळया ४७ भाषांत नाटकांचे प्रयोग होतात. ऑपेरा आणि कळसूत्री बाहुल्यांचीं नाटकें ( *Puppet Theatre* ) हे नाट्यविशेषही अतिशय लोकप्रिय आहेत.

रंगभूमीला समाजांत किती मान आहे आणि समाजाकडून तिची किती काळजी घेतली जाते याची कल्पना रंगभूमीचें पद्धतशीर शिक्षण देण्यासाठीं निघालेल्या नाटयशिक्षणाच्या संस्थांवरून येते. १९१३ सालीं नाटयशिक्षणासाठीं फक्त ३ शाळा असून त्यांमध्यें ३०–४० विद्यार्थी शिकत असत. उलट १९३८ सालीं नाटयशिक्षणाचीं दोन कॉलेजें आणि ४४ शाळा होत्या आणि त्यांमध्यें ४००० विद्यार्थी शिकत होते. सोविएत जनतेला रंगभूमीची किती विलक्षण आवड आहे याची प्रतीति क्लबाक्लबांतून चालविण्यांत येणाऱ्या हौशी नाटयमंडळांच्या संख्येवरून येते. १९३९ सालीं केवळ सामुदायिक शेतांवर २१ हजार नाटयमंडळें चालविण्यांत येत होतीं आणि त्यांमध्यें ३½ लक्ष स्त्रीपुरुष भाग घेत होते. बॅले हा नृत्यप्रकार सोविएत देशांत अतिशय लोकप्रिय आहे. मॉस्कोमधील मध्यवर्ति " संस्कृति उद्यानांत " (*Park of Culture*, ज्याचा उल्लेख वर आला आहे ) बॅलेसाठीं जी रंगभूमि आहे तेथें २०,००० प्रेक्षकांची बसण्याची सोय करण्यांत आली आहे.

सोविएत समाजांत संगीताची आवड झपाट्यानें वाढत आहे. रेडियो आणि ग्रामोफोन यांना प्रचंड मागणी येते. रशियन संगीतज्ञ जगप्रसिद्धच आहेत. परंतु हौशी संगीतमंडळें स्थापून आतां सामान्य बहुजनसमाज बीथोवेन, मोझार्त, बाख या अभिजात कलावंतांच्या कलाकृतींचा अभ्यास करूं लागला आहे. निरनिराळ्या सोविएत राष्ट्रांतील प्रादेशिक संगीत, नाटयप्रकार आणि नृत्यप्रकार नीट जतन करून त्यांचा विकास केला जात आहे, आणि अशा रीतीनें संस्कृतीचा एक नवा फुलोरा सोविएत देशांत प्रकट होत आहे.

# मागासलेलीं राष्ट्रें आणि अल्पसंख्याक १२

सोविएत देशांत गेल्या पंचवीस वर्षांत झालेली शैक्षणिक प्रगति व सांस्कृतिक विकास यांची माहिती आतांपावेतों देण्यांत आली आहे. परंतु सोविएत यूनियन हें एकजिनसी सलंग राष्ट्र नसून तो खंडप्राय देश आहे; आणि अनेक स्वतंत्र राष्ट्रें, स्वायत्त राष्ट्रें आणि अल्पसंख्याकांचे लोकसमूह मिळून हा सोविएत देश बनला आहे. रशिया हें यांमधील सर्वांत मोठें राष्ट्र असून इतर राष्ट्रें व लोकसमूह रशियाच्या मानानें लहान आहेत. झारशाहींत रशिया हें साम्राज्यवादी आणि म्हणून सर्वांत सुधारलेलें राष्ट्र होतें. बाकीचीं राष्ट्रें रशियन साम्राज्यशाहीचीं गुलाम आणि म्हणून मागासलेलीं होतीं. गेल्या पंचवीस वर्षांत जी प्रगति झाली तिचे परिणाम अर्थातच पूर्वीं साम्राज्यशाहीच्या जुलुमाखालीं भरडल्या जाणाऱ्या पण क्रांतीनंतर स्वतंत्र झालेल्या राष्ट्रांत कितीतरी अधिक पटीनें दृष्टोत्पत्तीस येतात. एकंदर सोविएत देशाच्या शैक्षणिक विकासाचें जें सर्वसाधारण चित्र आतांपर्यंत आपण पाहिलें त्यावरून या गोष्टीची नीट कल्पना येत नाहीं. म्हणून या प्रकरणांत या राष्ट्रांनीं केलेल्या प्रगतीकडे विशेष लक्ष वेधण्याचें योजिलें आहे.

झारशाही रशियन साम्राज्यांत सुमारें १५० निरनिराळ्या भाषा बोलणारे रशियनेतर लोकसमूह होते; आणि ते सुधारणेच्या निरनिराळ्या अवस्थांप्रत पोंचलेले होते. परंतु रशियाइतकेच सुधारलेले यूक्रेन व श्वेतरशिया ( ब्येलोरशिया ) हे देश घ्या कीं अतिशय मागासलेले अतिपूर्वेकडील, सायबेरियाच्या पासिफिक टोंकाकडील, याकूत लोक घ्या, त्या सर्वांच्या बाबतींत साम्राज्यशाही धोरण एकच होतें. कोणाही जमातीला आपल्या भाषेंतून शिक्षण घेण्याची सोय व परवानगी नव्हती. आर्थिक, सामाजिक, राजकीय या क्षेत्रांत जसें रशियनांचें साम्राज्यवादी वर्चस्व होतें तशीच गोष्ट भाषा, वाङ्मय व प्रादेशिक संस्कृति याविषयींही होती. रशियांमधील तार्तेरी प्रांतांतील काझान विद्यापीठांत शिक्षण रशियन भाषेंतून मिळे आणि विद्यार्थ्यांमध्यें तार्तेर तरूण क्वचितच दिसत. पोलंडमध्यें खुद्द राजधानीच्या वॉरसा शहरांत जें विश्वविद्यालय होतें तेथें रशियन भाषेंतून शिकविण्यांत येई. तीच स्थिति यूक्रेनची. पोलिश व यूक्रेनियन या भाषा या काळींही समृद्ध होत्या हें येथें ध्यानांत ठेवलें पाहिजे. श्वेतरशियांत क्रांतीपूर्वी ३००० ग्रीक चर्चे, ७०४ ज्यू लोकांचीं प्रार्थनामंदिरें आणि ११३ कॅथालिक चर्चे होते पण कॉलेज मात्र एकही नव्हतें ! ही झाली त्यांतल्या त्यांत सुधारलेल्या राष्ट्रांची परिस्थिति. मध्य आशियांतील व रशियाच्या दक्षिणेकडील मागासलेल्या मुस्लिम राष्ट्रांतील परिस्थिति याहून खूपच वाईट होती.

अंकित राष्ट्रांची संस्कृति व भाषा यांना दडपून टाकलें पाहिजे; त्यांची संस्कृति रशियनांच्या मानानें अतिशय हलक्या दर्जाची आहे; शाळा फक्त रशियन भाषेंतूनच चालल्या पाहिजेत; हा रशियन साम्राज्यवाद्यांच्या धोरणाचा मथितार्थ होता, आणि हें धोरण सक्तीनें सर्वत्र अंमलांत आणलें जात असे. फक्त धार्मिक शिक्षण देणाऱ्या शाळांत, कांहीं थोडया मुल्लामौलवींच्या अगर धर्मगुरूंच्या मुलांना, स्वभाषेमधून शिक्षण मिळत असे. रशियन भाषेंतून शिकविणाऱ्या शाळांची सोयही अतिशय तुटपुंजी होती. या शाळांचा उपयोग फक्त रशियन अधिकारी वर्ग, रशियन व्यापारी आणि रशियन कारखानदार यांच्याच मुलांना होत असे. खुद्द रशियामध्यें रशियन मुलांच्या शिक्षणाची जी सोय होती त्यापेक्षां साम्राज्यांतील रशियन मुलांच्या शिक्षणाची सोय कितीतरी अधिक चांगली होती ! १९१२ सालीं शाळकरी वयाचीं किती मुलें शिकत होतीं याचे पुढील आंकडे पाहा. हे सर्व आंकडे मध्य आशिया आणि रशियाच्या दक्षिणेकडील राष्ट्रांविषयींचे आहेत.

शाळेंत जाणाऱ्या मुलांचें शाळकरी वयाच्या मुलांशीं शेंकडा प्रमाण

| प्रांत | तद्देशीय | रशियन* |
|---|---|---|
| सरदारिया प्रांत | शेंकडा २ | शेंकडा ९५·८ |
| समरकंद ,, | ,, ०·९ | ,, ८७·५ |
| फरगाणा ,, | ,, ०·९ | ,, ७६·४ |
| ट्रान्सकास्पियन प्रांत. | ,, १·४ | ,, ८६·४ |

आपल्या देशांत युरोपियन व अँग्लोइंडियन मुलांच्या शिक्षणाची कशी खास व्यवस्था आहे हें सर्वांस माहीत आहेच.

अशा परिस्थितींत या गुलाम राष्ट्रांतील बहुसंख्य लोक निरक्षर होते यांत नवल नाहीं. रशियन लोकवस्ति धरूनहि *किरगीज, उझ्बेक* आणि *ताजिक* या देशांत १९१० सालीं साक्षरतेचें प्रमाण शेंकडा २ पासून ५ पर्यंत होतें. दर दोनशें किरगीझी लोकांपैकीं फक्त एकाला लिहितां वाचतां येत असे; शंभर काझाकी लोकांतून साधारणपणें एक साक्षर असे. बाकीच्यांची निशाणी डाव्या हाताचा आंगठा ! अनेक सामाजिक व धार्मिक रूढीमुळें स्त्रियांची परिस्थिति अधिकच वाईट होती. पामीर पर्वतालगतच्या गार्म प्रदेशांत ८२,००० स्त्रियांपैकीं फक्त सातांना लिहितां वाचतां येत होतें !

जी गोष्ट शिक्षणाची तीच गोष्ट वाङ्मय व संस्कृति यांचीही होती. राजकीय वर्तमानपत्रें कोणत्याच रशियनेतर भाषेंत चालवितां येत नसत. १५० भाषांपैकीं फक्त २८ भाषांत नाममात्र वाङ्मय होतें. बाकीच्यांना लिपीच नव्हती आणि या वाङ्मयाचें स्वरूप अतिशय प्रतिगामी होतें. कारण वाङ्मयाचा उद्देश संस्कृतीची जोपासना करण्याचा नसून जनतेचे दास्यबंध अधिकाधिक घट्ट करण्याचा होता. रशियनीकरण ( रशियन भाषा व संस्कृति लादणें ) या अधिकृत धोरणामागचा खरा उद्देश बहुसंख्य लोकांना अज्ञानांत ठेवून त्यांची सहज व सतत पिळणूक करतां यावी हाच होता यांत शंका नाहीं.

( * रशियामध्यें याचवेळीं हेंच प्रमाण
शेंकडा २५ हून अधिक नव्हतें ! )

नाटय, लोकगीतें, पोवाडे इत्यादि संस्कृतीच्या नैसर्गिक आविष्कारांना बंदी करण्यांत आली होती. यूक्रेनमधील शेवशेंको या लोकप्रिय शाहीराला यूक्रेनियन भाषेंतील त्याच्या स्वातंत्र्यगीतांबद्दल सैन्यांत भरती करून दूरदेशीं पाठविण्यांत आलें होतें. जॉर्जिया या राष्ट्राची संस्कृति फार पुरातन आहे; पण जॉर्जियन लोकांना आपलीं लोकगीतें जाहीरपणें म्हणण्याला परवानगी नव्हती. प्रादेशिक भाषेंत नाटकें लिहिण्यास व करण्यास बंदी होती. अशा रीतीनें गुलाम राष्ट्रांची भाषा, वाङ्मय आणि संस्कृती यांची झारशाहींत पद्धतशीरपणें गळचेपी करण्यांत येत असल्यामुळें रशियन साम्राज्याला "*राष्ट्रांचा तुरुंग*" (*Prison of Peoples*) असें नांव पडलें होतें.

क्रांतीनंतर स्थापन झालेल्या सोविएत सत्तेनें स्वीकारलेलें धोरण वरील धोरणाच्या अगदीं उलट होतें. सर्व राष्ट्रांना व अल्पसंख्याकांना समान हक्क हा या धोरणाचा पाया होता. सर्वांना आपल्या भाषेंतून शिकण्याचा ( रशियनांच्या बरोबरीनें शिकण्याचा ) समान हक्क आहे असें *लेनिन व लूनाचार्स्की* यांनीं आपल्या पहिल्या शिक्षण-विषयक घोषणेंत जाहीर केलें. सर्वांना आपली भाषा व संस्कृति यांचें संवर्धन करण्याचा समान हक्क आहे आणि तो बजावण्याची सर्वांस समान संधि मिळेल असें असंदिग्धपणें स्पष्ट करण्यांत आलें.

परंतु कायद्याबरोबरच, पूर्वी गुलाम असलेल्या या राष्ट्रांतील आर्थिक, सामाजिक आणि राजकीय परिस्थिति बदलल्यावांचून आणि प्रत्यक्ष शाळा कॉलेजें, वर्तमानपत्रें, पुस्तकें, ग्रंथालयें, नाटयगृहें इत्यादि सांस्कृतिक साधनें पुरविल्यावांचून या समान हक्काचा व्यवहारांत उपयोग होणें शक्य नव्हतें. म्हणून सर्व देशांची आर्थिक भरभराट होण्यासाठीं औद्योगीकरणाच्या योजना आंखण्यांत आल्या आणि त्याचबरोबर प्रत्येक *स्वतंत्र राष्ट्र* ( *Union Republic* ), *स्वायत्त राष्ट्र* ( *Autonomous Republic* ), *स्वायत्त प्रदेश* ( *Autonomous Region* ), आणि *अल्पसंख्यांकांचे लोकसमूह* ( *National Areas* ) यांमध्यें शक्य तितक्या लवकर तेथील मातृभाषेंतून शिक्षण मिळावें अशा प्रकारची योजना आंखण्यांत आली.

हे निरनिराळे लोकसमूह संस्कृतीच्या निरनिराळ्या अवस्थांत होते यांचा उल्लेख मागें

झाला आहे. यूक्रेन, श्वेतरशिया, जॉर्जिया इत्यादि देशांची भाषा, वाङ्मय व संस्कृति बरीच पुढारलेली होती. परंतु एकूण १५० भाषांमधील फक्त २८ भाषांनाच लिपि होती. बाकीच्यांना लिपि देण्यापासून सुरवात होती. यावरून हा प्रश्न किती बिकट होता हें ध्यानांत येईल. निरनिराळ्या प्रदेशांच्या निरनिराळ्या परिस्थितीला अनुरूप असे उपाय योजणें अर्थातच क्रमप्राप्त होतें. स्थूलमानानें पुढील धोरण ठेवण्यांत आलें. ( १ ) सायबेरियांतील विरळ लोकसमूह आणि भटके गट यांना लिपि तर नव्हतीच पण त्यांच्या भाषेचेंहि संशोधन व अभ्यास होणें जरूर होतें. परंतु हें होईपर्यंत थांबणें योग्य नसल्यानें तेथें रशियन भाषेंतच शाळा उघडणें भाग होतें. ( २ ) कांहीं लोकसमूह आधींच संघटित होते व त्यांची भाषाही अधिक प्रगत स्थितींत होती. त्यांना लिपि देऊन त्या प्रदेशांत प्राथमिक शिक्षण मातृभाषेंत देण्याची व्यवस्था ताबडतोब करण्यांत आली. भाषा अधिक समृद्ध होईपर्यंत दुय्यम व उच्च शिक्षण मात्र रशियन भाषेंतून देणें भाग होतें. ( ३ ) यूक्रेन, श्वेतरशिया, जॉर्जिया, आर्मीनिया इत्यादि प्राचीन संस्कृति व वाङ्मय असलेल्या देशांत ताबडतोब बालवर्गापासून कॉलेजशिक्षणापर्यंत सर्व शिक्षण मातृभाषेंतूनच देण्याची व्यवस्था करण्यांत आली. उझ्बेक, तुर्कोमान, ताजिक वगैरे राष्ट्रांचा विकासही यूक्रेनच्या दिशेनें व्हावा अशी योजना ठरविण्यांत आली. यांपैकीं कित्येकांच्या लिपींत अनेक चिन्हें असल्यामुळें त्या अवजड झाल्या होत्या; त्या सुधारून अधिक सोप्या व उपयुक्त कराव्या लागल्या. या सर्व भाषांमधील वाङ्मय जसजसें वाढलें, तसतसें अधिकाधिक उच्च दर्जाचें शिक्षण स्वभाषेंतून देण्यांत यावें असें धोरण अनुसरण्यांत आलें. सध्यां सर्व राष्ट्रांत *सर्व शिक्षण स्वभाषेंतून* देण्यांत येत आहे. जे लोकसमूह अतिशय लहान आहेत किंवा ज्या भाषांची शब्दसंपत्ति लहान असल्यामुळें त्यांमध्यें उच्चशिक्षण देणें अशक्य आहे असे लोकसमूह सोडून बाकीच्या सर्वांना सर्व शिक्षण मातृभाषेंतून घेतां येत आहे.

* लिपी देणें, भाषा शोधणें, व्याकरण ठरविणें, त्या भाषेंत वर्तमानपत्रें व पुस्तकें

---

* दक्षिणेकडील व मध्य आशियांतील सर्व राष्ट्रांची लिपि पूर्वीं अरेबिक होती; म्हणून क्रांतीनंतर प्रथम त्याच लिपींत पुस्तकें छापण्यास सुरवात झाली; कांहीं प्रदेशांत मात्र यावेळींसुद्धां सिरिलिक ( रशियन ) लिपि वापरण्यांत येऊं लागली. लवकरच असें प्रत्ययास

१७३ पानावर टीप पाहा.

छापण्याची व्यवस्था करणें, शाळा उघडणें या गोष्टी समान शिक्षणाच्या हक्काच्या अंमलबजावणीकरितां अवश्य होत्याच. पण या हक्काचा पूर्ण फायदा घेण्यासाठीं फक्त वरील गोष्टी करून चाललें नसतें.

मध्य आशियांतील मुस्लिम राष्ट्रें, दक्षिण रशियांतील मुस्लिम प्रदेश, कॉकेशस-मधील राष्ट्रें इत्यादि प्रदेशांत तेथील लोकांवर सरंजामी युगाचा जबरदस्त पगडा होता. तो दूर केल्याशिवाय मुलें, मुली व प्रौढ स्त्रीपुरुष शिक्षण घेण्यास उद्युक्त झाले

---

येऊं लागलें कीं अरेबिक लिपि छापण्याच्या व टाईप करण्याच्या कामीं गैरसोयीची आहे. तेव्हां प्रथम अझरबैजान राष्ट्रानें लॅटिन लिपीचा स्वीकार केला ( ही लिपि इंग्रजी, फ्रेंच वगैरे भाषा वापरतात ); आणि नंतर अरेबिक लिपि वापरणाऱ्या सर्व राष्ट्रांनीं लॅटिन लिपीच स्वीकारली. लॅटिन लिपींत मूळाक्षरें कमी ( २४ ) असल्यामुळें साक्षरताप्रसारास तिची बरीच मदत झाली. परंतु पुढें लॅटिनपेक्षां सिरिलिक लिपि अधिक सोयीची आहे असें दिसून आल्या-मुळें १९३५ पासून हळुहळु हीं राष्ट्रें सिरिलिक लिपींत लिहूं व छापूं लागलीं. रशिया आपली संस्कृति इतर सोविएत राष्ट्रांवर लादीत आहे असा या फेरफाराचा अर्थ कित्येक लोक कर-तात ! म्हणून ही लिपि स्वीकारण्याचीं कारणें पुढें दिलीं आहेत. त्यांवरून या आक्षेपांत किती तथ्य आहे हें वाचक ठरवूं शकतील. अर्थात् लिपि बदलल्यामुळें भाषा बदलत नाहीं, हेंहि ध्यानांत घेणें जरूर आहे !

लाल सेनेसाठीं एक सर्वसामान्य भाषा असणें जरूर आहे; आपल्याकडे जशी हिंदुस्थानी तशी सोविएत देशांत रशियन वापरण्यांत येते. उच्च शास्त्रीय वाङ्मयाचें लिखाण रशियन भाषेंत अधिक असल्यामुळें रशियन ही भाषा दुसरी भाषा म्हणून दुय्यम शाळांत शिकवि-ण्यांत येते. तसेंच या छोट्या राष्ट्रांची जुनी शब्दसंपत्ति थोडी होती. औद्योगीकरणानंतर नवे शास्त्रविषयक आंतरराष्ट्रीय शब्द येऊं लागले व ते स्वाभाविकपणें रशियन भाषेंतून येत असतात. या कारणामुळें या भाषांना सिरिलिक लिपि असणें सोयीचें वाटूं लागलें. भाषा-शास्त्राच्या दृष्टीनें पाहिलें तरी सिरिलिक लिपि लॅटिनपेक्षां श्रेष्ठ ठरते. कारण तिच्यामध्यें ३२ मूळाक्षरें आहेत, व ती ध्वन्यनुकारी आहे, आणि या सर्व अरेबिक भाषांत मूळाक्षरें अधिक आहेत. यापैकीं कांहींत ३२ पेक्षां अधिक मूळाक्षरें असल्यामुळें त्यांच्याकरितां सिरिलिक लिपींतच अधिक अक्षरें घालण्यांत आलीं. उदा० बक्शीर भाषा ४१, उज्बेक ३८ इत्यादि. या भाषांसाठीं नवे टाईपरायटरहि मुद्दाम बनविण्यांत आले आहेत.

सध्यां सोविएत देशांत तीन लिपी चालू आहेत—लिथुआनिया, लाटविया, इस्थोनिया व कॅरेलिया ( फिनिश ) यांमध्यें त्यांची जुनी लिपि लॅटिन; जॉर्जिया व आर्मीनिया या राष्ट्रांत त्यांची जुनी लिपि, आणि रशिया, यूक्रेन व इतर सर्व राष्ट्रें यांमध्यें सिरिलिक लिपि.

नसते. पडदा, बालविवाह इत्यादि अनिष्ट सामाजिक रूढी, आणि जादूटोणा, मंत्र तंत्र वगैरे अंधश्रद्धेचे प्रकार नाहींसे झाल्याशिवाय शिक्षणाला खरी चालना मिळणें अशक्य होतें. यासाठीं जमीनदार, धर्मगुरू, मुल्ला, शमान इत्यादि सरंजामदारी युगाच्या सत्ताधाऱ्यांचें साफ उच्चाटन करणें, ही गोष्ट प्रथम करावी लागली. धार्मिक भावनांना न दुखावतां वैद्यकीय मदत इत्यादि संस्कृतीच्या साधनांनीं प्रतिगामी गटाच्या वर्चस्वाला प्रथम शह देण्यांत आला आणि पुरेशी जागृति झाल्यावर त्यांच्या दडपणा-खालीं असलेल्या बहुसंख्य दलित जनतेनें उघडउघड सुधारणेच्या बंडाचें निशाण फड-कविलें. या समाजांत स्त्री पडद्यांतून बाहेर निघण्यासाठीं मोठीच चळवळ करावी लागली. यासाठीं प्रथम प्रथम पडदानशीन बायकांचे क्लब स्थापून तेथें स्त्रियांना शिक्षण दिलें जाई आणि स्त्रियांना दडपणाऱ्या अनिष्ट सामाजिक रूढींविरुद्ध प्रचार करण्यांत येत असे. स्त्रियांनीं उघडपणें पडदा झुगारून दिल्यावर मात्र शिक्षणाला व सुधारणेला जोराची चालना मिळाली. आणि मग या सर्व प्रदेशांत शिक्षणाची प्रगति झपाट्यानें होऊं लागली.

मध्य आशियांतील भटक्या टोळ्यांचा प्रश्न सोडवण्यासाठीं त्यांना कुठेंतरी आधीं स्थायिक करून शेती, गुरचराई, आणि इतर उद्योगधंदे शिकविणें आवश्यक होतें. या जमातींतील मुलांना शिकविण्यासाठीं कांहीं दिवस फिरती शाळा उघडली जात असे. शाळेचें सर्व सामान घेऊन शिक्षक या टोळ्यांबरोबर हिंडत असत. शिक्षणाचा प्रसार होऊं लागला तसें त्यांना स्थायिक होऊन शेती करण्याचें महत्त्व पटूं लागलें. उत्तरेकडील विरळ लोकवस्तींत या फिरत्या शाळेबरोबरच हंगामी स्थायिक शाळा आणि वसतिगृहें यांचीही व्यवस्था करावी लागे. संस्कृतीचीं अगदी प्राथमिक साधनें, कागद, पेन्सिली, स्टोव्ह इत्यादीपासून या प्रदेशांत सुरवात करावी लागली. या लोकसमूहांत संस्कृतीची ध्वजा नेणारा शिक्षक हाच संस्कृतीचा पहिला दूत होता यांत शंका नाहीं.

दूरवर पसरलेल्या उत्तरेकडील सायबेरियन प्रांतांत शाळा सुरू करावयाची म्हणजे इमारती, उपकरणें, पुस्तकें जमविण्यापासून सुरवात होती. या गोष्टी अर्थातच मध्यवर्ति शिक्षणखात्याला कराव्या लागल्या. ज्यांची औद्योगिक प्रगति फारशी झालेली नव्हती अशा या प्रदेशांना प्रथम प्रथम सर्व आर्थिक सहाय्य मध्यवर्ति सरकारनें केलें. नंतरही सुधारलेल्या राष्ट्रांपेक्षां या मागासलेल्या राष्ट्रांवर शिक्षणासाठीं

अधिक खर्च करावा लागत असे. मध्यवर्ति सरकारनें अशी मदत केल्याशिवाय शतकानुशतकें अज्ञानांधकारांत राहिलेल्या या राष्ट्रांची इतक्या जलद प्रगति झाली नसती. एवढया लवकर आपल्या पुढारलेल्या इतर सोविएत बांधवांच्या बरोबर येणें त्यांना शक्य झालें नसतें. १९३० सालीं या मागासलेल्या राष्ट्रांत शिक्षणावरील दरमाणशीं खर्च रशियांतील खर्चाच्या तिपटीहून अधिक होता. तसेंच नवीन उघडलेल्या शाळांसाठीं तद्देशीय शिक्षकवर्गही मिळणें प्रथमतः अशक्य होतें. म्हणून सोविएत सत्तेचे अभिमानी अनेक रशियन शिक्षक या दूरच्या प्रांतांत संस्कृतिप्रसाराचें महान् कार्य करावयास जात असत. उत्तरेकडील बर्फमय टंड्रा प्रदेशांत जाणाऱ्या या शिक्षकांना भाषा शिकण्यापासून सुरवात करावी लागे. या निरनिराळ्या भाषा शिकविण्यासाठीं व शिक्षक तयार करण्यासाठीं क्रांतीनंतर कांहीं वर्षांनीं मॉस्को व लेनिनग्राद येथें खास विद्यालयें उघडण्यांत आलीं. सुधारलेल्या राष्ट्रांनीं मागासलेल्या राष्ट्रांना सुसंस्कृत करण्यासाठीं मदत करून त्यांना आपल्या तोडीचें बनविणें हें बंधुभावाचें आणि समतेचें धोरण पूर्वीच्या साम्राज्यशाही पिळणुकीच्या धोरणाचा अगदीं उलट आहे. म्हणूनच या राष्ट्रांचा आज एवढा विकास आणि एवढी एकजूट होऊं शकली हें उघड आहे.

हा विकास कसा होत गेला याची कल्पना खालीं दिलेल्या उदाहरणांवरून येईल. रशियामधील *तार्तरी* हें स्वायत्त राष्ट्र घेऊं. क्रांतीपूर्वी तार्तरी प्रदेशांत तार्तर जनतेंत साक्षरतेचें प्रमाण शेंकडा १५ होतें; १९३२ सालीं शेंकडा ९४ तार्तर लोक साक्षर झाले. १९३२ सालीं प्राथमिक व दुय्यम शिक्षण सक्तीचें करण्यांत आलें आणि बालसंस्थांच्या संख्येंतही खूप वाढ झाली. पूर्वी तार्तरी देशांत ३ कॉलेजें होतीं पण त्यांमध्यें तार्तर विद्यार्थी अपवादात्मक दिसावयाचा; १९३२ सालीं कॉलेजांची संख्या २० झाली आणि त्यांमध्यें ३००० तार्तर विद्यार्थी उच्च शिक्षण घेत होते. १९३४ सालीं जर्मनींत दर १०,००० लोकसंख्येंत २० मुलें टेक्निकल शाळेंत जात होतीं; तर तार्तरींत हें प्रमाण २९ होतें ! उच्च शिक्षणाचा कांहीं भाग प्रथमपासून तार्तर भाषेंतच शिकविला जात होता ही गोष्ट विशेष महत्त्वाची आहे. *बश्किरिया* या दुसऱ्या मागासलेल्या प्रदेशाची प्रगति अशीच पाहाण्यासारखी आहे. क्रांतीपूर्वी बश्किरियामधील शाळकरी वयाच्या मुलांतील अवघीं शेंकडा १·८ इतकीं मुलें शाळेंत जात असत; १९२९ सालीं हें प्रमाण शेंकडा ५८·४ पर्यंत वाढलें; आणि १९३१

पासून प्राथमिक शिक्षण सक्तीचें करण्यांत आलें. प्राथमिक शाळांमधील मुलांची संख्या सन १९२९ पासून किती झपाट्यानें वाढत गेली हें पुढील आंकड्यांवरून दिसून येतें. ( आंकडे *हजारांचे* आहेत. )

प्राथमिक शाळांतील मुलांची वाढ ( बश्किरिया )

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| सन | १९२९ | १९३० | १९३१ | १९३२ | १९३३ |
| संख्या | १८१ | २२१ | ३४७ | ३७१ | ३९८ |

१९३० सालीं दुय्यम शाळांची संख्या १२१ असून त्यांत १६,३०० विद्यार्थी शिकत होते. १९३१ मध्यें दुय्यम शाळांची संख्या १४९ झाली आणि विद्यार्थ्यांची संख्या २०,३०० पर्यंत वाढली; आणि १९३२ सालापासून दुय्यम शिक्षण सक्तीचें करण्याची योजना अंमलांत आली. १९३४ सालीं या राष्ट्रांत ४ कॉलेजें आणि ३० औद्योगिक शाळा होत्या.

या रशियनेतर देशांत शैक्षणिक प्रगति किती वेगानें झाली ( हा वेग रशियापेक्षां कितीतरी पटीनें मोठा आहे ) याविषयीं अनेक उदाहरणें देतां येतील. *उझ्बेक आणि तुर्कोमान* राष्ट्रांत १९१३ सालीं रशियन लोकसंख्या जमेस धरूनहि साक्षरतेचें प्रमाण शेंकडा २ ते ५ च्या दरम्यान होतें. १९३८ मध्यें शेंकडा ७० हून अधिक लोक साक्षर होते. या देशांत झारशाहीच्या काळांत दर डोई २५ ते ५० कोपेक ( ¼ ते ½ रूबल ) शिक्षणखर्च होत असे; १९३८ मध्यें ३० ते ४० रूबल खर्च करण्यांत येत होते. *यूक्रेन आणि श्वेतरशिया* या त्यांतल्या त्यांत सुधारलेल्या देशांतहि अशीच प्रगति झाली. १९१३ सालीं यूक्रेनमध्यें शेंकडा २० आणि श्वेत-रशियांत शेंकडा २५ लोक साक्षर होते. १९४२ सालीं बहुतेक सर्व लोक साक्षर झाले होते.

१९३८ सालचे पुढील आंकडे पाहा. रशिया सोडून इतर सर्व राष्ट्रांतील *दुय्यम शाळांच्या* विद्यार्थ्यांत १९१४ सालच्या संख्येच्या २० पट वाढ झाली होती. यांपैकीं

कांहीं राष्ट्रांत याहूनहि अधिक वाढ झाली. उदा० अझरबैजान ३५ पट, तुर्कोमान ३७ पट, उझबेकिस्तान ५३ पट, आर्मीनिया ६८ पट, किरगीजिस्तान १७२ पट. ताजिक देशांत क्रांतीपूर्वी दुय्यम शाळाच नव्हत्या ! तेथें १९३८ सालीं २२,००० मुलें दुय्यम शिक्षण घेत होतीं. उच्चशिक्षणसंस्थांत–कॉलेजांत किती वाढ झाली हें पुढील आंकडे दाखवितात. १९३८ सालीं *कॉलेजांची संख्या* श्वेतरशिया २२, अझरबैजान १३, आर्मीनिया ८, उझबेकिस्तान ३०, तुर्कोमान ५, काझाकिस्तान १९, आणि किरगीजिस्तान ४ अशी होती. झारशाहींत या राष्ट्रांत कॉलेजें मुळीं नव्हतींच. क्रांतीपूर्वी फक्त एक काझाकी कॉलेजांत शिकलेला होता ! क्रांतीपूर्वी जॉर्जिया राष्ट्रांत रशियन भाषेंत शिक्षण देणारें १ कॉलेज असून त्यांमध्यें ३०० विद्यार्थी होते. १९३८ सालीं जॉर्जियामध्यें मातृभाषेंत शिक्षण देणारीं १८ कॉलेजें होतीं व त्यांत २१,८०० विद्यार्थी उच्चशिक्षण घेत होते. क्रांतीपूर्वी यूक्रेनमध्यें १९ कॉलेजें होतीं. शिक्षण अर्थातच रशियन भाषेंत दिलें जात असे. आतां यूक्रेनमध्यें १२९ कॉलेजें असून बहुसंख्य कॉलेजांत सर्व उच्च शिक्षण यूक्रेनियन भाषेंत देण्यांत येतें. क्रांतीनंतर यूक्रेनमध्यें प्रथमच विश्वविद्यालयें ( *University* ) आणि शास्त्र परिषद ( *Science Academy* ) स्थापन होऊन यूक्रेनियन शास्त्रज्ञ निरनिराळ्या संशोधन संस्थांत ( *Research Institute* ) संशोधनकार्य करूं लागले. सध्यां रशिया-बाहेरील सोविएत देशांत सात शास्त्र परिषदा आणि २३ विश्वविद्यालयें आहेत आणि संशोधन संस्थांचें जाळें सर्व देशभर पसरलेलें आहे.

या रशियनेतर राष्ट्रांत ही जी शैक्षणिक प्रगति झाली त्याबरोबरच पुस्तकें व वर्तमानपत्रें अधिकाधिक भाषांत छापलीं जात होतीं हें उघड आहे. क्रांतीपूर्वी १५० भाषांपैकीं अवघ्या २८ भाषांना लिपि होती; सन १९३२ पर्यंत १०२ भाषांना लिपि देण्यांत आली आणि कित्येक भाषांची पूर्वीची बोजड व अवजड लिपि सुधारून सोपी करण्यांत आली. त्या सालीं ७६ भाषांत पुस्तकें छापण्याची व्यवस्था झाली होती. १९१३ सालीं बहुतेक सर्व वर्तमानपत्रें रशियन भाषेंत होतीं; १९३२ सालीं ६० भाषांत वर्तमानपत्रें प्रसिद्ध होऊं लागलीं आणि १९३५ मध्यें ८८ भाषांत वर्तमान-पत्रें निघत असत. क्रांतीपूर्वी धार्मिक शिक्षणाच्या शाळा सोडून मातृभाषेंत शिक्षण देणाऱ्या शाळाच नव्हत्या हें आपण मागें पाहिलें आहे. १९३५ सालीं निरनिराळ्या ८० प्रादेशिक मातृभाषांमध्यें शिक्षण दिलें जात होतें आणि सन १९३७ मध्यें ११२

भाषांत शिक्षण देण्याची व्यवस्था झाली. १९४३ सालीं निरनिराळ्या १५० भाषेंत पुस्तकें, वर्तमानपत्रें व पत्रकें छापण्यांत येत होतीं असा उल्लेख समाजशास्त्राच्या अभ्यासास वाहिलेल्या एका अमेरिकन नियतकालिकांत केलेला आढळतो. १९२८ सालीं सर्व देशांत सक्तीचें प्राथमिक शिक्षण पूर्णपणें अंमलांत आलें होतें; १९४२ सालीं सर्वत्र सक्तीचें सप्तवार्षिक शिक्षण देण्यांत येऊं लागलें.

या सर्व राष्ट्रांत ग्रंथालयें, वाचनालयें, क्लब, सिनेमा व नाट्यगृहें, प्रदर्शनें, रेडियो इत्यादि शैक्षणिक व सांस्कृतिक विकासाच्या साधनांतही शिक्षणसंस्थांइतक्याच वेगानें वाढ झालेली आहे. या सर्वांची माहिती येथें देणें अर्थातच अशक्य आहे. नमुन्यादाखल कांहीं उदाहरणें दिलीं आहेत. १९१३ सालीं *आर्मीनिया* राष्ट्रांत ( लोकसंख्या १३ लक्ष ) ३ ग्रंथालयें होतीं; १९३७ सालीं ४६८ होतीं. अझर-बैजानमध्यें १९१३ सालीं फक्त २ वर्तमानपत्रें ( रशियन भाषेंत ? ) छापलीं जात; १९३७ सालीं त्यांची संख्या १२३ झाली. या वर्षी अझरबैजान या ३२ लक्ष लोकवस्तीच्या राष्ट्रांत पुस्तकांच्या ८१ लक्ष प्रती छापण्यांत आल्या. *कॅरेलिया या फिनिश भाषा बोलणाऱ्या ४½ लाख लोकवस्तीच्या देशांत ६० लक्ष लोक-वस्तीच्या फिनलंडपेक्षां अधिक पुस्तकें फिनिश भाषेंत छापलीं जातात !* इतर राष्ट्रांची या क्षेत्रांतील प्रगति सामान्यतः अशाच स्वरूपाची आहे.

झारशाहींत या सर्व अंकित राष्ट्रांतील प्रादेशिक वाङ्मय आणि संस्कृति–प्रादेशिक नाट्य, नृत्य, लोकगीतें–दडपून टाकण्यांत आलीं होतीं. आतां सर्वत्र राष्ट्रीय व प्रादेशिक संस्कृती नव्यानें फुलून येत आहेत. झारशाहींत यूक्रेनियन स्वातंत्र्यगीतें रचल्याबद्दल आपल्या देशास पारखा झालेला यूक्रेनियन स्वातंत्र्यशाहीर *तारास शेवशेंको* (सन १८१४–१८६१), याचा १२५ वा जन्मदिन, १९३९ च्या मार्च महिन्यांत केवळ यूक्रेनमध्येंच नव्हे तर सोविएत देशांत सर्वत्र साजरा करण्यांत आला. शेवशेंकोच्या गीतांचा अनुवाद आतां विसांहून अधिक सोविएत भाषांत झाला आहे. निरनिराळ्या देशांतील प्रादेशिक लोकगीतें, म्हणी, लोककथा वगैरे गोळा करण्याचें काम पद्धतशीरपणें चाललेलें आहे. किरगीजिस्तानांत एका जुन्या महा-काव्याचें नुकतेंच संशोधन झालें आहे. या महाकाव्याचें नांव " मानास " असें असून त्यामध्यें ३ लक्ष चरण आहेत. फिर्दोसीकृत " शहानामा " किंवा रशियन भाषेंतील " इगोरची कथा " या सुप्रसिद्ध महाकाव्यांच्या तोडीचें हें काव्य आहे असें

म्हणतात. शंभराच्या आसपास वय असलेल्या जांबूल या काझाकी शाहीराचें नांव व गीतें आतां सोविएत देशांत सर्वांच्या तोंडीं झालीं आहेत. गेल्या महायुद्धांत सोविएत देशानें केलेल्या महान् स्वातंत्र्यलढ्यावर त्यानें अनेक स्फूर्तिदायक कवनें रचलीं आहेत. गेल्या वर्षीच त्याचा मॉस्को शहरातर्फे मोठा सन्मान करण्यांत आला.

गेल्या पंधरावीस वर्षांत या सर्व राष्ट्रांतील नृत्यप्रकार आणि नाट्यप्रकार यांचा अपूर्व विकास झाला आहे. मॉस्को शहरांत यूक्रेनियन, काझाक, जॉर्जियन, अझरबैजान, किरगीज आणि उझ्बेकी नाट्यगृहें असून तेथें या भाषांतील काव्यात्म नाटकें (ऑपेरा) व नृत्यप्रकार केलीं जातात व तीं पाहाण्यास तोबा गर्दी होते. खुद्द या राष्ट्रांतहि नाट्यगृहांची झपाट्यानें वाढ झाली आहे. यांपैकीं कित्येक राष्ट्रांत पूर्वी नाट्यगृहाची कल्पना देखील नव्हती. त्यांच्या भाषेंत नाट्यगृह या अर्थाचा शब्दही नव्हता ! ताजिकिस्तानची राजधानी जें स्तालिनाबाद शहर, तेथें आतां ताजिकी ऑपेरागृह, सर्व तऱ्हेचीं नाटकें दाखविणारें दुसरें एक नाट्यगृह, तरुण कामगारांचें नाट्यगृह आणि एक खास मुलांसाठीं नाट्यगृह, इतकीं नाट्यगृहें आहेत. जॉर्जियांत आतां ४० नाट्यगृहें असून त्यांपैकीं दोन नाट्यगृहें सर्व सोविएत देशभर प्रसिद्ध आहेत. क्रांतीपूर्वी या राष्ट्रांना सिनेमा ही चीजच माहीत नव्हती; आतां तेथील स्थानिक व प्रवासी सिनेमांची संख्या सारखी वाढत आहे. “ अलेक्झांडर नेव्रूस्की ” यासारखे बोलपट दाखविलें नसतील असें एकही खेडें सोविएत देशांत नसेल. कित्येक राष्ट्रांत आतां राष्ट्रीय भाषांत बोलपट निघूं लागले आहेत. विशेषतः जॉर्जियन बोलपट सोविएत देशांत फार प्रसिद्ध आहेत.

या सर्व सांस्कृतिक विकासाविषयीं एक गोष्ट ध्यानांत ठेवणें जरूर आहे. निरनिराळ्या राष्ट्रांत प्रादेशिक संस्कृतींची जोपासना स्वतंत्रपणें होत असली तरी या संस्कृतींचा परस्परांशीं विरोध नाहीं. एका राष्ट्रानें संपादिलेला सांस्कृतिक विकास इतर राष्ट्रांसह सर्व सोविएत देशाचा ठेवा बनतो. अशा रीतीनें विविध राष्ट्रीय रूपांनीं एक नवीन आंतरराष्ट्रीय संस्कृति निर्माण होत आहे.

सोविएत देशांतील भिन्नभिन्न राष्ट्रांत ही जी शैक्षणिक व सांस्कृतिक प्रगति झाली त्यामधील कांहीं बोधप्रद व मनोरंजक उदाहरणें जरा अधिक विस्तारानें पुढें दिलीं आहेत.

## यूक्रेन

झारशाही रशियांत अंकित राष्ट्रांना कसें दडपून ठेवण्यांत येत होतें याचें यूक्रेन हें अतिशय उत्तम उदाहरण आहे. यूक्रेनची लोकसंख्या सध्यां ४ कोटि आहे. म्हणजे सर्व मराठी भाषा बोलणाऱ्या प्रदेशांचा मिळून भावी महाराष्ट्र देश बनला तर त्या देशाच्या दीडपट मोठा यूक्रेन हा देश आहे. यूक्रेन हा अतिशय सुपीक प्रदेश असून त्याला "धान्याचें कोठार" असें नांव आहे. यूक्रेनमध्यें खनिज संपत्ति विपुल आहे, आणि क्रांतीनंतर औद्योगिक प्रगतींत यूक्रेन देश विलक्षण झपाट्यानें पुढें गेला आहे. यूक्रेनियन वाङ्मय व संस्कृति यांची कित्येक शतकांची परंपरा आहे. प्राचीन संस्कृति असलेल्या या समृद्ध देशाची झारशाहींत काय परिस्थिति होती? यूक्रेनमधील सर्व औद्योगिक व सांस्कृतिक केंद्रें रशियन साम्राज्यवाद्यांच्या वर्चस्वाखालीं होतीं. यूक्रेनियन भाषा, वाङ्मय व संस्कृति यांना जुलूमजबरदस्तीनें समूळ नष्ट करण्याचा रशियन साम्राज्यशाहीनें चंग बांधला होता. या परकीय वर्चस्वापासून यूक्रेन राष्ट्राला बंधमुक्त करण्यासाठीं स्वातंत्र्यवादी जोरदार आंदोलन अनेक वर्षें सुरू होतें यांत नवल नाहीं.

झारशाहींत यूक्रेनियन भाषा व संस्कृति यांना चिरडून टाकण्याचे कसे पद्धतशीर प्रयत्न करण्यांत आले होते याची थोडीशी माहिती वर दिलेलीच आहे. अल्पप्रमाणांत उच्च शिक्षण देण्यांत येत असे आणि शास्त्रसंशोधनहि चालू होतें, पण हें सर्व रशियन भाषेंत व रशियन प्राध्यापकांकडून. उच्च शिक्षणाचीं फक्त १९ कॉलेजें होतीं; ब्रिटिश अंमलाखालील महाराष्ट्रांतसुद्धां याहून अधिक कॉलेजें आहेत. झारशाही-खालील यूक्रेनप्रमाणें महाराष्ट्रांतहि उच्चशिक्षण इंग्रजी भाषेंतून देतात हें साम्य पाहाण्यासारखें आहे. यूक्रेनियन भाषेंतून प्राथमिक व दुय्यम शिक्षण देणाऱ्या सरकारी शाळा नव्हत्या. शेंकडा ८० टक्के जनता निरक्षर होती. यूक्रेनियन भाषेंत नाटकें लिहिण्यास अथवा लोकगीतें गाण्यास सक्तमनाई होती. फार काय सरकारदरबारीं 'यूक्रेन' हा शब्द वापरण्यासही बंदी होती!

क्रांतीनंतर हे सर्व दास्यबंध नाहींसे झाल्यावर यूक्रेनियन संस्कृतीचा जलद विकास होऊं लागला, आणि यूक्रेन हें आतां सोविएत राष्ट्रसंघांतील आघाडीचें राष्ट्र

बनलें आहे. सर्व जनता साक्षर झाली असून सप्तवार्षिक शिक्षण सर्वत्र सक्तीचें झालें आहे. उच्च शिक्षणसंस्था १३९ पर्यंत वाढल्या आणि संशोधनसंस्थांचें जाळें सर्व यूक्रेनभर पसरलें आहे. हें सर्व कार्य यूक्रेनियन भाषेंत व यूक्रेनियन प्राध्यापकांकडून होतें ही गोष्ट ध्यानांत ठेवली पाहिजे. यूक्रेनमध्यें आतां तीन विश्व-विद्यालयें आणि स्वतांची शास्त्र परिषद् ( *Science Academy* ) आहे. उच्च शिक्षणासाठीं सुप्रसिद्ध असलेल्या जर्मनी या राष्ट्रापेक्षां यूक्रेनमध्यें १९३८ सालीं अधिक कॉलेजें व अधिक कॉलेज विद्यार्थी होते. १९१३ सालीं यूक्रेनमध्यें फक्त एक वर्तमानपत्र यूक्रेनियन भाषेंत होतें. १९३८ सालीं १४०० वर्तमानपत्रें निघत होतीं. पुस्तकप्रकाशनांत १९१३ पासून १९३६ पर्यंत १०० पट वाढ झाली ! यूक्रेनमध्यें प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांत पूर्वी रशियन पुस्तकांना कसें प्राधान्य होतें आणि यूक्रेनियन वाङ्मयाचें प्रमाण आतां कसें वेगानें वाढत आहे हें दाखविणारे खालील आंकडे उद्बोधक आहेत.

यूक्रेनियन वाङ्मयाची वाढ

| साल | एकूण पुस्तकें | यूक्रेनियन | शेंकडा प्रमाण |
|---|---|---|---|
| १९१३ | ५५७९ | १७६ | ३.१ |
| १९२५ | ४५०८ | १८१३ | ४०.० |
| १९२८ | ५६९५ | ३२०१ | ५६.२ |
| १९२९ | ६६८० | ४८९७ | ७३.२ |
| १९३१ | ८०८६ | ६२१५ | ७६.८ |

यूक्रेनियन नाटकें, ऑपेरा व लोकगीतें यांना आतां विलक्षण बहर आला आहे. नाट्यगृहें, सिनेमागृहें, क्लब, ग्रंथालयें यांची स्थापना आतां जागोजाग झाली आहे. प्रादेशिक नृत्यप्रकारांचें आतां योग्य प्रकारें संवर्धन होत आहे. यूक्रेन राष्ट्रानें आतां जगाच्या संस्कृतींत आपलें हक्काचें स्थान मिळविलें आहे. गेल्या महायुद्धांत अपरिमित त्याग करून व भयंकर हानि आणि हालअपेष्टा सोसून यूक्रेननें

आपलें स्वातंत्र्य, स्वत्व आणि संस्कृति यांचें रक्षण केलें याची स्मृति तर अगदीं ताजी आहे

## अल्पसंख्यांकांच्या संस्कृतींचें रक्षण

यूक्रेनमध्यें निरनिराळया वीस भाषा बोलणारे लोक राहातात. यूक्रेनमध्यें यूक्रेनियन भाषेला प्राधान्य मिळालें याचा अर्थ या इतर भाषा बोलणाऱ्या जमातींवर यूक्रेनियन भाषेंत शिकण्याची सक्ती झाली असा मात्र नाहीं. पोलिश, झेक, बल्गार, ग्रीक, ज्यू इत्यादि सर्व जमातींना आपापल्या भाषेंत शिक्षण घेण्याची सोविएत देशांत मुभा आहे. इतकेंच नव्हे, तर सरकारकडून त्या भाषेंतून शिक्षण देणाऱ्या शाळा उघडण्यांत आल्या आहेत. अझोव समुद्रावरील, * मेरियापूल या, बंदराभोंवतालच्या प्रदेशांत ग्रीक लोकांची वस्ती आहे. ते आतां ग्रीक भाषेंत शिक्षण घेतात. मेरियापूल येथें ग्रीक भाषेंत वर्तमानपत्रें निघतात व तेथें एक ग्रीक पुस्तक-प्रकाशन संस्थाहि आहे. यूक्रेनमध्यें निरनिराळया आठदहा ठिकाणीं इंग्रजी भाषा बोलणारी लोकवस्ती आहे; तसेंच कांहीं गट मॉस्कोमध्यें आहेत. त्यांच्यासाठीं इंग्रजी शाळा आहेत. सोविएत देशांत फक्त १५०० झेक मुलें आहेत; पण त्यांच्या उपयोगासाठीं झेक भाषेंतील निरनिराळ्या ८५ प्रकारचीं क्रमिक पुस्तकें १९३९ सालीं छापण्यांत आलीं. आपल्या देशांत ( आणि पाश्चात्य देशांतहि ) वेगळी भाषा बोलणाऱ्या अल्पसंख्यांकांच्या मुलांचे शिक्षणासंबंधीं किती ओढाताण होते हें सर्वांस माहीत आहे. मॉस्को शहरीं महाराष्ट्रीय वस्ती असती तर तेथें मराठी भाषेंतून शिक्षण देणारी शाळा निघाली असती ! असो.

### *जिप्सी*

सोविएत देशांत जिप्सी या भटक्या जमातीची एकूण ६१,००० लोक-

* सोविएत देशांत कांहीं मुलें चार भाषा शिकतात. उदाहरणार्थ यूक्रेनमधील ग्रीक मुलें, ग्रीक, यूक्रेनियन, रशियन व एक परकीय भाषा अशा चार भाषा शिकतील !

वस्ती आहे. आपल्याकडे बलुची म्हणून समजल्या जाणाऱ्या भटक्या टोळ्यांशीं या जमातीचें साम्य आहे. ठिकठिकाणीं भरणाऱ्या जत्रा व मेळे यांमध्यें लहानसहान जिन्नस विकून आणि चोऱ्यामाऱ्या करून जिप्सी आपला उदरनिर्वाह करतात. घोडे पळविणें हा त्यांचा नित्याचाच व्यवसाय आहे ! यूरोप खंडांतील अनेक देशांत जिप्सींना स्थायिक करण्याचे प्रयत्न झाले, पण त्या अर्धवट प्रयत्नांना फारसें यश कधींच आलें नाहीं. सोविएत देशांत मात्र ही गोष्ट साध्य झाली आहे. शेती व उत्तम घोड्यांची पैदास हे धंदे स्वीकारून जिप्सी टोळ्या आतां स्थायिक झाल्या आहेत. त्यांच्या *रोमनी* बोलीला व्याकरणशुद्ध स्वरूप देण्यांत आलें असून जिप्सी मुलें आपल्या रोमनी भाषेंत शिक्षण घेतात. पूर्वी समाजाबाहेर असलेल्या जिप्सींमध्यें आपण समाजाचे जबाबदार घटक आहोंत ही भावना निर्माण झाली असून समाजांत त्यांना योग्य स्थान प्राप्त झालें आहे. जिप्सी लोक त्यांच्या वैशिष्टथपूर्ण संगीता· विषयीं व नृत्याविषयीं पहिल्यापासून जगप्रसिद्ध आहेत. परंतु या सांस्कृतिक विशे-षांची समाजाकडून फारशी जोपासना कधींच होत नसे. सोविएत देशांत जिप्सी संगीत व नृत्य यामधील ग्राम्य प्रकारांना आळा बसून त्यांचा उत्तम विकास होण्यास संधि मिळाली. मॉस्कोमधील जिप्सी नाटयगृहावर प्रेक्षकांची इतकी झुंबड असते कीं तेथें प्रवेश मिळणें मुष्कील होऊन बसतें !

### ज्यू

सर्वांत उपेक्षिलेली व छळ झालेली जमात म्हणून ज्यू लोक सर्वांच्या परि-चयाचे आहेत. झारशाहींत ज्यू लोकांस शहराच्या निराळ्या विभागांत ( घेट्टो ) राहावें लागे. त्यांच्या सामाजिक, राजकीय व सांस्कृतिक जीवनावर अतिशय जाचक निर्बंध कायद्यानें घातलेले होते. ज्यूविरोधी भावना चेतवून सरकारी पोलीस व गुंड ज्यूंविरुद्ध छळाची पद्धतशीर मोहीम सुरू करीत असत.

क्रांतीनंतर इतर सर्व जमातींप्रमाणें ज्यू लोकांसहि आपली भाषा व संस्कृति यांचें संवर्धन करण्याचें स्वातंत्र्य मिळालें; सामाजिक जीवनांत समान हक्क मिळाले; आणि आर्थिक क्षेत्रांतील जाचक निर्बंध दूर झाले. *आज ज्यू जमात ही सोवि-एत देशांतच खरें स्वातंत्र्य उपभोगीत आहे* यांत शंका नाहीं. कारण इतर देशांत

नाझी जर्मनीप्रमाणें अगदीं ज्युविरोधी कायदे नसले तरी व्यवहारांत ज्यूविरोधी भावना मोठ्या प्रमाणांत आढळून येते.

सोविएत यूनियनमध्यें ज्यू लोकांची वस्ती अनेक ठिकाणीं आहे. विशेषतः यूक्रेनमध्यें ज्यू लोकसंख्या बरीच मोठी, २० लक्षांहून अधिक, आहे. ज्यू मुलें आतां आपल्या मातृभाषेंत ( यिद्दिश भाषेंत ) शिक्षण घेतात. यिद्दिश भाषेला दुसऱ्या कोणत्याही देशांत कायदेशीर स्थान देण्यांत आलेलें नाहीं ही गोष्ट ध्यानांत घेण्यासारखी आहे. यूक्रेनमध्यें ६०० यिद्दिश शाळा आहेत; यिद्दिश भाषेंत वर्तमानपत्रें निघतात; आणि खारकोव विश्वविद्यालयांत यिद्दिश भाषेच्या शिक्षणाचा स्वतंत्र विभाग ( *Faculty* ) आहे. ज्यू लोकांचा इतिहास, धर्म, वेश, भाषा, वाङ्मय इत्यादि वैशिष्टयांचें संशोधन करण्यासाठीं एक खास संस्थाही स्थापण्यांत आली आहे.

ज्यू जमातीविषयीं लिहितांना दोन गोष्टींचा उल्लेख करणें अवश्य आहे. ज्यू लोकांची मातृभाषा कोणती हें ठरवितांना आपली भाषा हिब्रू ( प्राचीन ज्यू धर्मग्रंथांची भाषा ) असावी असा आग्रह सनातनी ज्यूंनीं धरला होता. यिद्दिश ही बोली भाषा आहे आणि हिब्रू ही प्राचीन ज्यू वाङ्मयाची भाषा आहे. आपल्याकडील मराठी आणि संस्कृत यांमध्यें जो फरक आहे, तोच फरक साधारणपणें वरील दोन भाषांत आहे. म्हणून शेवटीं बहुसंख्य लोकांना शिक्षण घेणें सुलभ होण्यासाठीं यिद्दिशच योग्य आहे असें ठरविण्यांत आलें.

ज्यू लोकांना अंगमेहनतीचें ( कामगार अथवा शेतकरी या पेशांचें ) काम करतां येत नाहीं, असा त्यांच्याविषयीं प्रवाद सर्वत्र रूढ आहे. कांहीं ज्यू सुद्धां यावर विश्वास ठेवतात ! पण आज सोविएत देशांत बहुसंख्य ज्यू शेतकरी असलेलीं अनेक सामुदायिक शेतें आहेत आणि कित्येक कारखान्यांत अनेक ज्यू कामगार आहेत; आणि ते इतरांपेक्षां कोणत्याही दृष्टीनें कमी प्रतीचे ठरत नाहींत. ज्यू लोकांना स्वतंत्र देश असावा या हेतूनें सध्यां पॅलेस्टाइनमध्यें ज्यू लोक स्थायिक होत आहेत आणि यामुळें तेथील मूळची अरब जनता आणि नवीन प्रविष्ट झालेले ज्यू यांमध्यें कलह सुरू होऊन तो प्रश्न चिघळत चालला आहे. सोविएत देशांत ज्यू लोकांना एक खास स्वायत्त प्रदेश आहे. ही गोष्ट आश्चर्यकारक वाटली तरी सत्य आहे. या प्रदेशाचें नांव बिरोबिजान ( *Biro Bidjan* ) असें असून तो पूर्व सायबेरियांत पूर्वी अगदीं

निर्जन असलेल्या अरण्यमय प्रदेशांत नवीन वसाहती करून वसविलेला आहे. नव्या वसाहती करणाऱ्या लोकांपुढें उभ्या राहाणाऱ्या, अरण्य जंगल तोडून शेतीयोग्य जमीन तयार करण्यापासूनच्या, सर्व अडचणींना ज्यूंनीं तोंड दिलें आहे. ज्यू फक्त पांढरपेशी जमात आहे असें आतां कोण म्हणूं शकेल ?

या सर्व प्रदेशाची यिद्दिश हीच सरकारी भाषा आहे. येथें १०४ यिद्दिश शाळा असून चार यांत्रिक कॉलेजें आहेत; आणि शैक्षणिक व सांस्कृतिक क्षेत्रांतील खर्च गेल्या १० वर्षांत ३ लक्ष रूबलपासून १ कोटि १५ लक्ष रूबलपर्यंत वाढला आहे. पूर्वी जेथें अरण्य होतें व हिंस्र पशुपक्षी संचार करीत होते त्याच जागीं आतां आधुनिक तऱ्हेचें नाट्यगृह, मुलांना नृत्य व संगीत शिकविण्यासाठीं विद्यालयें आणि एक मोठा क्लब, अशीं सांस्कृतिक विकासाचीं साधनें उभविलेलीं दिसून येत आहेत !

## मध्य आशियांतील मुस्लिम राष्ट्रें

झारशाहीच्या काळांत आशियांतील मुस्लिम राष्ट्रांची स्थिति युक्रेनसारख्या राष्ट्रांपेक्षां कितीतरी मागासलेली होती. या राष्ट्रांतील मुस्लिम जनतेवर जमीनदार, अमीर आणि मौलवी यांचें जबरदस्त मध्ययुगीन दडपण होतें. साम्राज्यशाही, धर्म आणि कारखानदार अथवा जमीनदार या तीन वर्गांकडून या दलित जनतेची पिळणूक होत असे. अनेक सामाजिक व धार्मिक बंधनांनीं त्यांना जखडून टाकण्यांत आलेलें होतें. इतक्या हीन आर्थिक व सामाजिक अवस्थेंत शिक्षण व संस्कृति यांचा सर्वसाधारण जनतेस गंधही नव्हता यांत मुळींच नवल नाहीं. त्यावेळची शिक्षणाची तुटपुंजी सोय पाहिल्यास ही गोष्ट स्पष्ट होते. या मुस्लिम राष्ट्रांत त्यावेळीं तीन प्रकारच्या शाळा होत्या. ( १ ) सरकारी शाळाः—या शाळांत रशियन भाषेंतून शिक्षण दिलें जाई आणि उद्देश अर्थातच रशियनीकरणाचा होता. अधिकारी, व्यापारी, कारखानदार, डॉक्टर वगैरे रशियन लोकांच्या मुलांनाच या शाळांचा उपयोग होत असे. ( २ ) तद्देशीय जनतेसाठीं कांहीं प्रागतिक रशियनांनीं शाळा चालविल्या होत्या. पण या शाळांचा उद्देश चांगला असला तरी त्याला सरकारी पाठबळ नव्हतें व मौलवींचा उघड विरोध होता. यामुळें त्यांची फारशी प्रगति होऊं शकली नाहीं. या शाळांची

संख्या कधींच फारशी वाढली नाहीं. ( ३ ) देशभाषेंत शिक्षण देणाऱ्या धार्मिक शिक्षणाच्या शाळा:-यांचा उद्देश फक्त धार्मिक शिक्षण देण्याचा असून धर्मग्रंथांचें पाठांतर एवढेंच शिक्षण दिलें जात असे. या शाळांत शास्त्रें, विज्ञान, गणित, हे विषय शिकविण्यास बंदी होती. शिक्षणाचें काम मुल्ला मौलवींच्या हातीं होतें आणि छडीपासून घोडीपर्यंत ( टांगण्यापर्यंत ) शिक्षेचे भयंकर प्रकार सर्रास उपयोगांत आणिले जात. मुल्लामौलवींशिवाय इतर कोणीच साक्षरही होत नसत. साक्षरतेचें प्रमाण शेंकडा २ इतकें कमी होतें.

साम्राज्यशाही आणि मध्ययुगीन सरंजामशाही यांच्या या जुलुमाखालीं स्त्रियांचा सर्वांत अधिक छळ होत असे. नवव्या अगर दहाव्या वर्षी त्यांना एखाद्या गुलामाप्रमाणें लग्नाच्या नवऱ्याला विकण्यांत येत असे; आणि अति अल्प वयांत त्या आया बनत. कारखान्यांत अगर शेतावर स्त्रिया दिवसभर राबत आणि त्यांच्या कष्टांवर पुरुषवर्ग चैन करीत असे. पडद्याची दुष्ट चाल सर्वत्र अंमलांत होती. एकंदरींत साक्षरतेचें प्रमाण इतकें कमी असतांना स्त्रियांमध्यें हें प्रमाण किती कमी असेल याची कल्पनाच केलेली बरी. स्त्रियांत जागृति उत्पन्न करून या सर्व परिस्थितीला तोंड फोडणें भाग होतें. कार्यकर्त्या सुशिक्षित स्त्रियांनीं पडदानशीन बनून ही गोष्ट कशी साध्य केली, शेवटीं पडदा झुगारून स्त्रियांनीं दास्याचें जोखड कसें फेंकून दिलें व या प्रयत्नांमध्यें दोन वर्षांच्या अवधींत १४ स्त्री कार्यकर्त्यांना प्राणास मुकावें लागलें, याविषयीं विस्तारानें सांगण्याची ही जागा नाहीं. पण शिक्षण व संस्कृति यांच्या विकासाबरोबर स्त्रियांच्या परिस्थितींतही झपाट्यानें फरक पडत गेला ही गोष्ट अवश्य ध्यानांत ठेवली पाहिजे. पूर्वी पडद्यांत कोंडल्या गेलेल्या स्त्रिया आज पुरुषांच्या बरोबरीनें कारखान्यांत, ऑफिसांत ... एत सभेंत भाग घेत आहेत, यावरून तेथील समाजानें सुधारणेच्या मार्गावर किती वेगानें पाऊल टाकलें याची कल्पना येते. इतर देशांत ज्या प्रगतीला तीन चार शतकें लागलीं, ती प्रगति त्यांनीं अवघ्या १५-२० वर्षांत केली आहे. *उझ्बेक* व *ताजिक* ( काश्मीरच्या उत्तरेस हिमालयाच्या पलीकडील पायथ्याशीं हिंदुस्तानपासून फक्त नव्वद मैलांवर असलेलें सोविएत राष्ट्र ) या राष्ट्रांत अगदीं १९२९-३० सालापर्यंत जमीनदारवर्गाला हाताशीं धरून परकीय भांडवलशाह्या अशांतता निर्माण करण्याचा प्रयत्न करीत होत्या; त्यामुळें येथें खरी प्रगति यानंतरच झाली.

शिक्षणाचा प्रसार करण्यासाठीं प्रथम या देशांत चालू असलेल्या लिपी सोप्या कराव्या लागल्या. यांतील एका लिपींत १६२४ अक्षरें होतीं व मौलवींच्या शाळांत तीं सर्व आत्मसात करण्याला पंचवीस वर्षे लागत असत ! जेथें लिपि नव्हती तेथें नवीन लिपि देऊन त्यामध्यें पुस्तकें छापण्यांत आलीं. या मुस्लिम राष्ट्रांत टाईपरायटर हें क्रांतीचें एक साधन होतें यांत शंका नाहीं. मात्र या भाषांसाठीं नवीन प्रकारचे टाईपरायटर तयार करावे लागले.

या देशांत प्रगति कशी होत गेली याविषयीं पुढील आंकडयांवरून नीट कल्पना येते. साक्षरतेविषयीं *किरगीजिस्तान* ( लोकसंख्या १५ लक्ष ) आणि *उझ्बेकिस्तान* ( लोकसंख्या ६२ लक्ष ) यांविषयीं पुढील कोष्टक पाहा.

किरगीजिस्तान व उझ्बेकिस्तान–साक्षरता

| साल | किरगीझ | उझ्बेक | |
|---|---|---|---|
| १८९७ | शेंकडा ०.६ | शेंकडा ३.९ | १९४१ पर्यंत बहुतेक सर्व साक्षर झाले आहेत. |
| १९१३ | शेंकडा २ ते ५ | | |
| १९२६ | शेंकडा १५·१ | शेंकडा १०.६ | |
| १९३९ | ,, ७१.७ | ,, ६७.८ | |

मध्य अशियांतील शैक्षणिक प्रगति पाहाण्यासाठीं उदाहरणादाखल *तुर्कोमान* राष्ट्र घेऊं. या राष्ट्रांतील बराचसा प्रदेश वैराण वाळवंट असून लोकसंख्या फक्त १२ लक्ष आहे; म्हणजे लोकवस्ती महाराष्ट्रांतील एखाद्या जिल्ह्याएवढी, पण क्षेत्रफळ मात्र कितीतरी पटीनें अधिक.

तुर्कोमान राष्ट्रांतील साक्षरतेची वाढ ( शेंकडा प्रमाण )

| साल | पुरुष | स्त्रिया | एकंदरीनें |
|---|---|---|---|
| १९१३ | १.५ | — | ०.७ |
| १९२६ | १६.५ | ७.७ | १२.१ |
| १९३६ | ७३.३ | ६०.६ | ६७.० |
| १९४० | ८१.० | ७२.० | ७६.५ |

१९४१ सालीं बहुतेक सर्व लोक साक्षर झाले. साक्षरतेची योजना १५ वर्षांत यशस्वी झाली.

पहिल्या दोन पंचवार्षिक योजनांमुळें ( सन १९२९–३८ ) या राष्ट्राचा किती विकास झाला हें पुढील आंकडे दाखवितात.

तुर्कोमान–प्राथमिक व दुय्यम शिक्षणाची वाढ

| साल | १९२९ | १९३८ |
|---|---|---|
| शाळांची संख्या | १७० | १४४२ |
| शिक्षक ,, | ५४९ | ६३४२ |
| विद्यार्थी ,, | ? | २,०३,००० |

एकूण लोकवस्तीचा ⅙ भाग शाळेंत शिक्षण घेत होता आणि दर ३२ विद्यार्थ्यांना एक शिक्षक असें प्रमाण पडत होतें.

१९३९ सालीं तुर्कोमानमध्यें ५ विश्वविद्यालयीन कॉलेजें, ३३ टेक्निकल कॉलेजें आणि १८ शास्त्रीय संशोधनाच्या संस्था होत्या आणि ग्रंथालयांतून ३० लक्ष पुस्तकें प्रतिवर्षी वाचलीं जात होतीं.

सांस्कृतिक विकासाचीं इतर साधनें—पुस्तकें, वर्तमानपत्रें, सिनेमा, नाटयगृहें इत्यादि— कशीं वाढत आहेत याविषयीं १९३६ सालचें पुढील कोष्टक पाहा.

मध्य आशियांतील राष्ट्रांचा सांस्कृतिक विकास

| राष्ट्र | लोकसंख्या | पुस्तकें | प्रती | वर्तमान-पत्रें | नाटय-गृहें * | सिनेमा |
|---|---|---|---|---|---|---|
| ताजिकिस्तान | ( १५ लक्ष ) | २६९ | २९लक्ष | ५८ | ६ | ६८ |
| तुर्कोमान | ( १२ लक्ष ) | २५१ | २२ ,, | ६० | ८ | २१८ |
| उझ्बेकिस्तान | ( ६२ लक्ष ) | १२१३ | १,१२,, | २२२ | ३७ | २६४ |
| काझाकिस्तान | ( ६१ लक्ष ) | ४१५ | ५३ ,, | ३४२ | २६ | ९०० |
| किरगीझिस्तान | ( १५ लक्ष ) | १६४ | ११ ,, | ५३ | ५ | २११ |

१९४१ सालीं या पांच राष्ट्रांत मिळून देशभाषांतील १०३ नाटयगृहें व रशियन भाषेंतील ३७ नाटयगृहें होतीं. एकुण १·७ कोटि लोकसंख्या असलेल्या या पांच राष्ट्रांत १९४१ सालीं ७४०७ ग्रंथालयें होतीं.

स्वातंत्र्य, समानता, बंधुभाव आणि सहकार्य या तत्त्वांवर झालेली, अत्यंत मागासलेल्या राष्ट्रांची ही प्रगति, ब्रिटिशांच्या "पालक"त्वाखालीं आफ्रिका खंडांतील देशांत गेल्या ५० वर्षांत झालेल्या प्रगतीशीं ताडून पाहाण्यासारखी आहे.

सबंध ब्रिटिश ट्रॉपिकल आफ्रिकेंत देशभाषेंतील वर्तमानपत्रें, सिनेमा, नाटयगृहें, अथवा नभोवाणीकेंद्रें नाहींत. या प्रदेशाची लोकवस्ती ४ कोटि ( मध्य आशियाच्या अडीचपट ) पण ग्रंथालयांची संख्या शंभरांहून कमीच आहे. फक्त बायबल व क्रमिक पुस्तकें मात्र देशभाषांत छापण्यांत येतात; त्यांतही क्रमिक पुस्तकांपेक्षां बायबलच अधिक भाषांत छापतात ! या सर्व प्रदेशांत फक्त ६० दुय्यम शाळा आहेत

* सर्व नाटयगृहें देशभाषांतील नाटकें दाखवितात.

आणि एकही विश्वविद्यालय नाहीं. शाळकरी वयाच्या मुलांतील फक्त शेंकडा १५ ते २० मुलें प्राथमिक शाळांत जातात आणि यांमधील दर पांचापैकीं फक्त एक मूल पहिल्या इयत्तेच्या पुढील शिक्षण घेतें. बाकीचीं आधींच गळतात. शंभरांतून फक्त एक विद्यार्थी सहाव्या इयत्तेपर्यंत पोंचतो. या सर्व परिस्थितीवर अधिक कांहीं लिहिण्याची आवश्यकता नाहींच !

## उत्तर सायबेरिया

मध्य आशियाच्या उत्तरेस बर्फमय उत्तरसमुद्रापर्यंत आणि पूर्वेस बेरिंगच्या सामुद्रधुनीपर्यंत पसरलेल्या सोविएत देशाच्या या अवाढव्य प्रदेशांत फक्त १० लक्ष लोकवस्ती अगदीं विरळ विरळ वसलेली आहे. वर्षांतून नऊ महिने या प्रदेशांत जमिनीवर बर्फ पडलेला असतो आणि फक्त तीन महिने समुद्र व नद्या वाहातुकीला मोकळ्या असतात. या विस्तीर्ण प्रदेशांत रेलवेरस्ते कोठेंही नाहींत. कमालीच्या थंडीमुळें झाडेंझुडुपेंहि क्वचितच आढळतात. मासे, सील, आणि बर्फमय प्रदेशांतील केसाळ प्राणी हें येथील रहिवाशांचें अन्न असे आणि केसाळ कातडीं विकून ते फिरस्त्या रशियन व्यापाऱ्यांकडून याबदली इतर माल घेत असत. एस्किमो, लाप, चुकची इत्यादि निरनिराळ्या २६ जमाती या प्रदेशांत राहातात आणि त्यांमध्यें निरनिराळ्या २० भाषा प्रचलित आहेत.

झारशाहीच्या काळांत केसाळ कातड्यांसाठीं रशियन व्यापारी उत्तरेकडील जमातींना अक्षरशः लुबाडीत असत. एखादी सुई देऊन हरिणाचें कातडें घे; जादा अंमली बनविलेली व्होडका दारूची एक बाटली देऊन सेबलचें बहुमोल कातडें पळव; अशा गोष्टी सर्रास चालत असत. सोविएत क्रांति झाल्यावर कांहीं साहसी व निष्ठावंत लोकांनीं सुधारणेच्या अगदीं प्राथमिक अवस्थेंत असणाऱ्या या जनसमूहांना आधुनिक संस्कृतीप्रत आणण्याचें बिकट काम हातीं घेतलें. प्रथम उत्तरेकडील लोकसमूहांविषयीं कार्य करणाऱ्यांची एक संस्था स्थापण्यांत आली आणि तिच्याकडून या प्रदेशांतील संस्कृतिप्रसाराचें मार्गदर्शन करण्यांत येऊं लागलें.

या प्रदेशांत शाळा उघडणें सोपें नव्हतें. आधींच वस्ती अतिशय विरळ. तीस चाळीस मैलांच्या अंतरानें दोनचार बर्फमातीनें बांधलेल्या ठेंगण्या झोंपड्या दिसा-

वयाच्या. तसेंच तेथील भाषा शिकणें, त्यांचें व्याकरण तयार करणें, लिपी ठरविणें, तेथील सामाजिक चालीरीति समजावून घेणें इत्यादि गोष्टी पुऱ्या झाल्याशिवाय या प्रदेशांत फारशी शैक्षणिक प्रगति होणें शक्य नव्हतें. या उत्तरेकडील लोकांना हे रशियन लोक आपल्या भल्यासाठीं आले आहेत हें प्रथम खरेंच वाटेना. कारण आजवर त्यांचा संबंध फक्त लबाड रशियन व्यापाऱ्यांशीं आला होता. प्रथम एक *संस्कृतिकेंद्र* ( *Cultural Base* ) स्थापून तेथें सर्व आधुनिक सुखसोयी, वैद्यकीय मदत वगैरे व्यवस्था करण्यांत येत असे. नंतर शाळा उघडली जाई. शाळेसाठीं मुलांना कित्येक मैलांवरून आणावें लागे. म्हणून या प्रदेशांत शाळांबरोबर वसतिगृहांची सोय करणें आवश्यक होतें. प्रथम प्रथम शिक्षक व शाळा भटकणाऱ्या टोळ्यांबरोबर हिंडत असत. प्रवासी सिनेमांचाहि या संस्कृतिप्रसाराच्या कामीं फार उपयोग झाला.

वसतिगृहांत आलेल्या मुलांस तोंड धुणें, आंघोळ करणें, या प्राथमिक गोष्टींपासून शिकवावें लागे. निरनिराळ्या जमातींतील रूढी कधींकधीं एकमेकांस विरोधी असत व त्यामुळें अवघड प्रसंग निर्माण होत. कोणाला मिठावांचून अन्न चालत नसे तर कोणाला तें सर्वस्वीं निषिद्ध. या मुलांना पलंगाची व एकटें झोंपण्याची भीति वाटे. भुतांखेतांवरील विश्वास व "*शमान*"चें (धर्मगुरु) वर्चस्व मोडून काढण्यासाठीं अनेक युक्त्या योजाव्या लागल्या. हळूहळू या प्रयत्नांस यश येऊं लागलें. त्या जमातींतील कांहीं तरुण स्त्रीपुरुष शिक्षक, डॉक्टर, वैमानिक वगैरे बनल्यावर शिक्षणाचा विकास झपाट्यानें होऊं लागला. १९३४ सालीं या प्रदेशांतील शेंकडा ८० मुलें शिकूं लागलीं होतीं व शेंकडा २६ मुली शिकत होत्या. १९३२ सालीं एकट्या चुकोट द्वीपकल्पांतूनच पांच विद्यार्थी व एक विद्यार्थिनी उच्च शिक्षणासाठीं मॉस्को येथील कॉलेजांत प्रविष्ट झालीं. या प्रदेशांत प्रथमच गेलेल्या संस्कृतिदूतांच्या जीवनाचा वृत्तांत रोमांचकारी आहे. *सेमूश्किन* नांवाच्या लेखकानें (" *Children of the Soviet Arctic* ") नांवांचें पुस्तक लिहून त्यांमध्यें चूकोट द्वीपकल्पांतील संस्कृतिकेंद्रांत आलेले विलक्षण अनुभव ग्रथित केले आहेत.

## *याकुतिया*

या उत्तरेकडील प्रदेशांत पासिफिक समुद्रकिनाऱ्यावर असलेल्या *याकुतिय*

या नवीन स्वायत्त राष्ट्रांत शैक्षणिक प्रगति कशी झाली याची माहिती येथें थोडक्यांत दिली आहे. याकूत देशाचा विस्तार यूरोपखंडाएवढा असून सर्व लोकवस्ती भटक्या टोळ्यांची होती. एकूण लोकसंख्या एक लक्ष सुद्धां नाहीं. या प्रदेशांत अन्नाची विलक्षण टंचाई होती; नासकें दूध व मासे हेंच काय तें अन्न. आणि एका खोलीच्या ठेंगण्या झोपडींत सर्व कुटुंब आपल्या पाळीव जनावरांसह राहात असे. क्षयाच्या विकारामुळें अनेक लोक मृत्युमुखीं पडत असत; आणि ट्राकोमा या नेत्रविकारानें चारपंचमांश लोक आंधळे बनले होते. कांहीं टोळ्या हळुहळु साफ नामशेष होणाऱ्या मार्गास लागल्या होत्या. याकूत स्त्री तर सर्वस्वीं गुलाम होती.

झारशाहींत याकूती भाषेची गळचेपी झालेली होती. ज्या थोड्या शाळा होत्या त्यांमध्यें रशियन भाषेंतून शिक्षण देण्यांत येई आणि बहुतेक विद्यार्थी रशियन असत; याकून विद्यार्थी अगदीं विरळा. साक्षरतेचें प्रमाण फक्त २ टक्के होतें. याकूती भाषेला लिपीही नव्हती. अशा स्थितींत संस्कृतीच्या सोविएत मिशनऱ्यांनीं क्रांती-नंतर आपलें पाऊल इकडे वळविलें. अवघ्या पंधरा वर्षांत या प्रदेशाची विलक्षण प्रगति झाली असून *याकूतिया* हें आतां स्वायत्त राष्ट्र बनलें आहे. त्यांची स्वतांची सोविएत सभा व कोमिसार (मंत्रि) मंडळ आहेत. आपण फक्त शैक्षणिक व सांस्कृतिक प्रगतीचा विचार करूं.

१९३६ सालीं शाळकरी वयाचीं सर्व मुलें शाळेंत जाऊं लागलीं होतीं. सतरा वर्तमानपत्रें प्रसिद्ध होत असून त्यांमधील नऊ याकूती भाषेंत आहेत. *याकूत्स्का* (लोकसंख्या २५,०००) या राजधानीच्या शहरांतील ग्रंथालयांत २ लक्ष ग्रंथ आहेत. तसेंच तेथें एक सुंदर चित्रप्रदर्शन, अनेक सिनेमागृहें व नभोवाणी केंद्रेंहि आहेत. याकूती लोकगीतांचें संशोधन होत असून त्या भाषेंत नाटकें लिहिलीं जात आहेत. १९३६ सालापासून मॉस्कोमधील सुप्रसिद्ध नाट्यसंस्थेंत शिक्षण घेतलेले याकूती नट याकूती भाषेंत नाटकें करून दाखवीत आहेत.

# सोविएत शिक्षणाचे विशेष

# १३

सोविएत देशांतील निरनिराळ्या शिक्षणसंस्था, त्यांमधील अभ्यासक्रम, विद्यार्थीवर्ग, शिक्षक, प्रौढ शिक्षण व सांस्कृतिक विकास यांची सोय, या सर्वांचें स्वरूप आपण आतांपर्यंत पाहिलें. आतां इतर देशांच्या तुलनेनें सोविएत शिक्षणामध्यें वैशिष्ट्यपूर्ण गोष्टी कोणत्या आढळतात याचें समालोचन या प्रकरणांत करण्याचें योजिलें आहे.

सोविएत शिक्षणाचें चित्र नजरेसमोर उभें केल्यावर त्यामध्यें जो विशेष ठळकपणें प्रथम ध्यानांत येतो तो हा कीं, सोविएत देशांत शिक्षणानें *सार्वत्रिक स्वरूप* (*Universal Education*) धारण केलें आहे. प्रत्येक सोविएत मुलाला आपल्या उपजत शक्तींना अनुरूप असें शिक्षण घेण्याचा हक्क आहे व तो बजावण्याची त्याला प्रत्यक्ष संधि व साधनें मिळतात. वंशभेद, धर्मभेद, जातिभेद, लिंगभेद, अथवा भिन्न राष्ट्रीयत्व यापैकीं कोणतीही गोष्ट सोविएत मुलाच्या शिक्षणाआड येऊं शकत नाहीं. ज्ञानमंदिराचे दरवाजे सर्वांना सारख्याच प्रमाणांत खुले आहेत. शिक्षणावर सर्व जनतेचा हक्क आहे आणि तो केवळ कायद्याच्या कागदोपत्रांत नमूद केलेला नसून त्याचा प्रत्यक्ष उपभोग घेण्यास सर्व प्रकारें उत्तेजन देण्यांत येतें.

सार्वत्रिक शिक्षणांतील *पहिली* महत्त्वाची गोष्ट म्हणजे मातृभाषेंतून शिक्षण, आणि प्रादेशिक भाषा व संस्कृति यांचें संवर्धन. सर्व राष्ट्रें, स्वायत्त प्रदेश, आणि अल्पसंख्याक जमाती व लोकसमूह यांना आपापल्या मातृभाषेंतून शिक्षण घेण्याची भरपूर तरतूद सोविएत यूनियननें केलेली आहे. आजकाल सोविएत यूनियन-बाहेरील जगांत भाषा व संस्कृति यांच्या गळचेपीची ओरड सर्वत्र ऐकूं येत आहे. तेथें मात्र प्रादेशिक भाषा व संस्कृति यांची अत्यंत आपुलकीनें जोपासना होत आहे. यूक्रेन, श्वेतरशिया यांसारखीं पूर्वीपासून सुधारलेलीं राष्ट्रें आतां आपली भाषा, वाङ्मय व संस्कृती यांचें स्वतंत्रपणें संवर्धन करीत आहेतच. शिवाय समाजवादी क्रांतीनंतर अझरबैजान, तार्तार, ताजिकिस्तान इत्यादि मुस्लिम राष्ट्रें मध्ययुगीन अज्ञाननिद्रेंतून प्रथमच खडबडून जागीं झालीं असून तींहि वरील बाबतींत आपल्या सुधारलेल्या बांधवांच्या जोडीला आलीं आहेत. सरंजामशाहीपासून अर्वाचीन युगापर्यंतचा मार्ग आक्रमण्यास इतर राष्ट्रांनीं सामान्यतः १५० ते ३०० वर्षें घेतलीं. परंतु ह्या दीर्घ कालखंडांतील सुधारणा या राष्ट्रांनीं अवघ्या १५।२० वर्षांच्या एका उडींत आत्मसात केल्या आहेत. सर्वांच्या पुढें असलेलें राष्ट्र जें रशिया त्यानें इतर सोविएत राष्ट्रांच्या या प्रगतीस विरोध न करतां उलट त्यांना सर्व प्रकारें मदत केली, म्हणू-नच हें साध्य झालें. तीच गोष्ट संस्कृतीच्या प्राथमिक अवस्थेंत असलेल्या अनेक भटक्या टोळ्यांची व वन्य आदिवासी जमातींची. यांपैकीं कांहीं तर रानटी अवस्थेंत होत्या. त्यांना सहानुभूतीनें वागवून त्यांची योग्य दिशेनें प्रगति होण्यास त्यांस साहाय्य करण्यांत आलें, म्हणूनच अवघ्या १५।२० वर्षांत, आधुनिक संस्कृतीच्या प्रवाहांत त्या सामील होऊं शकल्या. हजार दीड हजार वर्षांचे प्रदीर्घ सरंजामशाही युग त्यांना अनुभवावें लागलें नाहींच. पण आधुनिक संस्कृतीच्या निष्ठुर आघातामुळें इतरत्र मागासलेल्या मानवसमूहांची झालेली दुर्दशा व दैना त्यांच्या बाबतींत टळली.

या सर्व लोकसमूहांचा सांस्कृतिक विकास साधण्यासाठीं कोण सायास पडले, कोणत्या अडचणी आल्या व त्या कशा दूर करण्यांत आल्या याची कल्पना देण्याचा प्रयत्न मागील एका प्रकरणांत केला आहे. एका गोष्टीचा उल्लेख येथें अवश्य केला पाहिजे. या मागासलेल्या समाजांच्या संस्कृतीचें संगोपन करतांना, जुन्या संस्कृतीं-मधील पडदा, बालविवाह, मंत्रतंत्र, जादूटोणा इत्यादि वैयक्तिक व सामाजिक दृष्ट्या दुष्ट अशा रूढींचें निर्मूलन करणें अतिशय अगत्याचें होतें. प्रादेशिक संस्कृतीची

जोपासना करणें म्हणजे त्यांच्यामधील रानटी अवशेष कायम ठेवणें नव्हे, ही गोष्ट लेनिनची पत्नी *क्रुप्सकाया* हिनें असंदिग्धपणें स्पष्ट केली आहे. जुन्या संस्कृतींतील चांगल्या चाली व रूढी तेवढ्या कायम राहून त्या संस्कृतींचे ओघ शेवटीं आधुनिक संस्कृतीच्या जागतिक प्रवाहांत सामील झाले पाहिजेत, हें तत्त्व कित्येक ब्रिटिश व इतर मानवेतिहासज्ञ ( *Anthropologists* ) अद्यापहि मान्य करीत नाहींत; उलट वन्य जमातींना प्रदर्शनीय वस्तूंप्रमाणें अलग राखण्याचा आग्रह धरतात, हा फरक अवश्य ध्यानांत घेण्यासारखा आहे.

चाळीस कोटि हिंदी लोक आतां साम्राज्यशाहीचें जोखड लवकरच फेंकून देतील यांत शंका नाहीं. त्यानंतर हिंदुस्तानांतील अनेक राष्ट्रें, जमाती व लोकसमूह यांच्या भाषा व संस्कृती यांचा योग्य परिपोष व्हावा; तसेंच कातकरी, वारली, गोंड, भिल्ल, नागा इत्यादि वन्य जमातींना त्यांच्या प्राथमिक संस्कृतीपासून आधुनिक हिंदी संस्कृतीच्या युगांत आणावें; या हेतूनें सांस्कृतिक विकासाची योजना आंखतांना आपल्याला सोविएत देशापासून पुष्कळ गोष्टी शिकतां येतील. गोखले अर्थशास्त्र संशोधन संस्थेचे प्रि. ध. रा. गाडगीळ यांनीं आपल्या "संयुक्त हिंदुस्थान" ( *Federating India pp. 74–75* ) या पुस्तकांत हेंच मत व्यक्त केलें आहे.

ब्रिटिश साम्राज्यांत सर्रास अवलंबण्यांत येणारें, अंकित राष्ट्रांच्या भाषा व संस्कृती यांच्या पद्धतशीर गळचेपीचें, धोरण आपल्या सर्वांच्या परिचयाचें आहे. उदाहरणार्थ महाराष्ट्राचें संस्कृतिकेंद्र जें पुणें तेथेंही दुय्यम शिक्षण परवांपर्यंत जेत्यांच्या इंग्रजी भाषेंतून दिलें जात असे; आणि उच्चशिक्षण अद्यापहि इंग्रजींतूनच दिलें जात आहे. आश्चर्याची गोष्ट ही कीं, शास्त्रविषय मराठींतून शिकविणें अशक्य होईल असें म्हणणारे विद्वान् अजूनहि सांपडतात! ब्रिटिशांच्या "पालक" त्वाखालीं असलेल्या आफ्रिकन वसाहतींची स्थिति तर याहूनही अनुकंपनीय आहे. भाषा व संस्कृति यांचें संवर्धन तर राहोच; पण तेथील कित्येक जमातीच्या जमाती मृत्यु-पंथाला लागल्या आहेत.

ब्रिटिश राजवट तर बोलून चालून साम्राज्यशाही; पण इतर देशांतहि अल्प-संख्यांकांच्या शैक्षणिक व सांस्कृतिक विकासाबद्दल थोड्याफार प्रमाणांत हेंच धोरण

आहे आणि उत्तेजन तर कुठेंच दिलें जात नाहीं. पोलंड, युगोस्लाव्हिया इत्यादि युरोपीय देशांतील अल्पसंख्यांकांची युद्धपूर्व कालांतील अगतिक अवस्था सर्वांस माहीत आहे. या महायुद्धानंतर, या देशांतील नव्या लोकशाही सरकारांनीं हा प्रश्न बराचसा सोविएत यूनियनच्या पद्धतीनें सोडविण्यास आतां सुरवात केली आहे. ही झाली इतर देशांची गोष्ट. पण स्वातंत्र्याचें माहेरघर असा जिचा जगभर बडेजाव त्या खुद्द अमेरिकेंत काय स्थिति दिसते? निरक्षरतेचे खालील आंकडे बोलके आहेत.

अमेरिकेंतील निरक्षरता

| | | | |
|---|---|---|---|
| एकंदरीत प्रमाण | शेंकडा | ४·३ | टक्के |
| नीग्रो जमात | ,, | १६ | ,, |
| रेड इंडियन वगैरे इतर जमाती | ,, | २५ | ,, |

तरी बरें! अमेरिका हें सर्वांत समृद्ध व सुसंस्कृत राष्ट्र आहे!

अमेरिकेंतील वंशभेदाचें प्रदर्शन अत्यंत उद्वेगकारक आहे यांत शंका नाहीं. नीग्रोंची लोकसंख्या सवाकोटि—महाराष्ट्राएवढी असून एकूण लोकसंख्येच्या एकदशांश आहे. पण, त्यांना अलग शाळांत शिक्षण घ्यावें लागतें. प्रख्यात नीग्रो गायक *पॉल रोबसन* यानें १९३४ सालीं सोविएत देशांत जलशांचा दौरा काढला होता. जगांतील अत्यंत पददलित जमातीचा प्रतिनिधि म्हणून सोविएत देशांत त्याला सर्वत्र इतकी स्नेह-भावना आणि बंधुभाव अनुभवास आला, कीं त्यानें स्वतांच्या मुलाला शिक्षणासाठीं सोविएत देशांत पाठविण्याचें ठरविलें. अवघ्या सहा महिन्यांच्या अवधींत त्याला *पॉवलाच्या* (त्याचा मुलगा) मनोवृत्तींत विलक्षण फरक झालेला दिसला. अमेरिकेंत असतांना जो छोकरा अबोल, भिडस्त व नेहमीं जणुं काय प्रतीकाराच्या पवित्र्यांत, असा दिसत असे, तोच एवढ्या थोड्या काळांत आनंदी, बोलका व मनमोकळा बनला आणि छाती पुढें काढून ऐटींत चालतांना दिसूं लागला. कारण उघड आहे. सोविएत देशांत त्याला अमेरिकेप्रमाणें अपमानाचें व हीनतेचें जिणें अनुभवावें लागत नव्हतें. उलट सर्व विद्यार्थी त्याला बरोबरीचा म्हणून वागवीत होते. वंशभेदाचें किळसवाणें

प्रदर्शन करणारे अमेरिकन लोक आपल्याला स्वातंत्र्याचे पाठिराखे समजतात व आपण ही त्यांची प्रौढी ऐकून घेतों, ही गोष्ट मोठी नवलाची खरी !

मातृभाषेंतून शिक्षण, आणि भाषा, वाङ्मय व संस्कृति यांची जोपासना, यामुळें या मागासलेल्या सोविएत प्रदेशांत ज्ञानाचा प्रसार अतिशय वेगानें झाला, इतकेंच नव्हे, तर त्यामुळें हीं सर्व राष्ट्रें व जमाती यांची एक अपूर्व व अभेद्य अशी एकजूट झाली आहे. मागासलेल्या राष्ट्रांना पुढें आणण्यासाठीं, इतर सुधारलेल्या राष्ट्रांमध्यें त्यांनीं स्वतांसाठीं स्थान मिळवावें यासाठीं, तेथें पद्धतशीर प्रयत्न करण्यांत आले. याचीं अनेक उदाहरणें देतां येतील. हिंदुस्तानशेजारच्या *ताजिकिस्तान व उज्बेकिस्तान* या राष्ट्रांची गोष्ट घ्या. १९२० सालीं ताशकंद येथें विश्वविद्यालय उघडण्यांत आलें, त्यावेळीं शैक्षणिक पूर्वतयारी बरीच कमी असली, तरी ज्या ज्या ताजिक विद्यार्थ्याला कॉलेजांत यावयाचें असेल त्याला त्याला प्रवेश मिळे. १९४० सालीं सुरू झालेला, उच्च शिक्षणासाठीं फी घेण्याचा नियम, मध्य आशियांतील राष्ट्रांना लागू करण्यांत आला नाहीं. सन १९४० ते ४५ या युद्धकाळांत मॉस्कोमधील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या इतर देशांतल्याप्रमाणें, सैनिक भरतीमुळें, साहजिक घटली. पण *ताशकंद* विश्वविद्यालयांतील विद्यार्थ्यांस मात्र सैनिक होण्यापासून परावृत्त करण्यांत आलें ! हेतु हा कीं, *या राष्ट्रांत नवीनच उच्चविद्याविभूषित वर्ग निर्माण होत होता, त्यामध्यें खंड पडून तें राष्ट्र मागें पडूं नये*. यामुळें ताशकंदमधील कॉलेज विद्यार्थ्यांची संख्या घटली नाहीं, उलट वाढली.

प्रादेशिक संस्कृति व वाङ्मय यांच्या संवर्धनामुळें या राष्ट्रांमध्यें विलक्षण राष्ट्रीय जागृति झाली आहे. पण हा राष्ट्राभिमान संकुचित, दुरभिमानी, व स्वार्थी नसून त्याच्या जोडीला राष्ट्रीय समानता, सहकार्य व बंधुभाव यांवर आधारलेली आंतरराष्ट्रीय भावनाही खंबीरपणें रुजली आहे. एका राष्ट्राची वैशिष्ट्यपूर्ण संस्कृति केवळ त्यांच्या स्वतांच्याच मालकीची आतां राहिलेली नसून ती सर्वांची झाली आहे; व अशा रीतीनें एक नवीन आंतरराष्ट्रीय संस्कृति सोविएत देशांत जन्मास येत आहे. राष्ट्राभिमान व आंतरराष्ट्रीय बंधुभाव या भावना एकमेकांना विरोधी आहेत असा आपल्याकडील जबाबदार पुढाऱ्यांचा अद्यापहि समज आहे. उलट, खरा राष्ट्रीय बाणा आणि आंतरराष्ट्रीय स्नेहभाव हे एकमेकांना *विरोधी नसून* पूरक असतात याचें सोविएत देशानें उदाहरण घालून दिलेलें आहे.

सार्वत्रिक शिक्षणामुळें साधलेली *दुसरी* महत्त्वाची गोष्ट म्हणजे सोविएत स्त्रियांनीं गेल्या पंचवीस वर्षांत केलेली विलक्षण प्रगति. क्रांतीपूर्वी इतर पाश्चात्य देशांतील स्त्रियांपेक्षां रशियांतील स्त्रिया खूपच मागासलेल्या होत्या आणि मध्य आशियांतील मुस्लिम स्त्रियांची स्थिति कित्येक अंशीं हिंदी स्त्रियांहूनही वाईट होती. या सर्व आतां सुशिक्षित होऊन समाजजीवनाच्या बहुविध शाखांत पुरुषांच्या बरोबरीनें भाग घेत आहेत. पडदा व स्त्री–दास्याच्या इतर मध्ययुगीन कल्पना यांनीं जखडलेल्या ताजिक स्त्रीचें उदाहरण घ्या. ती आपली सर्वांत जवळची सोविएत शेजारीण आहे. या ताजिक स्त्रीनें पडदा तर पंधरा वर्षांपूर्वीच झुगारून दिला. शतकानुशतकें चालत आलेले परंपरागत दास्यबंध तोडून ती आतां सामाजिक जीवनांत व राज्यकारभारांत पुरुषांच्या बरोबरीनें भाग घेते. *“सैपाकणीनें सुद्धां राज्य-शकट हांकावयास शिकलें पाहिजे”* ( *Every kitchenmaid must learn to govern* ) हें लेनिनचें वचन आतां सार्थ झालें आहे.

ही गोष्ट अर्थातच सुखासुखी झाली नाहीं. त्यासाठीं महत् प्रयास पडले आणि अनेक स्त्रियांना त्याप्रीत्यर्थ बलिदान करावें लागलें. पण पाश्चात्य राष्ट्रांत अनेक दशकें झगडूनही न मिळालेलें स्वातंत्र्य व समानता, मध्ययुगांतून बाहेर पडलेल्या या ताजिक स्त्रीनें केवळ १०।१२ वर्षांत संपादन केली, ही गोष्ट अपूर्वच म्हटली पाहिजे. वन्य जमातींतील उपेक्षित स्त्री आतां मॉस्कोच्या विश्वविद्यालयांत पुरुषांच्या बरोबरीनें शिक्षण घेतांना दिसते. हें परिवर्तन किती विलक्षण आहे ! ज्यावेळीं सुधारलेल्या जर्मन राष्ट्रांत स्त्रीला पुन्हा एकदां “ चूल व मूल ” यांच्या कोंडवाड्यांत जबरदस्तीनें कोंबण्यांत आलें होतें आणि इतर पाश्चात्य राष्ट्रें हें सर्व उघड्या डोळ्यांनीं पाहात होतीं, ( व कांहींजण त्याचें कौतुक करीत होते ! ) त्याचवेळीं सोविएत देशांत मध्ययुगीन अथवा त्याहूनही प्राथमिक अवस्थेंत असलेली, अक्षरशः गुलाम असलेली स्त्री, आपल्या कित्येक शतकांच्या दास्यशृंखला धडाक्यानें तोडून टाकून पुरुषांच्या बरोबरीला येत होती. आणि या कामीं तिला समाजाचें सहकार्य व साहाय्य सर्वतोपरी मिळत होतें. सन १९३० ते ४० या दशकांतील हीं विरोधी दृश्यें संस्कृतीच्या प्रगतीचीं व अधोगतीचीं उत्तम निदर्शक आहेत.

सोविएत स्त्रीनें इतर पाश्चात्य स्त्रियांप्रमाणें निव्वळ कागदी हक्क मिळविलेले नाहींत. शिक्षणाची समान संधि, व्यवसायांत समान संधि व हक्क, मोफत वैद्यकीय मदत,

प्रसूतीपूर्वी व नंतर भरपगारी रज़ा, बालसंस्था, सामायिक जेवणघरें इत्यादि सोयी उपलब्ध झाल्यामुळें तिला हे हक्क प्रत्यक्ष उपभोगतां येतात. सोविएत स्त्रियांच्या प्रगतीचे १९३८ सालचे पुढील आंकडे पाहा. उच्चशिक्षण घेणाऱ्या कॉलेजविद्यार्थ्यांत विद्यार्थिनींचें प्रमाण शेंकडा ४३·१ टक्के होतें; आणि मेडिकल कॉलेजांत हें प्रमाण शेंकडा ६७·५ होतें. झारशाहींत फक्त १९०० स्त्रीडॉक्टर होत्या, तर १९३९ मध्यें त्यांची संख्या ७२,६०० झाली, *अडतीस पट वाढली*; आज एकूण डॉक्टरांच्या संख्येंत स्त्रियांचें प्रमाण शेंकडा ६० हून अधिक आहे, असें १९४४ सालीं हिंदुस्तानांत आलेल्या मा. बोरीस ओमेव या सोविएत सर्जननें सांगितलें. प्राथमिक व दुय्यम शिक्षकांमध्यें स्त्रियाच बहुसंख्य आहेत. स्त्री शाळाप्रमुखाच्या हाताखालीं काम करण्यास पुरुषांना तेथें कमीपणा वाटत नाहीं. हें मुद्दाम लिहिण्याचें कारण असें कीं, उदारमतवादी व सुधारलेल्या इंग्लंडमधील पुरुषशिक्षकांनीं आपणांस स्त्री शाळाप्रमुखांच्या हाताखालीं नेमल्याबद्दल सन १९४५ मध्यें निषेध व्यक्त केला होता.

सार्वत्रिक शिक्षणांतील *तिसरी* महत्त्वाची गोष्ट अशी कीं सोविएत यूनियनमध्यें शहरांच्या बरोबरीनें खेडयांतील शिक्षणाची तरतूद करण्यांत आली आहे. खेड्यांतील शिक्षणाचें महत्त्व आणि खेडयांतील शिक्षकाचें महत्त्वपूर्ण स्थान व त्याला मिळणारा मान यांची कल्पना अन्यत्र देण्यांत आली आहे. शहरांतील सुधारलेलें जीवन व सुख-सोयी खेडूत जनतेपर्यंत पोंचाव्या आणि अशा रीतीनें नागरी व खेडूत जीवन यांमध्यें नेहमीं आढळून येणारें अंतर व द्वंद्व कमी व्हावें, या दृष्टीनें जेवढे प्रयत्न सोविएत देशांत करण्यांत आले तेवढे इतर कोणत्याही देशांत करण्यांत आलेले नाहींत. सोविएत यूनियनमध्यें परवांच (जुलै १९४५) जाऊन आलेले सुप्रसिद्ध संशोधक *प्रो. मेघनाद साहा* यांनीं सांगितलेली खालील हकीगत खेड्यांतील या अपूर्व प्रगतीची साक्ष पटविते. खेड्यांतील परिस्थिति खरोखर कशी आहे हें पाहाण्यासाठीं वाटाड्यानें निर्देशिलेल्या खेडयाला भेट न देतां त्यांनीं दुसऱ्याच एका सामुदायिक शेताला भेट दिली. शाळा, शिशुगृह, दवाखाना, व खेड्यांतील आरोग्यदायक वातावरण आणि रेडियोसारख्या आधुनिक साधनांनीं युक्त असलेलीं शेतकऱ्यांचीं तीं छोटेखानी घरें पाहिल्यावर, खेडूत जनतेच्या उद्धाराचा अहर्निश ध्यास घेतलेल्या गांधीजींची

त्यांना आठवण झाली. खेड्यांची प्रगति कोणत्या दिशेनें झाली पाहिजे याचा प्रत्यक्ष नमुना म्हणून हें सोविएत सामुदायिक शेत गांधीजींना दाखवावें असें प्रो. साहा यांना त्याक्षणीं वाटलें. युद्धोत्तर पुनर्घटनेसाठीं योजलेल्या सोविएत पंचवार्षिक कार्यक्रमानुसार विद्युत् केंद्रांची संख्या इतकी वाढणार आहे कीं, अनेक खेड्यांत शेतकऱ्यांच्या घरीं दारीं वीज खेळणार आहे. ही प्रगति अर्थातच शैक्षणिक व सांस्कृतिक विकासाशिवाय झालेली नाहीं ही गोष्ट उघड आहे. उदाहरण म्हणून विनित्स्का प्रांतांतील लुकाशेवका हें खेडें घ्या. झारशाहींत या खेड्यांतून दोनचार शाळामास्तर, पोस्टमास्तर किंवा इतर असेच कांहीं थोडेसे लोक शिकले असतील. पण सन १९२९ ते ३७ या पहिल्या दोन पंचवार्षिक योजनांच्या काळांत या खेड्यांतील रहिवाशांमधून ४८ शिक्षक, १ रेलवे इंजिनियर, ३ वैमानिक, १ कलावंत, २ डॉक्टर, ६ शेतींतज्ज्ञ, १ जहाजाचा कप्तान, ४२ ट्रॅक्टर ड्रायव्हर आणि १८ शेतीविषयक इतर यंत्रतज्ज्ञ शिकून तयार झाले.

खेडूत जनतेच्या शैक्षणिक प्रगतीचें एक गमक साक्षरता हें आहे. निरक्षरतेविरुद्ध निघालेल्या प्रचंड मोहिमेचा वृत्तांत मागें दिलेलाच आहे. गेल्या महायुद्धांत लालसेनेंत दाखल झालेला प्रत्येक सैनिक साक्षर होता. उलट, इंग्लंडमध्यें सैन्यांत दाखल झालेल्या तरुणांत शेंकडा २ ते २·५ टक्के तरुण निरक्षर होते आणि अमेरिकेंत अद्यापहि एकंदरींत ४ टक्के व कांहीं जमातींत २५ टक्केपर्यंत निरक्षरता आहे, ही नवलपूर्ण गोष्ट आपण पाहिली. नवलपूर्ण म्हणावयाचें कारण असें कीं या देशांत प्राथमिक शिक्षण सक्तीचें झाल्याला कित्येक दशकें (सुमारें ७५ वर्षें) लोटलीं आहेत, तर सोविएत देशांत या गोष्टीला फक्त १५ वर्षें झालीं आहेत!

आतां आपण हिंदुस्तानची परिस्थिति पाहूं. (सर्व आंकडे ब्रिटिश अंमलाखालील हिंदुस्तानविषयीं आहेत. संस्थानें वगळलीं आहेत.) *साक्षरतेचें प्रमाण* (सही करतां येणाऱ्या इसमांचें प्रमाण) १९४१ सालीं शेंकडा १४·३ टक्के होतें. स्त्रियांमध्यें हें प्रमाण अर्थातच फार कमी आहे. सर्वांत अधिक साक्षरता त्रावणकोर संस्थानांत आहे (शेंकडा ४७·१ टक्के). *प्राथमिक शिक्षण*:– शाळकरी वयाच्या ६ कोटि मुलांपैकीं फक्त १२० लक्ष मुलें (एक पंचमांश) प्राथमिक शाळेंत जातात. निरनिराळ्या इयत्तांमधील मुलांची संख्या पाहिल्यास असें दिसतें कीं, बालवर्गांत दाखल

होणाऱ्या प्रत्येक चार मुलांपैकी फक्त एक मूल चौथीपर्यंत टिकतें. गळणाऱ्या मुलांपैकीं बरीचशीं मुलें प्रौढपणीं पुन्हा निरक्षर होत असावीं असा तज्ज्ञांचा अंदाज आहे. *दुय्यम शिक्षण*:–मिडलूस्कूलमध्यें ( मराठी पांचवी ते सातवी आणि इंग्रजी १ ते ३ ) एकूण ८ लक्ष मुलें आहेत आणि इंग्रजी चार ते सात इयत्तांमध्यें ४½ लक्ष विद्यार्थी आहेत. हायस्कूलांची संख्या; शहरांत २३१० व खेडेगांवात ( ५००० वस्तीखालील गांवांत ) १५५१, एकूण ३८६१. शहरांतील लोकवस्ती एकूण लोकसंख्येच्या दहावा हिस्सा आहे, पण हायस्कूलांचें प्रमाण मात्र शहरांत ⅔ आहे. म्हणजेच खेड्यांतील विद्यार्थ्याला शहरी विद्यार्थ्यांच्या मानानें दुय्यम शिक्षण मिळणें कठीण आहे याची कल्पना या आंकड्यांवरुन येते. *स्त्रीशिक्षण*:— प्राथमिक शाळांत विद्यार्थिनींची संख्या एकूण संख्येच्या चौथा हिस्सा आहे तर दुय्यम शाळांत व कॉलेजांत ही संख्या दहाव्या हिश्शाहूनही कमी आहे.

सन १९४४–४५ च्या मुंबई इलाख्याच्या शैक्षणिक अहवालावरून असें दिसतें कीं १९४३–४४ या वर्षांत इलाख्यांतील एकूण शाळांपैकीं १००० शाळा कमी झाल्या ! ( एकूण संख्या २२,००० होती. ) उलट घनघोर महायुद्ध चालू असतांही सोविएत यूनियनमध्यें शाळांच्या संख्येंत २००० नव्या शाळांची भर पडली ! हिंदुस्थानांतील ज्या प्रांतांना जपानी आक्रमणाची प्रत्यक्ष झळ लागली आणि जेथें दुष्काळानें थैमान घातलें ( उदाहरणार्थ बंगाल देशांत ) तेथें तर हजारों शाळा ओस पडल्या आहेत.

या सर्व आंकड्यावरून हिंदुस्थानातील शिक्षणाचा प्रश्न किती प्रचंड आहे याची कल्पना येईल व येथेंहि सोव्हिएतमध्यें अंमलांत आणलेल्या व्यापक योजनांची आवश्यकता आहे, हें दिसून येईल.

सोविएत देशांतील सार्वत्रिक शिक्षणाचा शेवटचा आणि *सर्वांत महत्त्वाचा विशेष* हा, कीं सर्व मुलांस शिक्षणाची *समान संधि* मिळते, मग त्यांचे पालक कोणत्याही दर्जाचे असोत. सोविएत देशांत वर्गविरहित समाजपद्धति असल्यामुळें तेथें, इतर देशांप्रमाणें शिक्षणांत विषमता दिसून येत नाहीं. शिक्षणाच्या सोयींचा फक्त उच्च व मध्यमवर्गीय मुलांनाच कसा उपयोग होतो आणि कामगार, शेतकरी

व इतर गरीब जनता यांच्या मुलांना शिक्षण मिळणें किती दुरापास्त होऊन बसते याची आपल्या देशांत प्रत्येकाला पूर्ण जाणीव आहे. याचें एक कारण हिंदुस्तानचे पारतंत्र्य हें आहे यांत शंका नाहीं.

परंतु वैभवाच्या शिखरावर असलेल्या स्वतंत्र इंग्लंड देशांत काय परिस्थिति आहे ? श्रीमंत व मध्यम वर्गांतील मुलें प्रथम खाजगी शाळेंत शिकून १३ व्या वर्षी इटन, हॅरो यांसारख्या खर्चिक "पब्लिक स्कूल" शाळांमध्यें जातात; आणि नंतर १८ व्या वर्षी कॉलेजांत प्रवेश करतात; अथवा पिढीजाद "धंद्यांत" (*Business*) पडतात. परंतु बहुसंख्य (९२ टक्के) मुलें ५ व्या वर्षापासून १४ व्या वर्षापर्यंत प्राथमिक शाळेंत शिकतात. यांमधील १३ टक्के मुलें ११ व्या वर्षी दुय्यम शाळेंत जातात आणि त्यांपैकीं कांहींनीं परीक्षा देऊन शिष्यवृत्ति अथवा नादारी मिळविलेली असते. दुय्यम शाळेंतील मोजकीं मुलें शिष्यवृत्तींच्या मदतीनें कॉलेजांपर्यंत चढूं शकतात. पण त्याचें प्रमाण १५० मध्यें १ इतकें अल्प आहे. उलट "पब्लिक स्कूल" मधून बाहेर पडणाऱ्या मुलांपैकीं $\frac{1}{2}$ मुलें कॉलेजांत जातात. बहुसंख्य विद्यार्थी प्राथमिक शिक्षण संपल्यावर लागलीच पंधराव्या वर्षी रोजगारास लागतात. त्यांना पद्धतशीर धंदेशिक्षण देण्याची अथवा त्यांच्या शैक्षणिक व सांस्कृतिक विकासाची कोणतीच योजना १९३९ पूर्वी नव्हती. ऑक्सफोर्ड येथील बेलियल कॉलेजचे प्रमुख, व प्रसिद्ध शिक्षण तज्ज्ञ प्रो. ए. ई. लिंडसे यांनीं इंग्रजी शिक्षणपद्धतीवर खालील मोजक्या शब्दांत विदारक प्रकाश पाडला आहे, "एकंदरीनें पाहातां, इंग्लंडमध्यें अद्यापहि गरिबांना एक पद्धतीचें व श्रीमंतांना वेगळ्या पद्धतीचें शिक्षण मिळतें. गरीब मुलांना अल्पवयांतच शिक्षण संपवावें लागतें. जीं गरीब मुलें शिष्यवृत्तींच्या मदतीनें पुढें जाऊं शकतात, त्यांच्यावर परीक्षेंत आपलें स्थान टिकविण्याचें एवढें जबरदस्त दडपण असतें कीं तीं बहुधा शारीरिक व मानसिक दृष्ट्या खुरटतात.* "

अमेरिकेंतील शिक्षण योजना याहून खूपच चांगली आहे. पण तेथेंही सक्तीच्या

---

* या परिस्थितींत बदल करण्यासाठीं १९४४ सालीं नवा शिक्षणकायदा पास करण्यांत आला आहे. त्यामधील कित्येक शिफारशी दूरगामी आहेत. पण शिक्षणाची वयोमर्यादा १४ ऐवजीं १५ करावी हा महत्त्वाचा बदल १९४७ सालापासून अंमलांत यावा, ही सूचना आणखी कांहीं वर्षे पुढें ढकलण्यांत आली !

शिक्षणाची वयोमर्यादा फक्त १४ च आहे. मात्र यानंतर प्रत्यक्ष रोजगारास लागणाऱ्या मुलांसाठीं १८ वर्षांपर्यंत आठवड्यांतून कांहीं तास बौद्धिक शिक्षणाची सोय करण्यांत येते. परंतु तेथेंहीं वर्गभेदामुळें शिक्षणांत विषमता येते ही गोष्ट सर्वमान्य आहे. या दोन देशांचीं उदाहरणें एवढ्याकरितां घेतलीं कीं या देशांत प्राथमिक शिक्षण सक्तीचें झाल्याला ७५ हून अधिक वर्षें झालीं आहेत.

उलट सोविएत यूनियनमध्यें प्राथमिक शिक्षण सार्वत्रिक व्हावयास प्रारंभ झाल्यास फक्त १७ वर्षे झालीं. परंतु नागरीक जीवनाची पूर्वतयारी करून देणारें सर्वसाधारण शिक्षण *सर्व मुलांना, सात ते सतरा वर्षांपर्यंत,* दहा *वर्षें मिळावें,* आणि *यानंतर* त्यांना धंदेशिक्षण अथवा व्यवसाय–शिक्षण मिळावें, हें लेनिनचें स्वप्न तेथें पुढील कांहीं वर्षांच्या आंत सत्यसृष्टींत उतरेल असें वाटतें. दुसरें महायुद्ध सुरू झालें नसतें तर एव्हांना सोविएत देशांत ही योजना सर्वत्र मूर्त स्वरूपांत दिसली असती. दुसरी गोष्ट अशी कीं, पालकांची गरिबी कोणाही लायक विद्यार्थ्याला उच्च शिक्षण मिळण्याच्या आड येत नाहीं. प्रत्येक लायक विद्यार्थ्यास जरूरीप्रमाणें शिष्यवृत्ति मिळते आणि त्यामुळें उपजत प्रवृत्तींना अनुरूप असें शिक्षण मिळण्याची प्रत्येकास समान संधि प्रत्यक्षपणें मिळते. समान संधीची घोषणा केवळ कागदोपत्रीं रहात नाहीं. १९३५ सालापूर्वी उच्च शिक्षण संस्थांत कामगार व शेतकरी पालकांच्या मुलांना प्राधान्य मिळे हें खरें, पण त्या वर्षापासून हा भेदभाव बंद करण्यांत आला व तेव्हांपासून सर्व मुलांना शिक्षणाचीं सर्व दालनें सारखींच खुलीं आहेत.

शिक्षणांत विषमता उत्पन्न होऊं नये; तें खरोखरी सार्वत्रिक व्हावें; या मागणीमागें कोणता उद्देश असतो ? हा प्रश्न येथें उपस्थित करण्याचें कारण असें कीं, कित्येक लोक या प्रश्नाला अगदीं विलक्षण उत्तरें देतात. उदाहरणार्थ, सोविएत शिक्षणावर लिहितांना प्रा. माटे यांनीं सार्वत्रिक शिक्षणासंबंधीं खालील विधान केल्याचें दिसून येतें.* "आपला दर्जा खरोखरच किती आहे हें ज्याचें त्याला पटवून देण्याला हें एक उत्कृष्ट साधन ठरतें, इतकेंच." सार्वत्रिक शिक्षणाविषयींचा, प्रा. माटे यांचा हा दृष्टिकोन अगदीं चुकीचा आहे. प्रत्येक व्यक्तीला आपला सर्वांगीण व्यक्तिविकास करून घेतां यावा व अशा रीतीनें प्रत्येकाच्या नैसर्गिक शक्तींचा समाजाला अधिकांत अधिक

---

* पुणें दैनिक प्रभात ता. ९।१०।४५.

उपयोग व्हावा आणि या दोन्हींच्या योगें व्यक्ति व समाज यांची प्रगति व्हावी हें शिक्षणाचें वास्तविक ध्येय होय. आणि या ध्येयसिद्धीसाठीं शिक्षण सार्वत्रिक होणें, सर्वांस शिक्षणाची समान संधि मिळणें, आवश्यक आहे. ज्याला त्याला स्वतांचा कमी अधिक " दर्जा पटवून देण्याचा " हा प्रश्न नाहीं हें उघड आहे.

सोविएत शिक्षणाच्या निरनिराळ्या संस्था व त्यांचे अभ्यासक्रम यांकडे दृष्टिक्षेप टाकल्यास तेथेंही अनेक वैशिष्ट्यपूर्ण गोष्टी दिसून येतात. प्रथमच जी गोष्ट लक्ष वेधून घेते ती ही कीं सोविएत देशांत लहान मुलांची व्यवस्था अगदीं आदर्श ठेवण्यांत येते. बालसंस्थांतील प्रकरणांत याचा उल्लेख आलेलाच आहे. सोविएत देशांत बालसंस्थांचा व्याप जेवढ्या प्रमाणावर आहे तेवढा तो इतर कोणत्याही देशांत नाहीं. इंग्लंड, अमेरिकेंत नर्सरी शाळा आहेत; पण त्यांचें क्षेत्र अगदीं लहान आहे; आणि त्यांचा उपयोग बहुसंख्य जनता घेऊं शकत नाहीं. स्त्रियांनीं स्वतंत्र व्यवसाय करावा ही गोष्ट अद्यापहि त्या समाजांत रूढ नाहीं. गेल्या महायुद्धांत इंग्लंडमध्यें ज्यावेळीं स्त्रिया मोठ्या प्रमाणांत युद्धोत्पादनांत भाग घेऊं लागल्या, त्यावेळीं त्यांच्या लहान मुलांची व्यवस्था करणें भाग झालें व म्हणून युद्धकालासाठीं नर्सरी शाळा उघडण्यांत आल्या. पण युद्ध संपल्यामुळें आतां त्या बंद करण्यांत येणार आहेत, असा निर्णय परवांच पार्लमेंटांत जाहीर करण्यांत आला. पुरुषांच्या बरोबरीनें स्त्रियांनीं कामधंदा करूं नये हाच या निर्णयाचा अर्थ व प्रत्यक्ष परिणाम आहे.

समाजवादी राष्ट्राचे भावी आधारस्तंभ उत्तम वातावरणांत वाढले पाहिजेत, त्यांना वैद्यकीय व इतर सर्व सुखसोयी उपलब्ध असल्या पाहिजेत, याविषयीं सोविएत समाजाचा अतिशय कटाक्ष आहे. भावी पिढीची इतकी उत्कृष्ट बडदास्त ठेवली जाते, तिचे अपेक्षित परिणाम आतां दिसूं लागले आहेत. सोविएत देशांत जाऊन आलेला प्रत्येक परदेशस्थ * सोविएत बालकांच्या जीवनाबद्दल धन्योद्गार काढतो.

---

* **मिसेस प्रीस्टले** ( सुप्रसिद्ध इंग्रज कादंबरीकार जे. बी. प्रीस्टले यांच्या पत्नी ) १९४५ च्या हिंवाळ्यांत सोविएत देशांत जाऊन आल्या. त्यांनीं तेथील मुक्कामांत अनेक नर्सरी शाळा पाहिल्या. त्यांच्या मतें, त्यांनी पाहिलेली प्रत्येक नर्सरी शाळा, किमान पक्षीं, इंग्लंडमधील सर्वोत्कृष्ट नर्सरी शाळेच्या तोडीची होती. नर्सरी शाळांतील शिक्षकवर्गाविषयीं त्यांनीं गौरवपूर्ण उद्गार काढले आहेत.

शिवाय पुढील आंकडे हीच गोष्ट सिद्ध करतात. गेल्या पंचवीस वर्षांत सोविएत देशांत बालमृत्यूचें प्रमाण *दोन तृतीयांशानें* घटलें आहे. दहा वर्षांच्या सोविएत मुलांची सरासरी उंची गेल्या वीस वर्षांत सवा इंच वाढली आहे, आणि छातीचा घेर एक इंचानें वाढला आहे. कोलमा शहरांतील मुलांच्या प्रकृतींत, १९२५ सालापासून १९३७ सालापर्यंतच्या बारा वर्षांत, विलक्षण बदल झाला आहे. बारा वर्षांच्या मुलांच्या उंचींत १¾ ते २½ इंच सरासरी वाढ झाली आणि वजन ११½ पौंड वाढलें.

शाळा–कॉलेजांतील शिक्षणक्रमाकडे नजर फेंकली म्हणजे मुलांचा केवळ बौद्धिकच नव्हे तर सर्वांगीण विकास व्हावा अशा रीतीनें सर्व शिक्षणक्रम आंखल्याचें स्पष्टपणें दिसून येतें. प्राथमिक व दुय्यम शाळांत आणि कॉलेजांत शारीरिक शिक्षण व व्यायाम यांवर योग्य भर दिलेला आहे. व्यायाम व खेळ यांच्या संस्था दिवसेंदिवस सोविएत देशांत झपाट्यानें वाढत आहेत. सोविएत देशांत खेळाचा दर्जा कसा वाढत आहे, याची साक्ष परवांच इंग्लंडमध्यें गेलेल्या "*डायनामो*" *या* सोविएत फुटबॉल टीमच्या अद्वितीय यशावरून पटते. फुटबॉल या खेळांत इंग्रज पटाईत आहेत अशी आतांपर्यंत त्यांची स्वतांची व जगाची कल्पना होती, तिला सोविएत टीमनें आश्चर्याचा मोठाच धक्का दिला आहे आणि इंग्रज फुटबॉल तज्ज्ञांना विचार करावयास लाविलें आहे ! *

स्वतांच्या शरीराची उत्तम निगा राखणें हें सोविएत तरुण आपलें प्राथमिक सामाजिक कर्तव्य समजतो. त्याचप्रमाणें लष्करी शिक्षण घेऊन देशरक्षणासाठीं सदा सज्ज राहाणें हाहि सोविएत शिक्षणक्रमांतील एक आवश्यक भाग आहे. परंतु लष्करी शिक्षणाचा हेतु, सोविएत तरुणांमध्यें आक्रमक वृत्ति रुजविण्याचा बिलकूल नाहीं. फॅशिस्ट राष्ट्रांप्रमाणें येथें लढाई आणि लढाऊ वृत्ति यांचा उदोउदो करण्यांत येत नाहीं. युद्ध हें समाजांतील क्षात्रवृत्ति वाढविण्याचें साधन आहे; आमच्या

* १९४१ सालीं सोविएत देशांत व्यायाम व खेळ यांच्या उच्च शिक्षणासाठीं सहा कॉलेजें आणि २५ दुय्यम दर्जाचीं विद्यालयें ( टॅक्निकुम ) होतीं. त्याशिवाय व्यायाम शिक्षणाचे अल्पावधीचे हंगामी अनेक वर्ग चालविले जात होते. व्यायामपटु व क्रीडापटु शिक्षकांच्या खास शिक्षणाकरितां सरकारकडून ६ कोटि रूबल दरवर्षी खर्च केले जात होते आणि याविषयीं विशेष संशोधन करण्याकरितां ४ संशोधन संस्था काम करीत होत्या.

राष्ट्रांचें युद्ध हेंच वीरवृत्तीचें जीवन आहे ( *Heroic Way of Life* ); अशा प्रकारच्या दुष्ट फॅशिस्ट विचारप्रणालीला थारा दिला जात नाहीं. सर्व राष्ट्रांशीं समानतेची भूमिका आणि स्नेहभाव यांवर आधारलेली आंतरराष्ट्रीय भावना हें सोविएत शिक्षणाचें एक आधारभूत तत्त्व आहे, हें आपण मागें पाहिलेंच आहे. परंतु जगांत साम्राज्यशाही अद्यापहि थैमान घालीत असल्यामुळें प्रत्येक सोविएत नागरिकानें मातृभूमीच्या संरक्षणार्थ सदैव सज्ज असलें पाहिजे; आणि म्हणून त्यानें अद्यावत् लष्करी शिक्षण घेणें आवश्यक आहे; हा सोविएत शिक्षणाचा लष्करी शिक्षणाविषयीं दृष्टिकोन आहे. सोविएत लष्करी शिक्षण कोणत्या प्रतीचें आहे, हें स्तालिनग्राडचा वेढा आणि बर्लिनवरील लाल सेनेची राघोभरारी, यावरून आणि महायुद्धांतील सोविएत सेनेच्या एकंदर कौशल्यावरून आतां स्पष्टच झालें आहे.

शारीरिक आणि बौद्धिक विकासाबरोबर प्रत्येक मुलाच्या ठिकाणीं कलाप्रवृत्ति जागृत होऊन त्याचा सांस्कृतिक विकास साधावा या हेतूनें सोविएत शाळेंत संगीत, चित्रकला, नृत्य हे विषय शिकविण्यांत येतात. मुलांमध्यें लहानपणापासून नाट्य आणि अभिनय याविषयीं आवड उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला जातो. लहान मुलांसाठीं वेगळीं नाट्यमंदिरें व सिनेमागृहेंहि आहेत. * कलाशिक्षणाचा उद्देश दुहेरी आहे. एक तर सर्वसाधारण सोविएत नागरिकाची कलेविषयीं आवड आणि रसग्रहण शक्ति वाढावी आणि अशा रीतीनें तो सुसंस्कृत व्हावा. इंग्रज लेखक वेब *पतिपत्नींच्या* मतें सोविएत शाळेंत संस्कृतीच्या या शाखेकडे जितकें लक्ष पुरविण्यांत येतें तितकें अन्यत्र कोठेंही ( इंग्लंड अथवा न्यूयॉर्क संस्थानांतहि ) पुरविलें जात नसेल. सर्वसामान्य अभ्यासक्रमांत कलाशिक्षणाचा समावेश होऊं शकतो ही कल्पनाच अजून हिंदुस्थानांत फारशी परिचित नाहीं. सोविएत देशांत कला व संस्कृति अशा रीतीनें शाळांमधून आज जनतेंत विखुरलीं जात आहे. पुढील सोविएत पिढी इतर कोणत्याही देशांपेक्षां अधिक कलाप्रेमी बनत आहे. सोविएत युनियनमध्यें जनता व कला यांची फारकत झालेली नसून उलट तेथील जनतेंत कलावंतांना अधिक मानाचें स्थान मिळत आहे यांत नवल तें काय ?

* मुलांच्या नाट्यगृहांवर असलेला पुढील सूचनाफलक वाचकांस गंमतीचा वाटेल. " मुलांसह आल्याशिवाय प्रौढ मनुष्यांना प्रवेश मिळणार नाहीं ! "

कलाशिक्षणाचा दुसरा उद्देश म्हणजे होतकरू कलावंत शोधून काढणें. शाळेंत व मुलांच्या क्लबांत कलामंडळें चालविण्यांत येतात व त्यामुळें कलांकडे विशेष ओढा असलेल्या मुलांच्या कलात्मक वृत्तीचा परिपोष होणें सुलभ होतें. थोर कलावंत कलामंडळांना भेटी देऊन या होतकरू कलावंतांना मार्गदर्शन करतात. याप्रमाणें नवीन कलावंत अनुभवी कलावंतांच्या देखरेखीखालीं व त्यांच्या तालमींत तयार होतात. कलांसाठीं निराळीं विद्यालयें स्थापण्यांत आलीं आहेत आणि त्यांमध्यें कलांमध्यें विशेष गति दाखविणाऱ्या मुलांच्या पुढील शिक्षणाची व्यवस्था होते. अशा रीतीनें शासन संस्था व समाज कलाशिक्षणाकडे आपुलकीनें लक्ष पुरवीत आहेत. इतर देशांत वैयक्तिक पाठिंब्यावर अथवा मर्यादित स्वरूपाच्या संस्थांच्या बळावर कलासंवर्धन चाललेलें असतें; हा फरक ध्यानांत घेण्याजोगा आहे. आंतरराष्ट्रीय संगीत स्पर्धेंत सोविएत मुलें पहिले क्रमांक मिळवितात या घटनेचें मूळ या फरकामध्यें असलें पाहिजे.

कलाशिक्षणाविषयीं लिहितांना आणखी एका गोष्टीचा जरूर उल्लेख केला पाहिजे. कलांचें उच्चशिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांनीं प्रथम सर्वसाधारण शिक्षणक्रम पुरा केलेला असतो आणि कलेच्या कॉलेजांतहि समाजशास्त्र, अर्थव्यवस्था इत्यादि विषय आवश्यक समजले जातात. याचे दोन इष्ट परिणाम घडतात. एक परिणाम असा कीं, सोविएत कलावंत समाजापासून "अलिप्त" राहात नाहीं; समाज हेंच त्याचें अधिष्ठान असतें. तसेंच कलाप्रवृत्ति असलेल्या मुलांच्या सामान्य बौद्धिक विकासाकडे नीट लक्ष पुरविलें जातें. बालनट व बालनटी यांच्या आयुष्याचा तरुणपणीं विचका होण्याचा कसा संभव असतो याची सर्वांस पूर्ण कल्पना आहे. अमेरिकेंतील, इंग्लंडमधील व खुद्द हिंदुस्थानांतीलहि अशा दुर्दैवी व्यक्तींची अनेक उदाहरणें दाखवितां येतील. सोविएत देशांत या बाल कलावंतांना ( *Child Prodigy* ) असा धोका निर्माण होऊं नये अशी दक्षता घेण्यांत येते. "गॉर्कीचें बालपण" हा बोलपट अनेकांनीं पाहिला असेल. त्यामध्यें छोट्या गॉर्कीची सुंदर भूमिका वठविणारा बालनट, सिनेमांत काम करीत असतांनाच, इतर मुलांच्या बरोबरीनें सामान्य शाळेंत शिक्षण घेत होता. सिनेमांत भूमिका केल्यामुळें जीवनाची प्राथमिक तयारी करून देणाऱ्या शिक्षणक्रमांत खंड पडूं नये, अशी व्यवस्था करण्यांत आली होती.

शाळा कॉलेजांतील सर्वसाधारण अभ्यासक्रम व तो शिकविण्याची पद्धति यांजकडे नजर टाकली म्हणजे सोविएत शिक्षणाचे दोन ठळक विशेष ध्यानांत येतात.

पहिला विशेष असा कीं, ज्ञान केवळ पुस्तकी राहूं नये यासाठीं हरप्रयत्न केले जातात. शिकवितांना तात्त्विक ज्ञानाची प्रत्यक्ष व्यावहारिक अनुभवांशीं पदोपदीं सांगड घालण्यांत येते. प्रयोगशाळा, उद्योगकेंद्रांना भेटी, सामुदायिक शेतांना भेटी, वस्तु संग्रहालयें, प्रदर्शनें, या सर्व साधनांनीं, आणि प्रत्यक्ष अनुभव घेण्यास उत्तेजन देऊन, ज्ञान केवळ उथळ राहूं नये, त्याला प्रत्यक्ष अनुभवांची जोड मिळावी व विद्यार्थी चौरस बुद्धीचा व्हावा अशी दक्षता घेण्यांत येते. तसेंच शारीरिक श्रम आणि बौद्धिक श्रम व पांढरपेशे व्यवसाय, यांमध्यें उच्चनीचत्वाची खोटी भावना उत्पन्न होऊं नये या हेतूनें श्रमांची सामाजिक उपयुक्तता पहिल्यापासून विद्यार्थ्यांच्या मनांवर बिंबविली जाते. पॉलिटेक्निकल शिक्षणाचा उद्देश हाच होता. दिवसेंदिवस शारीरिक कष्टाचें स्थान यांत्रिक साधनांनीं घेतल्यामुळें पॉलिटेक्निकल शिक्षणांतील हस्तव्यवसायाचा भाग काढून टाकण्यांत आला असला तरी त्यामधील तात्त्विक भाग समाजशास्त्राच्या रूपानें कायम आहे. देशांतील निरनिराळ्या उत्पादनपद्धती, त्यांमधील शास्त्रीय तत्त्वें, निरनिराळ्या उत्पादनप्रकारांचा परस्परांशीं संबंध व त्यांचा व्यक्ति आणि समाज यांवर होणारा परिणाम, नव्या शास्त्रीय शोधांचे सामाजिक जीवनावर होणारे परिणाम, देशांतील व जगांतील इतर प्रदेशांत चालू असलेली अर्थव्यवस्था व समाजपद्धति, यांचें ज्ञान प्रत्येक विद्यार्थ्याला समाजशास्त्राच्या अभ्यासाच्या द्वारें देण्यांत येतें. यामुळें विद्यार्थी पुढें कोणताही व्यवसाय निवडोत, त्यांचें क्षितिज कितीतरी विस्तृत झालेलें असतें आणि सामाजिक व जागतिक घटनांचें महत्त्व मोजण्याची पात्रता त्यांच्या अंगीं निर्माण झालेली असते. इतर देशांप्रमाणें सोविएत विद्यार्थी आपल्या आवडत्या विषयांत मग्न झाल्यामुळें समाजजीवनापासून दूरावत नाहीं.

याचा एक परिणाम असा होतो कीं, सामान्य सोविएत नागरीक राजकीयदृष्ट्या जागृत असतो. शाळाकॉलेजांत राजकारण येतां कामा नये असा दंडक तेथें नाहीं; कारण समाजशास्त्र व राजकारण यांमध्यें तत्त्वतः फरक नाहीं. समाजशास्त्राच्या अभ्यासामुळें देशांतील व जगांतील राजकीय घटना त्याला समजूं शकतात. वयाच्या अठराव्या वर्षी मताधिकार मिळत असल्यामुळें त्याला राजकारणाची ही पूर्वतयारी अवश्य असते. प्रौढ विद्यार्थी मताधिकार प्रत्यक्ष बजावतात व सोविएत सभांत भाग घेतात; अर्थात त्यांचा राजकारणाशीं प्रत्यक्ष संबंध येतो. शिक्षण संपल्यावरहि

राजकीय दृष्ट्या प्रत्येक नागरिक जागृत राहावा या हेतूनें सायंकालीन वर्ग, अभ्यासमंडळें, जाहीर सभा, व्याख्यानें इत्यादि साधनांनीं राजकारणाचें शिक्षण देण्यांत येतें. राजकारणाच्या विशेष अभ्यासासाठीं खास राजकारणाचीं अशी कम्युनिस्ट विद्यालयें आहेत. तेथें मार्क्सवाद, इतिहास, अर्थशास्त्र, क्रांतिशास्त्र आणि जागतिक राजकारण यांचा सूक्ष्म अभ्यास करण्याची व्यवस्था असते. क्रांतीनंतरच्या पहिल्या कांहीं वर्षांत या विद्यालयांचीं आणि आम जनतेंत क्रांतीचा प्रसार काढण्यासाठीं खास उघडण्यांत आलेल्या राजकीय वर्गांची विशेष आवश्यकता होती. नवीन सोविएत पिढी आतां शाळाकॉलेजांतूनच अवश्य असलेलें राजकीय शिक्षण घेऊन बाहेर पडते. १९३४ सालीं मि. वेब व त्यांच्या पत्नी, सोविएत युनियनमध्यें जाऊन आल्या. बाल्टिक समुद्रापासून पासिफिक महासागरापर्यंत पसरलेल्या या अफाट प्रदेशांतील सर्व प्रौढ स्त्रीपुरुष "*राजकीय दृष्ट्या साक्षर*" (*Politically Literate*) आहेत. ही एकच गोष्ट सोविएत देशांत सामान्य नागरिकाची सांस्कृतिक उंची अधिक आहे हें सिद्ध करण्यास, त्यांच्या मतें, पुरेशी आहे.

दुसरी वैशिष्ट्यपूर्ण गोष्ट म्हणजे पहिल्यापासून मुलांच्या मनांत निर्माण करण्यांत येणारा शास्त्रीय दृष्टिकोन. भौतिक शास्त्रांच्या अभ्यासाकडे शाळेंत विशेष लक्ष दिलें जातें आणि पुढें जरी एखाद्या विद्यार्थ्यानें वाङ्मयाचा विशेष व्यासंग केला तरी भौतिक शास्त्रांचें सामान्य तात्त्विक व व्यावहारिक ज्ञान त्याला असतेंच. यामुळें साधा विजेचा फ्यूज दुरुस्त न करतां येणारे विद्वान् सोविएत समाजांत आढळत नाहींत! प्रत्येक घटना कशी घडते, तिचा कार्यकारणभाव कोणता, मानवी जीवन अधिक समृद्ध करण्यासाठीं शास्त्रीय शोधांचा कसा उपयोग करतां येईल, अशा प्रकारचें कुतूहल प्रत्येक विद्यार्थ्याच्या ठिकाणीं जागृत करण्यांत येतें. जग आपल्याला बदलावयाचें आहे; नवा समाज आपल्याला घडवावयाचा आहे; त्यासाठीं शास्त्रीय ज्ञानाची अतिशय आवश्यकता आहे; ही गोष्ट विद्यार्थ्यांच्या मनांवर सतत बिंबविली जाते. सोविएत विद्यार्थ्यांस शास्त्रमंडळें आणि यंत्रविद्यामंडळें किती प्रिय असतात, हें आपण मागें पाहिलेंच आहे. शास्त्रीय ज्ञानाविषयीं कुतूहल, खेळाची हौस आणि देशरक्षणाची आवश्यकता या तिन्ही गोष्टींचा मिलाफ झालेलें आणखी एक उदाहरण येथें देतों. ज्यावेळीं सोविएत देशांत विमानविद्येवर भर देण्यास सुरवात झाली तेव्हां मुलांच्या सर्व क्लबांत विमानविद्यामंडळें सुरू झालीं! आणि अनेक मुलें विमानांची मॉडेल्स तयार

करण्यांत गर्क झालीं. या कामीं त्यांना सर्व साधनसामुग्री पुरविण्यांत येऊं लागली. कित्येक विद्यार्थ्यांनीं हौशी वैमानिकांचे संघ स्थापन करून सोविएत वैमानिक दलाच्या सहकार्यानें विमानें चालविण्याची विद्या प्राप्त करून घेतली. आणि पॅराशूटच्या सहाय्यानें उडी मारण्याची कला इतकी लोकप्रिय झाली कीं, प्रत्येक मोठ्या शहरांत पॅराशूट उडी मारण्यासाठीं उंच बुरूज बांधण्यांत आले व त्यावरून उडी टाकून हजारों मुलांनीं आपली हौस पुरवून घेतली!

प्रथमपासून शास्त्रीय दृष्टिकोनांतून पाहाण्याची संवय झाल्यामुळें सामाजिक घटनांकडे पाहातांनाही ही शास्त्रीय दृष्टीच उपयोगांत आणिली जाते. समाजजीवनाकडे पाहाण्याची मार्क्सवादी आधिभौतिक व ऐतिहासिक विचारसरणी ( *Materialistic Conception of History* ) हें सोविएत देशाचें अधिकृत सामाजिक तत्त्वज्ञान आहे. त्यामध्यें आधिदैविक, अतिमानुष विचारप्रणालीला वाव नाहीं. अर्थातच धार्मिक शिक्षण किंवा तत्सम शिक्षणाला सोविएत शिक्षणांत स्थान नाहीं. याचा असा अर्थ मात्र नव्हे कीं, सोविएत समाजांत धर्माला थारा देण्यांत येत नाहीं. धर्म ही प्रत्येकाची खाजगी वैयक्तिक बाब समजली जाते आणि त्याप्रमाणें आचरण करण्याचें व्यक्तिस्वातंत्र्य प्रत्येक प्रौढ मनुष्याला आहे. परंतु सोळा वर्षांखालील मुलांमुलींना धार्मिक शिक्षण दिलें जात नाहीं. प्रौढांनीं हवातर धर्म पाळावा पण लहान मुलांच्या मनांवर धार्मिक विचारसरणीचें दडपण टाकूं नये, ही सोविएत समाजाची दृष्टि आहे. ख्रिश्चन मिशनऱ्यांनीं शाळांतून बायबल शिकविण्याच्या प्रथेला आपल्याकडे हिंदू पालकांनीं ज्या भूमिकेवरून विरोध केला तशीच थोडीशी ही भूमिका आहे. * परंतु सोविएत शाळेंत नैतिक शिक्षणाची, चारित्र्य घडविण्याची, कांहींच तरतूद नाहीं असा निष्कर्ष कोणी काढला तर तो मात्र अगदीं चुकीचा ठरेल. सोविएत शाळेंत नैतिक मूल्यांवर योग्य भर दिला जातो. पण सामजिक नीति ही अतिमानव नसून ती मानवनिर्मित आहे आणि तिचें अधिष्ठान समाजांतच आहे असा सोविएत शिक्षणतज्ज्ञांचा ठाम विश्वास आहे.

* सोविएत देशांत धर्माचरणाचें स्वातंत्र्य आहे. इतकेंच नव्हे तर धर्मगुरूंच्या पद्धतशीर शिक्षणाची सोयहि आहे हें पुढील उदाहरणावरून दिसतें. मॉस्को येथें बोगोस्लावूस्की सेमिनरी नांवाचें रशियन ऑर्थोडॉक्स चर्च या पंथाचें धार्मिक शिक्षणाचें विद्यालय आहे. येथें प्रवेश मिळविणाऱ्या विद्यार्थ्यांचें वय अठरा वर्षांच्या वर असलें पाहिजे आणि त्यानें दशवार्षिक अभ्यासक्रम पुरा केलेला असला पाहिजे. कॉलेजांतील विद्यार्थ्यांना मिळणाऱ्या शिष्यवृत्ति वगैरे इतर सवलतीहि त्यांना मिळतात. ( एडमर स्नो यांच्या पुस्तकावरून )

ज्यावेळीं समाज व शिक्षण यांचे परस्पर संबंध आपण पाहूं, त्यावेळीं शिक्षणाच्या या विशेषाचा विचार करूं.

शास्त्रीय ज्ञानाची सफलता तें समाजाच्या फायद्यासाठीं उपयोगांत आणल्यानेंच होते. म्हणूनच शास्त्रीय ज्ञानावर उभारलेल्या यंत्रविद्येची, धंदेशिक्षणाची, व व्यवसाय शिक्षणाची एवढ्या मोठ्या प्रमाणावर बहुविध सोय केलेली दिसते. नव्या पिढीच्या प्रत्येक तरुणाला किमान यांत्रिक शिक्षण मिळालेलें असावें, असा तिसऱ्या पंचवार्षिक योजनेचा उद्देश होता हें आपण मागें पाहिलेंच आहे. उच्च शिक्षणसंस्थांत निम्म्यांहून अधिक संस्था टेक्निकल ( यंत्रविषयक अथवा शेतीविषयक ) कॉलेजें आहेत. अमेरिकेशिवाय इतर कोठेंही व्यवसायशिक्षणावर इतका भर दिलेला आढळत नाहीं. हिंदुस्थानांत धंदेशिक्षणाची किती अनवस्था आहे याची कल्पना प्रत्येकास आहेच. दोन कोटि लोकवस्तीच्या मुंबई प्रांतांत धंदेशिक्षणाच्या सरकारी शाळा किती ? तर चार किंवा पांच. धंदेशिक्षणाच्या इतर सर्व सार्वजनिक संस्था जमेस धरल्या तरी ही संख्या पंधरांच्या वर जाईल असें वाटत नाहीं. युद्धकालांत यंत्रकुशल कामगारांची अतिशय तीव्रतेनें वाण भासूं लागली. तेव्हां कांहीं ठिकाणीं फिटरच्या दर्जाच्या यांत्रिक शिक्षणाची सोय ( *Technical Training Scheme* ) करण्यांत आली. पण पांच वर्षांच्या अवधींत सबंध हिंदुस्थानांत फक्त ९०,००० कामगारांना हें शिक्षण मिळालें ! ही झाली हिंदुस्तानांतील परिस्थिति; आणि तिला कारण ब्रिटिश साम्राज्यशाहीनें हिंदुस्तानच्या औद्योगीकरणाचा केलेला कोंडमारा हें आहे. पण कालपर्यंत जगाची उद्योगशाळा समजली जाणाऱ्या इंग्लंड देशांतसुद्धां युद्धपूर्व कालांत फक्त ३०,००० विद्यार्थ्यांच्या टेक्निकल शिक्षणाची सोय होती. बहुसंख्य विद्यार्थी चौदाव्या वर्षी प्राथमिक शिक्षण घेऊन बाहेर पडत आणि ताबडतोब, धंदेशिक्षणाच्या कोणत्याही पूर्वतयारीशिवाय, कारखान्याचा मार्ग धरीत असत.

सोविएत देशांत धंदेशिक्षणाची मोठ्या प्रमाणावर सोय तर आहेच; पण या धंदेशिक्षणाच्या कालांत विद्यार्थ्यांच्या बौद्धिक व सांस्कृतिक विकासाकडेहि पूर्ण लक्ष पुरविण्यांत येतें. अभ्यासक्रमांत धंदेशिक्षणाच्या विषयांबरोबरच भाषा, वाङ्मय, शास्त्र इत्यादि विषय असतात आणि छंदमंडळांची भरपूर तरतूद असते. हिंदुस्तानामध्यें शेतकरी किंवा कामगार वर्गांतून आलेल्या विद्यार्थ्यांच्या हातांत पुस्तक

आल्यावर तो नांगर व हातोडा टाकून देतो. सोविएतमध्यें तसें होत नाहीं. पुस्तक हातीं आल्यावर तो विळा हातोडा टाकून देत नाहीं; त्याचप्रमाणें धंदेशिक्षण घेऊन विळा हातोडा हातीं घेतल्यावरहि त्याच्या हातांतून पुस्तक गळत नाहीं. एका हातांत यांत्रिक नांगर अथवा हातोडा आणि दुसऱ्या हातांत शास्त्रीय विद्येचें पुस्तक, अशा पवित्र्यांत आजचा सोविएत विद्यार्थी उभा आहे.

उच्च शिक्षणसंस्था, कॉलेजें, विश्वविद्यालयें व शास्त्रीय संशोधन संस्था, यांच्याकडे लक्ष देतांच जी गोष्ट प्रथम नजरेंत भरते ती म्हणजे, शिक्षणाच्या या शाखेंत सोविएत देशांत गेल्या पंचवीस वर्षांत झालेली विलक्षण वाढ. ही वाढ केवळ उच्चशिक्षणाच्या संस्थांची संख्या व विद्यार्थ्यांची संख्या यांमध्येंच झालेली नाहीं; तर त्यांचें क्षेत्र अधिक व्यापक झालें आहे आणि देशाच्या कोनाकोपऱ्यांत त्या पसरल्या आहेत. १९३८ सालीं यूक्रेनमध्यें जर्मनीपेक्षां अधिक कॉलेजें होतीं; सबंध सोविएत देशांत सर्व यूरोप खंडापेक्षां अधिक उच्च शिक्षण संस्था होत्या; आणि कॉलेजयुवकांची संख्या इंग्लंड, जर्मनी व इटाली या तिन्ही देशांच्या एकूण कॉलेजयुवकांच्या संख्येच्या तिपटीहून अधिक होती ! अमेरिका सोडून इतर कोणत्याही देशापेक्षां सोविएत देशांत कॉलेज विद्यार्थ्यांचें एकूण लोकसंख्येशीं पडणारें प्रमाण जास्त आहे. पुढील आंकडे पाहा:

विद्यापीठांतील विद्यार्थ्यांचें लोकसंख्येशीं प्रमाण

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| इंग्लंड | ८३७ | लोकांस | एक कॉलेज | विद्यार्थी | (१९३९) |
| इटाली | ८०८ | ,, | ,, | ,, | (१९३८) |
| जर्मनी | ६९० | ,, | ,, | ,, | (१९३९) |
| हॉलंड | ५७९ | ,, | ,, | ,, | (१९३८) |
| फ्रान्स | ४८० | ,, | ,, | ,, | ,, |
| स्वित्सर्लंड | ३८७ | ,, | ,, | ,, | ,, |
| अमेरिका | २२५ | ,, | ,, | ,, | (१९३९) |
| सो. यूनियन | ३०० | ,, | ,, | ,, | ,, |
| हिंदुस्तान | २२०६ | ,, | ,, | ,, | ,, |

ध्यानांत घेण्यासारखी गोष्ट ही कीं, सोविएत उच्चशिक्षणांतील ही वाढ गेल्या वीस वर्षांत झाली आहे, आणि ती अद्यापहि चालू आहे. सन १९४५ सालीं १,७०,००० नवे विद्यार्थी कॉलेजांत दाखल झाले.

सोविएत देशांत उच्च शिक्षण ही उच्च वर्गीयांची मिरास होऊन राहिलेली नाहीं, हा तेथील उच्च शिक्षणाचा विशेष होय. या बाबतींत *कुझनिस्की* या लेखकाचें तुलनात्मक संशोधन आहे. त्याच्या मतें उच्च शिक्षणाचें माहेरघर समजण्यांत आलेल्या जर्मनींत, १९३६ सालीं, कामगार व शेतकरी वर्गातून आलेल्या कॉलेज विद्यार्थ्यांची संख्या शेंकडा १६ टक्कयांहून अधिक नव्हती. इंग्लंडमध्यें हें प्रमाण याहून खूपच कमी आहे हें आपण इंग्लंडमधील " पब्लिक स्कूल " विद्यार्थ्यांचा विचार करतांना पाहिलें आहे. हिंदुस्थानांतील परिस्थिति सर्वांच्या परिचयाची आहे. सोविएत देशांत सर्व लायक विद्यार्थ्यांस उच्चशिक्षण खुलें आहे, आणि शिष्यवृत्तींची संख्या इंग्लंडप्रमाणें मर्यादित नसल्यामुळें पालकाची आर्थिक परिस्थिति कोणत्याही विद्यार्थ्याच्या आड येऊं शकत नाहीं. १९३८ सालीं, उच्चशिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांपैकीं शेंकडा ९१ टक्के विद्यार्थ्यांना राहाण्याचा, जेवणाचा व इतर खर्च भागेल इतकी शिष्यवृत्ति मिळत होती.

दुसरी गोष्ट अशी कीं विशिष्ट विषयांचें खास ज्ञान मिळवून त्यांमध्यें तज्ज्ञ होणाऱ्या सोविएत विद्यार्थ्यानें त्या व तत्सम विषयांचें आणि अन्य विषयांचें व्यापक ज्ञानहि मिळविलेलें असतें. हा मुद्दा स्पष्ट करण्यासाठीं ऑक्सफोर्ड येथील बेलियल कॉलेजचे प्रमुख *प्रो. ए. ई. लिंडसे* यांनीं इंग्लंडमधील उच्च शिक्षणाबद्दल काढलेले उद्गार पुढें दिले आहेत. " आमच्या उच्च शिक्षणांत प्रमाणाबाहेर विशिष्टीकरण ( *Specialization* ) झालें आहे. ज्ञानाची बहुविधता जसजशी वाढते तसतशी, विशिष्ट विषयांचा व विशिष्ट शाखेचा खास अभ्यास करण्याची अधिकाअधिक गरज भासते, ही गोष्ट खरी. परंतु त्याचबरोबर मानवी ज्ञानाच्या निरनिराळ्या शाखांचे परस्पर संबंधहि तितक्याच प्रमाणांत निकटचे होत आहेत. अधिकाधिक आकुंचित क्षेत्रांविषयीं अधिकाधिक प्रमाणांत तज्ज्ञ होत असलेल्या या विद्वानांपासून समाजाला धोका उत्पन्न होत आहे. एखाद्या शाखेंतील खास ज्ञानाला सर्वसामान्य विषयांचें स्थूल ज्ञान आणि व्यापक दृष्टिकोन यांची जोड देणें अतिशय आवश्यक आहे. "

व्यापक ज्ञानाकडे दुर्लक्ष झाल्यामुळें आपल्या शाखेंतील संशोधन समाजाला कोठें नेत आहे याची जाणीव तज्ज्ञांना होत नाहीं. तसेंच मानवी ज्ञानाचें व्यापक चित्र डोळ्यांसमोर नसल्यामुळें त्यांना आपल्या विशिष्ट शाखेंतहि डोळसपणें प्रगति करतां येत नाहीं. म्हणून त्यांना समाजाला मार्गदर्शन करणें अशक्य होऊन बसतें. झाड शोधतां शोधतां अरण्याचा विसर पडला, अथवा विटा रचतां रचतां आपण काय बांधतों आहों याची शुद्ध राहिली नाहीं, तर काय होईल? पण या तज्ज्ञांची तशीच स्थिति होते. सोविएत शिक्षणामध्यें अशी अनुकंपनीय अवस्था होणें संभवतच नाहीं.

सोविएत उच्चशिक्षणांतील तिसरा महत्त्वाचा विशेष असा कीं तेथें शास्त्रीय संशोधनाला विलक्षण मान देण्यांत येतो व सर्वतोपरी उत्तेजन मिळतें. शास्त्र व सामान्य जनता यांचा तेथें निकटचा संबंध येतो याचा उल्लेख मागें आलाच आहे. सर्व प्रकारच्या, विशेषतः भौतिक शास्त्रांमधील, संशोधनासाठीं तेथें पाण्यासारखा पैसा खर्च होतो आणि इतर कोठेंही शास्त्रज्ञ व संशोधक यांची सोविएत देशाइतकी बडदास्त ठेवली जात नाहीं. याचें कारण उघड आहे. मानवी श्रम हलके होण्यासाठीं जितकें शास्त्रीय संशोधन होईल तितकें सोविएत समाजाला हवें आहे. आपल्या वैयक्तिक फायद्याचें प्रमाण कमी होईल म्हणून शास्त्रीय शोध बळेंच दडपून ठेवणारी, अथवा "पुरे बुवा आतां हें संशोधन!" असें म्हणून शास्त्रज्ञांना दिलेला आर्थिक पाठिंबा काढून घेणारी भांडवलशाही त्या देशांत नाहीं. तसेंच अणुबॉंबसारखीं संहारक शस्त्रें निर्माण झाल्यामुळें भांडवलशाही राष्ट्रांत शास्त्रीय शोधामुळें निर्माण झालेली भीति व निराशा सोविएत देशाला भेडसावीत नाहीं. ज्या ज्या शोधामुळें मानवी जीवन अधिक सुखकर व समृद्ध होईल तें तें, सर्व समाजाच्या उपयोगासाठीं, सोविएत देशाला पाहिजे आहे आणि संहारक शक्तींचा उपयोग फक्त स्वसंरक्षणासाठीं करावयाचा आहे, आक्रमणासाठीं नव्हे. अशा परिस्थितींत शास्त्राला त्या देशांत विलक्षण बहर आला असल्यास व जगांतील इतर देशांतील शास्त्रज्ञ सोविएत शास्त्रज्ञांचा हेवा करीत असल्यास आश्चर्य नाहीं!

उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांचे पुढील आंकडे हीच गोष्ट निदर्शनास आणतात.

उच्चशिक्षणः– तुलनात्मक आंकडे

| साल | १९३२–३ | १९३६–७ |
|---|---|---|
| इंग्लंड | ६४,००० | ६२,००० |
| जर्मनी | १,३३,००० | ७२,००० |
| सोविएत यूनियन | ४,१७,००० | ५,४२,००० |

इंग्लंडमध्येंही ही संख्या थोडीशी कमीच झालेली दिसते. बहुधा १९२९ सालापासूनच्या आर्थिक अरिष्टाचें या क्षेत्रांतहि प्रतिबिंब पडलें असावें ! जर्मनींत ही संख्या या चार वर्षांत निम्म्यानें घटली. शास्त्रीय उच्च शिक्षणाविषयीं प्रसिद्ध असलेल्या जर्मनीची अशी अवस्था होण्यास भांडवलशाहीचें विकृत स्वरूप, नाझीवाद, कारणीभूत असला पाहिजे. सोविएत देशांतील परिस्थिति याच्या अगदीं उलट आहे.

हिंदुस्तानकडे लक्ष वळविल्यास काय दिसून येतें ?

चाळीस कोटि लोकवस्तीच्या या अवाढव्य प्रदेशांत अवघीं अठरा विश्वविद्यालयें आहेत आणि सर्व कॉलेजें मिळून उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या १,७६,००० आहे. एकोणीस कोटि लोकवस्ती असलेल्या सोविएत देशांत २३ विश्वविद्यालयें आणि ६,२०,००० विद्यार्थी आहेत. चार कोटि लोकसंख्येच्या यूक्रेनमध्यें १३९ कॉलेजें आहेत तर ६ कोटि लोकसंख्येच्या बंगाल देशांत कॉलेजांची संख्या शंभरांहून कमी आहे. यूक्रेनसारख्या शास्त्रीय संशोधनाच्या संस्था बंगालमध्यें फक्त हाताच्या बोटांवर मोजण्याइतक्या सांपडतील. ही झाली आंकड्यांनीं सांगितलेली कहाणी. जरा अधिक जवळून पाहिलें, तर हिंदी कॉलेजांतील पहिल्या ( व कांहीं अंशीं दुसऱ्या ) वर्षाचा अभ्यासक्रम उच्चशिक्षणांत अंतर्भूत करतां येणार नाहीं असें दिसून येईल. ही गोष्ट जमेस धरली तर आपल्या देशांतील उच्च शिक्षण घेणाऱ्या कॉलेज विद्यार्थ्यांचीं संख्या ५०,००० नीं घटते. या उच्च शिक्षणसंस्थांत तांत्रिक व व्यावसायिक शिक्षणाचीं कॉलेजें शेंकडा दहाहून कमी आहेत. यामुळें उच्चशिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांचा बराचसा ओघ आर्टस व सायन्स शाखां-

कडे वळतो; व उच्चशिक्षितांची बेकारी वाढते. सार्जंट रिपोर्टाच्या अंदाजाप्रमाणें १९३९ सालीं ३० टक्के पदवीधरांनाच त्यांच्या योग्यतेनुरूप कामधंदा मिळाला होता; ५० टक्के पदवीधरांना कसली तरी नोकरी मिळाली होती इतकेंच; आणि २० टक्के पदवीधर साफ बेकार होते. साम्राज्यशाहीनें हिंदुस्तानच्या नाड्या किती घट्ट आवळल्या आहेत याचें किती भयानक चित्र आहे हें !

सोविएत तरुण विद्यार्थी आपला व्यवसाय अथवा धंदा कसा निवडतात ? सामान्यतः विद्यार्थ्यांचा कल व पात्रता, सभोंवतालच्या प्रदेशांतील अर्थव्यवस्था आणि समाजाची त्यावेळची गरज यांवर ही निवड अवलंबून असते. परंतु सोविएत देशांत सध्यां जीवनाच्या सर्व शाखांत " शिक्षित " ( *Trained* ) मनुष्यांची जरूर आहे; आणि समाजवादी अर्थव्यवस्थेमुळें बेकारी मुळींच नाहीं. विद्यार्थ्यांना सोविएत देशांत कोठें काय चाललें आहे, कोणते कारखाने अगर व्यवसाय नव्यानें सुरू झाले आहेत, याची पूर्ण कल्पना असते; कारण शाळेंतील जीवनाचा देशांतील सामाजिक जीवनाशीं निकटचा संबंध असतो. छंदमंडळें व क्लब यांमध्यें तो आपले आवडीचे विषय अनुसरीत असतो. यामुळें शाळेंतील अखेरचें वर्ष संपायच्या आधींच त्यानें आपला व्यवसाय बहुधा पसंत केलेला असतो; ज्या मुलांना कोणता व्यवसाय निवडावा हें समजत नसेल त्यांना त्या दिशेनें साहाय्य करण्यासाठीं शेवटच्या सहामाहीच्या सुरवातीस, निरनिराळ्या व्यवसायांतील तज्ज्ञ मुलांसमोर जाहीर व्याख्यानें देऊन आपापल्या व्यवसायांतील चांगल्या गोष्टी व अडचणी यांचें विवेचन करतात, आणि त्या व्यवसायांचें सोविएत समाजांतील स्थान व महत्त्व मुलांच्या नजरेस आणतात. एखाद्या व्यवसायांत विशेष वाण भासत असल्यास त्या व्यवसायांतील आर्थिक व इतर परिस्थिति सुधारून आणि मुख्यतः तरुणांच्या देशभक्तीस जागृत करून तो व्यवसाय स्वीकारण्यास तरुणांना उद्युक्त करतात.

आपला व्यवसाय पसंत करण्यांत चूक झाली असें नंतर वाटल्यास कोणालाही तो बदलतां येतो; अशा वेळीं इतर देशांत बेकारीमुळें उत्पन्न होणारी अगतिकता सोविएत देशांत अनुभवावी लागत नाहीं. शिक्षणाचा प्रसार आतां इतका वाढला आहे कीं, कांहीं दिवसांनीं केवळ शारीरिक कष्ट करण्यासाठीं अ" शिक्षित " ( *Unqualified, Unskilled* ) इसम मिळणें कठीण होईल. पण यामुळें सोविएत

समाजजीवनांत कांहीं अडथळा उत्पन्न होईल असें वाटत नाहीं. कारण सर्व श्रम शक्य तों यांत्रिक साधनांनीं करावयाचे असा उद्देश असल्यामुळें कालांतरानें केवळ शारीरिक कष्ट करणाऱ्या 'अडाणी मजुरांची' आवश्यकताही राहाणार नाहीं.

*डी. लेविन* या इंग्रज शिक्षिका चारपांच वर्षे सोविएत शाळांतून शिक्षिकेचें काम करीत होत्या. या अवधींत तेथील शाळांतून जे विद्यार्थी बाहेर पडले त्या सर्वांना आपापल्या आवडीचा व्यवसाय घेतां आला असें त्यांनीं नमूद केलें आहे. सोविएत शिक्षणपद्धतीच्या यशाची खात्री पटविण्यास हें एक उदाहरण पुरेसें आहे.

येथें आणखी एक महत्त्वाचा प्रश्न उपस्थित होतो. सोविएत शिक्षण कोणत्या दर्जाचें आहे ?

सोविएत शिक्षण देशाच्या बदलत्या व वाढत्या गरजा भागवूं शकतें कीं नाहीं ही कसोटी लावल्यास सोविएत शिक्षण उत्तम प्रतीचेंच ठरेल. केवळ इतर देशांच्या तुलनेनें विचार केला तर सोविएत यूनियनमधील दशवार्षिक शिक्षणक्रम इंग्लंडमधील हायस्कूल सर्टिफिकेट परीक्षेपेक्षां कमी पण आपल्या मॅट्रिक परीक्षेपेक्षां अधिक आहे, असें म्हणतां येईल. पण या तुलनेवरून शिक्षणाची खरी प्रत ठरवितां येणार नाहीं. देशाच्या गरजा भागविण्यास तें शिक्षण कितपत उपयुक्त आहे यावरूनच ती प्रत ठरवावी लागेल. या दृष्टीनें पाहिल्यास प्रथमच जी गोष्ट डोळ्यांत भरते ती ही कीं गेल्या महायुद्धांत सोविएत यूनियननें विद्येंत व शास्त्रसंशोधनांत उच्चांक गांठलेल्या जर्मनीशीं यशस्वी सामना दिला आहे. या युद्धांत उपयोगांत आणलेलीं, रणगाडे, तोफा, रॉकेट, विमानें इत्यादि असंख्य साधनें, सोविएत देशांत, सोविएत कामगारांनीं व इंजिनियरांनीं तयार केलीं होतीं आणि तीं वापरणारे कुशल यांत्रिकही सोविएत देशांतील होते. देशांतील सर्व कारखाने आतां सोविएत तज्ज्ञांच्या देखरेखीखालीं चालतात. उत्तरध्रुवावर स्वारी करणारे, ओसाड वाळवंटाचें नंदनवन बनविणारे, उत्तरेकडील फक्त दोनच महिने टिकणाऱ्या उन्हाळ्यांत गव्हांचें भरघोस पीक काढणारे शास्त्रज्ञ सोविएत देशांतच निर्माण झाले आहेत. सोविएत कलावंत, अभिनेते, नर्तक, खेळाडू, इतर कोणत्याही देशांतील लोकांशीं चांगलीच स्पर्धा करूं शकतात असें दिसून आलें आहे. गेल्या महायुद्धांत लाल सेनेंतील सोविएत सैनिकांचा आतां इतर देशांतील लोकांशीं चांगलाच परिचय झाला आहे. युद्धकालांतील सैनिक हा त्या त्या देशाचा प्रातिनिधिक मनुष्य समजावयास कांहींच प्रत्यवाय नाहीं ! कारण

युद्धकालांत देशांतील सामान्य नागरिकांची सैन्यांत भरती होते. लाल सेनेच्या सान्निध्यांत आलेल्या सर्व परदेशस्थ लोकांनीं एक गोष्ट मान्य केली आहे. लाल सेनेंतील सैनिक इतर कोणत्याही देशांतील सैनिकापेक्षां अधिक सुशिक्षित व सुसंस्कृत असतो आणि त्याच्या ज्ञानाचें क्षितिज अधिक विस्तृत असतें. सोविएत शिक्षण सोविएत समाजाच्या विकासाला अनुरूप असें आहे हें सिद्ध करण्यास एवढी गोष्ट पुरेशी आहे.

आतां सोविएत देशांत शिक्षणसंस्था, शिक्षकवर्ग, समाज आणि शासनसंस्था यांचे परस्पर संबंध कोणत्या प्रकारचे आहेत हें पाहाणें जरूर आहे. इतर देशांत ज्ञानदानाचें महत् कार्य करणाऱ्या शिक्षणसंस्थांबद्दल योग्य ती काळजी वाहिली जातेच असें नाहीं; उलट त्यांबद्दल उपेक्षेची व उदासीनतेची भावना दिसते व कधींकधीं तुच्छताही दर्शविली जाते. त्यांना बहुमानानें असें क्वचितच वागविण्यांत येतें. जर्मनींत नाझी हुकूमशाहीच्या काळांत शिक्षणाची कशी पिछेहाट झाली, शास्त्रीय ज्ञान दडपून ठेवण्याचे कसे पद्धतशीर प्रयत्न झाले व शासनसंस्था एकंदरींत ज्ञान व शिक्षण यांबद्दल तिरस्कार व्यक्त करीत असे, हें आतां सर्वश्रुत आहे. डार्विनच्या उत्क्रांतिवादाचें शास्त्रीय तत्त्व शिकविल्याबद्दल अमेरिकन शाळांतून शिक्षकांना काढून टाकल्याला फार वर्षें झालीं नाहींत. इंग्लंडमध्यें, प्राथमिक शिक्षकांची परिस्थिति इतकी बिकट आहे, कीं नुकत्याच मॅट्रिक पास झालेल्या मुली लग्न होईपर्यंत कांहीं वर्षें करावयाचा व्यवसाय, म्हणून प्राथमिक शिक्षक होतात. आपल्या देशांतील शिक्षणाची आबाळ व शिक्षकांची अनवस्था "मास्तरकी म्हणजे महारकी" या वाक्प्रचारावरून व्यक्त होते. मुंबई इलाख्यांत कांहीं प्राथमिक शिक्षकांनीं आपला व्यवसाय सोडला, दोन शिक्षक वेडे झाले व एकदोघांनीं आत्महत्या केली हें करुण निवेदन, परवांच शिक्षकसंपाच्या वेळीं, प्रि. दोंदे यानीं केलें आहे. १९४२ सालीं बनारस विश्वविद्यालय सहा महिने बंद करण्यांत आलें; व गेल्या वर्षी सर्व मोठया शहरांत विद्यार्थ्यांच्या मिरवणुकींवर, लाठया, छडया, अश्रुवायु व गोळीबार हीं सर्व साधनें सरकारनें वापरलीं. यावरून हिंदुस्थानांत शिक्षणसंस्था व सरकार यांचे संबंध कोणत्या प्रकारचे आहेत याची चांगली कल्पना येते.

सोविएत देशांत शिक्षकांची स्थिति सुधारावी यासाठीं समाज व सरकार यांजकडून किती काळजी घेतली जाते आणि शिक्षकाला जनतेंत कसें मानाचें स्थान आहे हें

आपण पाहिलें आहे. इतर देशांतील शिक्षकांप्रमाणें सोविएत शिक्षकाला आपला दर्जा, हक्क आणि वेतन मिळविण्यासाठीं समाजाशीं व शासनसंस्थेशीं अहर्निश झगडण्यांत, आपला उत्साह व शक्ति खर्च करण्याची आवश्यकता राहिलेली नाहीं. दुसरा कोणताच व्यवसाय मिळत नाहीं, किंवा जमत नाहीं, म्हणून नाइलाजानें मास्तरकी करण्याचा प्रसंग त्याच्यावर ओढवलेला नसतो. शिक्षकवर्ग एका बाजूला आणि त्याच्याविरुद्ध विद्यार्थी, शासनसंस्था आणि सर्वसाधारण जनता यांजकडून होणारी हेटाळणी, असा प्रकार तेथें शिक्षकाला सहन करावा लागत नाहीं. विद्यार्थी, जनता व शासनसंस्था या सर्वांचे ध्येय एकच आणि तें म्हणजे शिक्षणाचा दर्जा सुधारणें. यामुळें शिक्षकास स्नेहभाव व सहकार्य यांचें वातावरण सर्वत्र अनुभवास येतें. अर्थातच त्याला शिकविण्यास उमेद येते व स्वतांच्या कलेंत प्रगति करण्यास उत्साह वाटतो.

सरकारचें शिक्षणाकडे किती बारकाईनें लक्ष असतें याचें उत्तम गमक हेंच कीं शिक्षणक्षेत्रांतील प्रगतीची पूर्वयोजना, अगदीं तपशीलवार आंखण्यांत आलेली असते. ही शिक्षणयोजना देशाच्या इतर सर्व क्षेत्रांतील योजनेंतील एक पूरक भाग असते. पुढील वर्षांत किती, कोणत्या प्रकारच्या व कोणत्या ठिकाणीं शाळा उघडावयाच्या, त्यांसाठीं शिक्षकवर्ग किती लागेल, त्यांच्या अध्यापनाच्या शिक्षणाची व्यवस्था कशी करावयाची, खर्च कसा भागवावयाचा, इत्यादि सर्व गोष्टींची काळजीपूर्वक आंखणी केलेली असते. निरनिराळे अभ्यासक्रम, त्यांचे तपशील यांचाही या योजनेंत समावेश होतो. अभ्यासक्रमांत बदल करण्यापूर्वी शिक्षकांकडून सूचना मागविण्यांत येतात; त्यांचे अनुभव जमेस धरण्यांत येतात; त्यांना टीका करण्यांस प्रवृत्त करतात; आणि शेवटीं बदल करतांनाही शिक्षकांच्या मताला मान दिला जातो. वर्तमानपत्रें, शिक्षकसंघ, सोविएत सभा या शिक्षणाच्या योजनेंत बारकाईनें लक्ष घालून शिक्षणाविषयीं आस्था व कळकळ व्यक्त करतात. शिक्षणयोजना शक्य तों परिपूर्ण व्हावी असा सर्वांचा उद्देश असतो; आणि ती योजना अंमलांत आणावयाचें ठरलें कीं, तिची योग्य तऱ्हेनें अंमलबजावणी व्हावी याकरितां सर्वांचें सहकार्य मिळतें. कोणी कुचराई करीत असल्यास त्यावर कडक टीका होते. शिक्षणाविषयीं इतकी जागरूकता जगांत इतर कोठेंही दिसून येत नाहीं.

पूर्वनियोजित प्रगतीमुळें दोन महत्त्वाच्या गोष्टी साध्य होतात. मागासलेल्या

प्रदेशांकडे विशेष लक्ष पुरवून त्यांना शक्य तितक्या जलद इतरांच्या बरोबरीस आणणें, केवळ या योजनेमुळेंच शक्य होतें. दुसरें असें कीं, एकच अभ्यासक्रम शिकविणाऱ्या निरनिराळ्या संस्थांच्या शैक्षणिक दर्जामध्यें इतर देशांत विलक्षण अंतर आढळून येतें. तसें अंतर सोविएत देशांत दिसून येत नाहीं. सोविएत शाळांतील शिक्षणाचा सरासरी दर्जा कदाचित् पाश्चात्य राष्ट्रांतील, किंवा महाराष्ट्रांतीलहि नमुनेदार शाळेंतील एखाद्या वर्गाइतका नसेल. परंतु तो इतर अनेक राष्ट्रांतील बहुसंख्य शाळांच्या सरासरी दर्जापेक्षा खचित् उच्च प्रतीचा असेल, यांत शंका नाहीं. आणि इतर राष्ट्रांतील अत्युत्तम शाळा आणि अति वाईट शाळा यांमध्यें दिसून येणारें जमीन अस्मानाचें अंतर तेथें कधींच अनुभवास येणार नाहीं.

योजनाबद्ध शिक्षणांत एक उणीव येणें अपरिहार्य असतें. अभ्यासक्रमांत अगदीं आमूलाग्र फेरबदल करून पाहाण्यास त्यामुळें फारशी सवड मिळत नाहीं. परंतु सध्यां सर्व समाजाची शैक्षणिक उंची वाढविण्याचा प्रयत्न चालू आहे. किमान सार्वत्रिक शैक्षणिक प्रगति झाल्यावर प्रयोगस्वातंत्र्याचें क्षेत्र विस्तृत होईल, यांत शंका नाहीं.

थोडीशीं मुलें निवडून, त्यांना इतरांपासून वेगळें काढून, त्यांना उत्तम वातावरणांत शिकविण्याची आणि असे शैक्षणिक प्रयोग करून पाहाण्याची सोविएत देशांत सोय नाहीं, असा आक्षेप कांहीं शिक्षणशास्त्रज्ञ घेतील. त्यांना उत्तर असें कीं, सोविएत देशांत जगांतील बहुतेक सर्व शिक्षणपद्धतींचा प्रयोग करून पाहाण्यांत आला; आणि शेवटीं *मोठ्या प्रमाणावर शिक्षण देण्यास* योग्य अशा पद्धती स्वीकारून इतरांचा त्याग करण्यांत आला. समाजापासून अलग होऊन कृत्रिम वातावरणांत एखादी शैक्षणिक पद्धति यशस्वी केल्यानें, सर्व जनतेच्या शिक्षणाकरितां तिचा यत्किंचितही उपयोग नाहीं; कोणत्याही शैक्षणिक पद्धतीची उपयुक्तता, ती समाजाच्या सध्यांच्या परिस्थितींत बहुजन समाजाचा सांस्कृतिक व शैक्षणिक विकास साधण्यास किती सोयीची आहे, यावर अवलंबून असते; असा सोव्हिएतचा दृष्टिकोन आहे. सोविएत शिक्षणाच्या इतिहासाला या दृष्टीनें शैक्षणिक महत्त्व आहे. तेथें अतिशय प्रतिकूल परिस्थितींतहि मोठ्या प्रमाणावर शैक्षणिक पद्धतींचे प्रयोग करून त्या पारखण्यांत आल्या व येतात; आणि ज्या कसोटीला उतरतात त्यांचा शिक्षणक्रमांत समावेश करण्यांत येतो.

इतर देशांहून सोविएत देशांत जी विशेष गोष्ट दिसते ती ही कीं तेथें सरकार व जनता यांना शिक्षणाचें महत्त्व पटलेलें आहे; आणि म्हणूनच तेथें शिक्षणाकडे इतकें लक्ष पुरविलें जातें. जगांत इतर कोणत्याही देशापेक्षां, सोविएत यूनियनमध्यें, त्यांच्या राष्ट्रीय उत्पन्नाच्या मानानें, शिक्षणाप्रीत्यर्थ अधिक खर्च करण्यांत येतो, असें प्रो. जी. काऊन्टस यांनीं म्हटलें आहे ("एशिया व अमेरिका" ऑक्टोबर १९४५). सोविएत समाज शिक्षणाचा इतका अभिमानी आहे; परंतु "शिक्षण ही एक चांगली गोष्ट आहे, ती सर्वांना मिळावी" अशा प्रकारची केवळ भूतदयावादी भावनात्मक भूमिका त्याच्या मागें नाहीं; किंवा "ज्ञानदान हें पवित्र कार्य आहे" असा धार्मिक दृष्टिकोनहि याला कारणीभूत नाहीं. ज्ञान व शिक्षण यांची आवश्यकता कशासाठीं आहे ? तर, शास्त्रीय दृष्टीनें विचार करून जीवन समृद्ध करण्यासाठीं. यांत्रिक साधनें कशीं निर्माण करतात, तीं कशीं वापरतात, त्यांची जरूरी कशासाठीं आहे, त्यांचा वापर केल्यानें सर्व समाजाचा कसा फायदा होईल, या सर्व गोष्टींचें ज्ञान मिळविण्यासाठीं. ज्ञान हें सृष्टींतील गुप्त भांडार खोलण्याचें आणि मानवाचें जीवन अधिकाधिक समृद्ध व सुसंस्कृत करण्याचें एकमेव साधन आहे, हा सोविएत समाजाचा ज्ञान व शिक्षण यांविषयींचा स्पष्ट वस्तुवादी दृष्टिकोन आहे.

त्यामुळें तेथील शिक्षणाचें स्वरूप, त्या त्या वेळच्या जागतिक व देशांतील परिस्थितीवर अवलंबून असतें. बदलत्या जागतिक परिस्थितीप्रमाणें व समाजाच्या त्या त्या वेळच्या गरजांना अनुरूप असे फेरबदल शिक्षणामध्यें करणें आवश्यक असतें, ही गोष्ट त्यांना पटलेली आहे. सोविएत शिक्षणामध्यें गेल्या पंचवीस वर्षांत जे झपाट्यानें फेरबदल झाले, त्याचें मर्म हेंच आहे कीं, सोविएत शिक्षणयोजना पोलादी चौकटीसारखी नाहीं. कारण सोव्हिएत समाज स्थगित नसून विकासशील आहे. *सोव्हिएत शिक्षणयोजनाही, म्हणूनच, विकासशील आहे.*

सोविएतमध्यें शिक्षण व समाज यांचे संबंध इतर देशांहून वेगळे असल्यामुळें तशा वातावरणांत वावरणाऱ्या सोविएत विद्यार्थ्यांचा दृष्टिकोनहि वेगळा बनला आहे. समाज व शासनसंस्था यांमध्यें हितविरोध नसल्यामुळें विद्यार्थिवर्ग विरुद्ध सरकार.

शिक्षक विरुद्ध विद्यार्थी, असे इतर देशांत आढळून येणारे विरोध तेथें दिसून येत नाहींत. सर्वांचें ध्येय समाजवादी संस्कृति निर्माण करण्यासाठीं शिक्षणाचा दर्जा वाढविणें हेंच आहे. अर्थात् विद्यार्थ्याला सर्वत्र स्नेहभावाचें वातावरण प्रत्ययास येतें आणि शिक्षण घेण्याचा उत्साह अनुभवास येतो. नवा समाज घडविण्याची जबाबदारी पुढें आपल्यावर पडणार आहे, यासाठीं शिस्तीची अतिशय आवश्यकता आहे, बाहेरच्या सोविएत समाजांतहि त्याच दिशेनें प्रयत्न करण्यांत येत आहेत, ह्या जाणीवेमुळें सोविएत विद्यार्थी स्वयंस्फूर्त, डोळस शिस्तीचा भोक्ता बनतो.

आर्थिक सुरक्षिततेची खात्री आणि योग्य वेळीं वैवाहिक जीवनाची शक्यता, यामुळें अतृप्त लैंगिक वासना व विकृती त्याचा पाठलाग करीत नाहींत. सोविएत शिक्षणसंस्थांतून योग्य वयांत लैंगिक विषयाचें ज्ञान देतात, पण पाश्चात्य देशांतल्या-प्रमाणें लैंगिक प्रश्नांस तेथें फाजील महत्त्व देण्यांत येत नाहीं, व इतर देशांप्रमाणें या प्रश्नांवर उभारलेले, शृंगारिक मनोभावनांस उत्तेजित करणारे, चित्रपट व वाङ्मयहि तेथें आढळत नाहीं. आपण आपली लायकी सिद्ध केल्यास आपल्याला हवा तो व्यवसाय मिळेल याची त्याला खात्री असते. त्यामुळें इतर देशांतील सुशिक्षित तरुणांस अनुभवावी लागणारी, बेकारीमुळें उत्पन्न होणारी अगतिकता सोविएत देशांत दिसून येत नाहीं. शिक्षणाचा सामाजिक जीवनाशीं निकटचा संबंध असल्या-मुळें, किंबहुना समाज हेंच शिक्षणाचें अधिष्ठान असल्यामुळें, नवा सोविएत विद्यार्थी उत्साही, जबाबदार, कार्यतत्पर आणि सुसंस्कृत तरुण असल्याचें, इतर देशांहून वेगळें, असें दृश्य, सोविएत देशांत दिसतें.

अशा नवीन परिस्थितींत शिक्षणाचीं व संस्कृतीचीं मूल्यें आणि विद्यार्थ्यांचें आदर्श हीं बदललीं आहेत, यांत मुळींच नवल नाहीं. त्यांना कोणती संस्कृति निर्माण करावयाची आहे ? *त्यांना नवीन समाजवादी संस्कृति निर्माण करा-वयाची आहे; या संस्कृतीचा गाभा आंतरराष्ट्रीय समाजवादी आणि स्वरूप राष्ट्रीय आहे*. आणि समाजवादी क्रांतीच्या वेळीं क्रांतिकारक कामगार वर्ग आपल्या शृंखलांबरोबरच सर्व दलित जनतेच्या शृंखला तोडतो, त्याप्रमाणें ही नवी संस्कृतीही केवळ कामगार वर्गाची न राहतां सर्व जनतेची बनत आहे. या संस्कृतीच्या निर्मितीसाठीं आणि तिच्या संवर्धनासाठीं शिक्षणाची आवश्यकता आहे आणि हेंच

तेथील शिक्षणाचें उद्दिष्ट. *प्रो. शात्स्की* हे प्रख्यात रशियन शिक्षणतज्ज्ञ सोविएत शिक्षणपद्धतीविषयीं म्हणतात, "आम्ही जनतेला व्यापक शिक्षण देण्याचा प्रयत्न करीत आहोंत. आम्ही आकुंचित राष्ट्रीय वृत्तीचीं माणसें तयार करीत नसून इतर राष्ट्रांचे विषयीं मित्रत्वाची भावना निर्माण करीत आहोंत. गरिबांची पिळणूक नसलेला, निसर्गशक्तीवर स्वामित्व चालविणारा, बहुजनांत संस्कृतिप्रसार करणारा, आणि सर्वसामान्य जनांना आत्मविकासाची संधि देणारा असा एक नवीन समाज आम्ही निर्माण करीत आहोंत. सर्व जगाला मुक्त करण्याचें आमचें ध्येय आहे."

या नव्या मानवाच्या नव्या संस्कृतीला साजेशीं नवीं नैतिक मूल्यें तेथें रुजविलीं जात आहेत; आणि शिक्षणसंस्थांमध्यें या नवीन संस्कृतीला योग्य अशा चारित्र्याची घडण केली जात आहे. विद्यार्थ्यांचा नैतिक विकास होण्यासाठीं शिक्षणसंस्थांमध्यें व बाहेर सर्व प्रकारें प्रयत्न केले जातात याचा उल्लेख मागें आलाच आहे. हीं नवीं मूल्यें पारलौकिक, धार्मिक किंवा अतिमानुष व आध्यात्मिक पायावर उभारलेलीं नसून त्यांचा पाया ऐहिकच म्हणजे सामाजिक विकास हाच आहे, हेंही आपण पाहिलें. या नव्या नीतीचे विशेष कोणते ? *शारीरिक व मानसिक आरोग्य, बल व विकास हा या नीतीचा पाया आहे. सामायिक दृष्टिकोन ( Collective Outlook ), समता व बंधुभाव, समाजकार्याची निष्ठा ( Social Service ) प्रत्येक गोष्टीकडे समाजाच्या हिताच्या दृष्टीनें पाहाण्याची संवय,* हे या नव्या नीतीचे विशेष आहेत. या नव्या नीतीला अनुरूप असे सामाजिक रिवाजहि आतां तेथें रूढ झाले आहेत; एक नवी परंपरा तयार होत आहे. यामुळें विद्यार्थ्यांचे आदर्श अर्थातच बदलले आहेत. सोविएत विद्यार्थी रॉकफेलरसारखा कोट्याधीश होणें हा अमेरिकन तरुणांचा आदर्श मानीत नाहींत. समाजाच्या संपत्तींत अधिकाधिक भर घालणारा हुशार यंत्रतज्ज्ञ कामगार, शेतकरी, साहित्यिक किंवा संशोधक हे सोविएत विद्यार्थ्यांचे आदर्श असतात.

अशी ही नवी संस्कृति सर्व बहुजन समाजास उपलब्ध व्हावी, सर्व देशच्या देश सुशिक्षित व सुसंस्कृत व्हावा या दिशेनें प्रचंड प्रमाणावर सांस्कृतिक व शैक्षणिक विकासाची सोय तेथें करण्यांत येत आहे, हा सोविएत शिक्षणयोजनेचा महत्त्वाचा विशेष आहे. जगांतील इतर देशांत संस्कृति ही लहानशा वर्गाची, अल्पसंख्य

लोकांची, खास मिरास समजली जाते. त्यांनाच पुरसतीचा वेळ सुसंस्कृतपणें घालविण्याचीं साधनें उपलब्ध असतात व त्यांचा उपभोग घेण्याची पात्रताहि त्यांच्याच अंगीं असते. संस्कृतीचे सुवर्णकलश इतरांच्या हातीं लागावयाचे नाहींत अशीच स्थिति शतकानुशतकें चालत आलेली आहे. सोविएत देशांत मात्र संस्कृतीचा हा प्राचीन रूढ अर्थ बदलत आहे. लहानपणापासून छंदमंडळें व क्लब यांच्या द्वारा फुरसतीचा वेळ नेणतेपणें कसा उपयोगांत आणावा, याचें बाळकडू मुलांना मिळालेलें असतें; व मोठेपणीं सुसंस्कृतपणें कालक्षेप करण्याची व्यवस्था विस्तृतपणें केलेली असते. क्लब, पार्के, संस्कृतिमंदिरे यांची व प्रौढशिक्षणाची तरतूद केवढ्या मोठया प्रमाणावर केलेली आहे हें आपण मागें पाहिलेंच आहे. या ठिकाणीं, प्रौढ स्त्रीपुरुष शैक्षणिक व सांस्कृतिक प्रगति करून घेत आहेत; आणि भिंतपत्रिका, वाङ्मयमंडळें, कलामंडळें, नाटयमंडळें इत्यादिकांच्या द्वारा स्वतांही संस्कृतींत भर टाकीत आहेत. शैक्षणिक प्रगतीचा केवळ व्याप पाहिला तरी शिक्षण घेणाऱ्या एकंदर मनुष्यांचें एकूण लोकवस्तीशीं प्रमाण सोविएत देशांतच अधिक आहे. यावरून तेथील शिक्षणाचें ध्येय कसें अंमलांत येत आहे, याची कल्पना येते.

कोणत्यातरी शिक्षणसंस्थेंत नियमितपणें शिक्षण घेणाऱ्यांचें एकूण लोकवस्तीशीं प्रमाण

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ब्रिटिश ट्रॉपिकल आफ्रिका | (१९३५) | शेंकडा | ३·५ | टक्के |
| हिंदुस्तान | (१९३०) | ,, | ३·३ | ,, |
| फ्रान्स | ,, | ,, | ११·२ | ,, |
| जर्मनी | ,, | ,, | १३·२ | ,, |
| इंग्लंड | ,, | ,, | १५·३ | ,, |
| अमेरिका | ,, | ,, | २१·९ | ,, |
| काझाकिस्तान (सोविएत) | (१९४०) | ,, | २५·२ | ,, |
| सोविएत यूनियन | ( ,, ) | ,, | २८·० | ,, |

एकूण लोकसंख्येच्या *चौथ्या* हिश्शाहून अधिक लोक तेथें शिकत आहेत. सोविएत यूनियनमधील प्रगतीची ही दिशा व व्याप पाहिलीं कीं, "कामाचे तास कमी झाले तर लोक आपला फावल्या वेळाचा दुरुपयोग करतील, व्यसनासक्त बनतील." अशा

प्रकारचीं विधानें करणाऱ्या कांहीं पाश्चात्य व हिंदी विद्वानांची दृष्टि किती चूक आहे, हें स्पष्ट दिसतें.

गेल्या पंचवीस वर्षांतील शैक्षणिक प्रगतीचें दृश्य फळ आतांच दिसूं लागलें आहे. १९३७ सालीं सोविएत देशांत नवीन "सुशिक्षित" वर्ग ( *Intelligentsia* ) सुमारें ९६ लक्ष इतका मोठा होता. दर वीस लोकांत एक मनुष्य चांगला सुशिक्षित होता, असा याचा अर्थ आहे. हें प्रमाण दिवसेंदिवस वाढत जाईल यांत शंका नाहीं. तिसऱ्या पंचवार्षिक योजनेंतील शिक्षणाचा कार्यक्रम किती प्रचंड होता, हें आपण पाहिलें आहे. सोविएत जनतेचे पुढारी *मार्शल स्तालिन* यांनीं असा निश्चय प्रकट केला आहे कीं, "आम्हांला सर्व जनतेची शैक्षणिक व सांस्कृतिक उंची इंजिनियर डॉक्टर, यांच्या तोडीची करावयाची आहे. ही गोष्ट असाध्य आहे असें म्हणणें हास्यास्पद आहे!" दीर्घकाल शांतता लाभली तर स्तालिन यांचें हें भाकित लवकरच खरें ठरेल यांत संशय नाहीं. १९२१ सालीं, इंग्रज लेखक *मि. ब्रेल्सफर्ड* यांनी सोविएत देशाविषयीं लिहितांना पुढील उद्गार काढले होते; "आजपर्यंत युरोपांत ( व इतरत्र ) मूठभर अल्पसंख्यांकच सुसंस्कृत होते. सर्व देशच्या देश सुसंस्कृत करण्याचा प्रयत्न फक्त सोविएत यूनियनमध्येंच चालला आहे." सर्व जनता सुसंस्कृत करण्याच्या दिशेनेंच सोविएत देशांची शैक्षणिक व सांस्कृतिक प्रगति चालू आहे हें स्तालिन यांच्या वरील उताऱ्यावरून स्पष्टपणें दिसतें. अर्थात् सोविएत देशांत *"शिक्षण" खातें* नसून *"संस्कृति विकास" खातें* आहे ही गोष्ट अन्वर्थक आहे यांत शंका नाहीं! *

आपण आतांपर्यंत सोविएत देशाच्या शिक्षणांतील वैशिष्ठ्यपूर्ण गोष्टी पाहिल्या. एकीकडे सोविएत देशांत उत्तरोत्तर वरीलप्रमाणें शैक्षणिक प्रगति व सांस्कृतिक विकास घडून येत आहे; नवी संस्कृति जन्मास येत आहे. तर दुसरीकडे, इतर देशांत, शिक्षणामध्यें पेंचप्रसंग ओढवला आहे. ज्या काळांत सोविएत देशांत ही अपूर्व शैक्षणिक प्रगति चालली होती, त्याच काळांत शिक्षणाचें व संस्कृतीचें आगर असें जें जर्मन राष्ट्र, तेथें शिक्षणाची व संस्कृतीची दुर्दशा होत होती. उच्च शिक्षणाच्या

---

* ***Comissariat for Enlightenment***;
रशियन शब्द ***Prosvestchenye = Enlightenment***
असा आहे.

संस्था बंद झाल्या; नामांकित शास्त्रज्ञांना देश सोडून परागंदा व्हावें लागलें; स्त्रियांची शिक्षणक्षेत्रांतून हकालपट्टी होऊन त्यांची पुन्हा एकदां सैंपाकघराच्या व माजघराच्या चार भिंतींत रवानगी करण्यांत झाली; शास्त्राबद्दल व ज्ञानाविषयीं अपरिमित तिरस्कार व तुच्छता दाखविण्यांत येऊं लागली; आणि "ज्यूंचें रक्त आर्यन रक्तापेक्षां निराळें आहे" अशासारखे अशास्त्रीय दुष्ट पूर्वग्रह शास्त्र म्हणून डोक्यावर घेऊन मिरविण्यांत येऊं लागले. इंग्लंडमध्यें शिक्षणक्रम संपण्याच्या अखेरच्या वर्षी, म्हणजे अल्पवयांतच व्यवसायाविषयींची विवंचना मुलांना छळूं लागते, बेकारीचें भूत भेडसावूं लागतें, आवडीचा कामधंदा मिळणें अशक्य होऊन निराशाच पदरीं पडते! इंग्लंडमधील नागरिकाला प्रौढपणीं शैक्षणिक व सांस्कृतिक विकासाचा लाभ क्वचितच होतो. ब्रिटिश प्रतिगामी वर्गाला शिक्षणविषयक योजनेंत फॅशिस्ट पद्धति अवलंबिण्याची इच्छा होती, हें कॉन्झर्वेटिव पक्षाच्या "शिक्षणाचे उद्देश" (*Education Aims*) या चोपडयावरून कळून येतें.*

हिंदुस्तानाकडे नजर फेंकल्यास येथें शिक्षण किती निकृष्ट अवस्थेंत आहे हें सर्वांना जाणवत आहेच; शिवाय जागोजाग दिलेल्या आंकड्यांवरूनही आजची दुःस्थिति प्रत्ययास येईल. दुय्यम व उच्च शिक्षण अतिशय डोईजड झालें आहे. *सार्जंट समितीच्या मतें ही शिक्षणयोजना साफ नाहींशी केली पाहिजे, तिच्यामध्यें दुरुस्तीला मुळींच वाव नाहीं.* या परिस्थितीचें मुख्य कारण पारतंत्र्य आहे यांत मुळींच शंका नाहीं. परंतु स्वातंत्र्य संपादनानंतर हा प्रश्न चुटकीसरसा सुटेल असें म्हणणें अगदीं चुकीचें ठरेल. इतर राष्ट्रांच्या मानानें आपणांस बराच मार्ग आक्रमावयाचा आहे आणि तो इतर राष्ट्रांप्रमाणें आपणांस सावकाश आक्रमितां

* या चोपड्यांत तीन मुख्य मुद्दे मांडण्यांत आले आहेत. (१) बोल्शेविझमच्या विरुद्ध तोडगा म्हणून सरकारपुरस्कृत धार्मिक शिक्षणाची जरूरी प्रतिपादन करण्यांत आली आहे. (२) "निरोगी व सुखी आयुष्यासाठीं शिक्षण" या कल्पनेची हेटाळणी करण्यांत आली आहे. (३) रोगराई, मृत्यु, दुःख व कुचंबणा, या 'दुर्दैवी घटना' सहन करण्याची मानसिक तयारी करून देणारें शिक्षण देण्यांत यावें; कारण त्यांच्या मतें दुःख हें आयुष्यांत वाढून ठेवलेलें असणारच! ही योजना युद्धकाळासाठीं होती असें कोणास वाटेल; कारण युद्धकाळांत देशांतील नागरिकांना अनेक हालअपेष्टा सहन कराव्या लागतात. पण खरोखर ती युद्धोत्तर शांततेच्या कालासाठीं योजलेली होती! सुदैवानें या प्रतिगामी गटाचा विरोध हाणून पाडून पार्लमेंटांत नवीन शिक्षण कायदा पास झाला आणि नंतर निवडणुकींत कॉन्झर्वेटिव पक्षाचा सपशेल पराभवहि झाला. असो

यावयाचा नाहीं. त्यासाठीं आपल्याला वेगवान् योजनाबद्ध प्रगतीचें धोरण स्वीकारावें लागेल, ही गोष्ट निर्विवाद आहे. या कामीं सोविएत देशानें थोडक्या अवधींत केलेल्या प्रचंड प्रगतीपासून आपल्याला पुष्कळ शिकण्यासारखें आहे.

राष्ट्रीय स्वातंत्र्य म्हणजे अनिर्बंध शैक्षणिक विकास असें समीकरण मांडणें बरोबर होणार नाहीं, याला आणखीहि एक कारण आहे. उच्च शिक्षणाबद्दलचा खालील उतारा पाहा. "सरकारी नोकर व कारकून निर्माण करण्यासाठीं सध्यांचें कॉलेजशिक्षण पुरेसें आहे, पण सर्व समाजाला सुशिक्षित करण्याच्या कामीं तें अयोग्य ठरलें आहे...... विद्यार्थ्यांचें मुख्य काम नोटस् घेणें......दुसरें कांहींच करावयास नाहीं म्हणून बहुसंख्य विद्यार्थी कॉलेजांत येतात......विशिष्ट प्रोफेसरचें व्याख्यान ऐकणें ही फॅशन होऊन बसते......बहुतेक विद्यार्थी पास होण्यासाठीं आवश्यक म्हणूनच केवळ तासाला बसतात......प्रोफेसरांशीं त्यांचा कधींच संबंध येत नाहीं ......बहुसंख्य विद्यार्थी अभ्यास करण्याच्या भानगडींत पडत नाहींत...... प्रोफेसरांना फसवून कशीतरी परीक्षा उतरण्याकरितां त्यांचा सर्व खटाटोप असतो!"

एखाद्याला वाटेल कीं हें वर्णन हिंदी कॉलेज विद्यार्थ्यांचें आहे, पण खरोखरी तें *टॉल्स्टॉय* यांनीं रेखाटलेलें झारशाहींतील सर्वसाधारण रशियन विद्यार्थ्यांचें चित्र आहे! रशिया हा देश टॉल्स्टॉयच्या वेळीं स्वतंत्रच होता; तरीहि तेथें ही परिस्थिति होती. स्वतंत्र जर्मन राष्ट्रांत काय झालें हें आपण वर पाहिलेंच, आणि इंग्लंडमध्यें तरुणांचा भविष्यकाल कितीसा आशादायक असतो व त्यावर प्रतिगामी पक्षाचा इलाज कोणता होता याचाहि उल्लेख वर आला आहे. यावरून राष्ट्रीय स्वातंत्र्य म्हणजेच शैक्षणिक व सांस्कृतिक विकास असें म्हणणें बरोबर कां नाहीं हें कळून येईल. स्वातंत्र्याबरोबरच, शिक्षण आणि संस्कृति यांच्या अमर्याद व अनिर्बंध विकासाला पोषक अशी समाजपद्धति असेल तरच सर्व जनतेला खरी प्रगति करतां येईल.

सोविएत शिक्षणपद्धतीच्या यशावरून हा निष्कर्ष निघतो.

# युद्धकाल आणि युद्धानंतर १४

वीसपंचवीस वर्षांच्या अल्पावधींत सोविएत देशानें शिक्षण क्षेत्रांत केवढी मोठी प्रगति केली, आणि या प्रगतीचे विशेष कोणते हें आपण आतांपर्यंत पाहिलें. १९३८ सालीं योजलेल्या तिसऱ्या पंचवार्षिक कार्यक्रमांत शैक्षणिक व सांस्कृतिक विकासाची योजना किती व्यापक होती याची कल्पना निरनिराळ्या प्रकरणांतील उल्लेखांवरून सहज करतां येते. जागतिक महायुद्धाचा धोका दिसूं लागतांच सोविएत देशास स्वसंरक्षणार्थ तयारी करणें भाग होतें. त्यामुळें शिक्षणक्षेत्रांतील कांहीं योजना स्थगित झाल्या व इतरहि कांहीं फेरबदल झाले. त्यांपैकीं कित्येकांची माहिती मागें आली असून कांहींचा विशेष विचार शेवटीं परिशिष्टांत करण्यांत येणार आहे.

सबंध यूरोपखंड पायाखालीं घालून १९४१ सालच्या जून महिन्यांत नाझी जर्मनीनें आपल्या सर्व बळानिशीं सोविएत देशावर निकराचा हल्ला केला. आपली सर्व शक्ति एकवटून सोविएत देशानें या परचक्रास तोंड दिलें आणि चार वर्षांच्या घनघोर युद्धानंतर आपला देश मुक्त केला; हिटलरशाहीचा संपूर्ण पराभव केला. या महायुद्धाचे सोविएत शिक्षणसंस्थांवर कोणते परिणाम झाले, या संकटाला विद्यार्थी,

शिक्षक, शिक्षणसंस्था यांनीं कसें तोंड दिलें, लाल सेनेनें मुक्त केलेल्या प्रदेशांत शैक्षणिक प्रगतीस पुन्हा कशी झपाटयानें सुरवात झाली, आणि युद्धोत्तर कालांतील पहिल्या पंचवार्षिक योजनेंत ( सन १९४६ ते ५० ) शैक्षणिक कार्यक्रमाचें स्वरूप कोणत्या प्रकारचें आहे याचें थोडक्यांत विवेचन करण्याचें या शेवटच्या प्रकरणांत योजिलें आहे.

जर्मन आक्रमणामुळें सोविएत जीवनाला केवढा विलक्षण हादरा बसला असला पाहिजे, प्रगतीच्या धांवत्या गाडयाला कशी खीळ बसली असली पाहिजे, याची सर्वतया कल्पना करणें देखील कठीण आहे. पण वाचकांच्या आठवणीसाठीं म्हणून पुढील गोष्टी नमूद केल्या आहेत. १९४१ सालीं नाझी स्वारीला सुरवात झाल्यापासून स्तालिनग्राडच्या अपूर्व संग्रामानंतर सोविएतची विजयी प्रतिचढाई सुरू होईपर्यंतच्या काळांत जर्मनीनें सोविएत देशाचा पांच कोटीहून अधिक लोकवस्तीचा ( एकूण लोकसंख्येच्या $\frac{1}{4}$ हून अधिक ) भाग व्यापला होता. हा सर्व प्रदेश खाणी कारखाने, उद्योगधंदे यांनीं गजबजलेला, व "गव्हांचें कोठार" म्हणून नांवाजलेला होता. लाल सेनेच्या अखेरच्या तुफानी मोर्चापुढें माघार घेतांना जर्मनांनीं ही सर्व भूमि बेचिराख केली. या चार वर्षांत ७० लक्ष स्त्रीपुरुष ठार झाले आणि २ कोटि नागरिक जखमी झाले. दर पंचवीस मनुष्यांत *एक* ठार आणि *तीन* जखमी असें हें प्रमाण पडतें. यांमधील बहुतेक सर्व आयुष्याच्या ऐन उमेदींतील तरुण स्त्रीपुरुष होते. असले पाहिजेत. एक संबंध सोविएत पिढी कोणत्या दिव्यांतून गेली याची कांहींशी कल्पना यावरून येऊं शकेल.

प्रथम या महायुद्धाचा शिक्षणसंस्थांवर कोणता परिणाम झाला हें पाहूं. जो प्रदेश शत्रूनें व्यापला तेथील शैक्षणिक जीवन ताबडतोब संपुष्टांत आलें. माघार घेण्यापूर्वी लाल सेना आपल्या प्रदेशांतील १४ वर्षांखालील मुलांना सर्वांआधीं देशाच्या आंतल्या भागांत दूरवर पोंचविण्याची व्यवस्था करीत असे. शत्रुव्यास युद्ध चालू असलेले आणि युद्धाचा धोका असलेले प्रदेश, यांमधील शाळा ओस पडल्या. पण जेथें निर्वासित मुलांच्या राहाण्याची व्यवस्था करण्यांत आली, त्या देशांतील दूरच्या भागांत, शाळकरी विद्यार्थ्यांची गर्दी झाली. शाळा व वसतिगृहांकरितां उज्बेकिस्तानसारख्या दूरच्या प्रदेशांत निर्वासित यूक्रेनियन व श्वेतरशियन मुलांसाठीं शेंकडों नव्या इमारती बांधण्यांत आल्या. कांहीं

ठिकाणीं एकाच इमारतींत दिवसांतून दोन वेळ, तीन वेळ, वर्ग चालवून मुलांच्या शिक्षणाची सोय करण्यांत आली. वर्गांतील मुलांची संख्या फुगली; कित्येक वर्ग ४०–४५ मुलांचे, इतके मोठे, बनले. युद्धकालीन बिकट परिस्थितींत इमारती, उपकरणें, पुस्तकें, कपडेलत्ते इत्यादि सर्व साहित्यांची निर्वासित मुलांसाठीं व्यवस्था करणें किती कठीण गेलें असेल याची कल्पना सहज करतां येईल. पण शिक्षक, अधिकारीवर्ग, आणि विशेषतः स्थानिक जनता यांच्या सहकार्यामुळें भावी पिढीच्या शिक्षणांत खंड पडला नाहीं.

शाळेंतील शिक्षणाचें व अभ्यासक्रमाचें स्वरूप सामान्यपणें पूर्वीप्रमाणेंच राहिलें. सर्वसाधारण बौद्धिक शिक्षण देऊन फॅशिस्टविरोधी युद्धांत लढणाऱ्या जगांतील इतर देशांतील जनतेविषयीं बंधुभाव, आणि आपल्या देशाच्या रक्षणासाठीं सज्जता, या दोन गोष्टी विद्यार्थ्यांच्या मनावर बिंबविणें हें शिक्षणाचें सर्वसामान्य सूत्र होतें. यास अनुसरून थोडेसे फेरफार झाले. अभ्यासक्रमांत शारीरिक शिक्षण आणि लष्करी शिक्षण यांचें महत्त्व व वेळ वाढला. पूर्वी या शिक्षणाला एकंदर वेळापत्रकाच्या शेंकडा ६·२ इतका वेळ दिला जात असे, आतां तें प्रमाण शेंकडा ११ पर्यंत वाढलें. वरच्या वर्गांतील मुलांना सुट्टीच्या दिवसांत लष्करी कँपला नेण्यांत येऊं लागलें. लष्करी नकाशे पाहातां येणें, बंदूक वापरतां येणें, युद्धोपयोगी लष्करी हालचालींची माहिती, यांवर लष्करी शिक्षणाचा विशेष भर असे. प्रथमोपचार, शुश्रूषा, विमानहल्लाप्रतिबंधक कार्य, ( *A. R. P.* ) यांविषयीं मुलींना विशेष शिक्षण देण्यांत येऊं लागलें.

रशियन वाङ्मय आणि इतिहास हे विषय शिकवितांना विद्यार्थ्यांचें लक्ष ऐतिहासिक वीरपुरुषांच्या पराक्रमाकडे वेधण्यांत येऊं लागलें. भूगोल विषयाच्या अभ्यासांत निरनिराळ्या प्रदेशांचें आर्थिक महत्त्व आणि त्यांची स्वाभाविक रचना ( *Topography* ) यांवर विशेष भर देण्यांत येऊं लागला. गणित व रसायनादि शास्त्रीय विषयांचा संबंध देशसंरक्षण आणि शेतकी व उद्योगधंदे यांमधील उत्पादन, यांच्याशीं जोडण्यांत येई. तसेंच युद्ध जिंकण्यासाठीं सैनिक, कामगार, शेतकरी हे जसे कमालीचे प्रयत्न करीत आहेत, त्याचप्रमाणें विद्यार्थ्यांनींहि आपली अभ्यासांतील तयारी, कल्पकता आणि शिस्त अधिकाधिक वाढविली पाहिजे असें त्यांच्या मनावर नित्य ठसविण्यांत येई.

एकाद्या मोठ्या बलाढ्य शत्रूला तोंड देण्यासाठीं देशांतील जनतेचें सर्व लक्ष व प्रयत्न, युद्धोत्पादन आणि प्रत्यक्ष युद्ध यांवर केंद्रित होणें स्वाभाविक होतें. त्यामुळें दशवार्षिक शिक्षणाची योजना मागें पडलीच; शिवाय पंधरा वर्षांखालील मुलांनीं काम करावयाचें नाहीं हा नियमहि सैल करण्यांत आला. बारा वर्षांवरील मुलांना शाळेंतील अभ्यासाव्यतिरिक्त वेळांत युद्धप्रयत्नांस हातभार लावण्याची परवानगी मिळाली व तसें उत्तेजनहि देण्यांत येऊं लागलें. यंत्रकुशल कामगारांची मोठ्या संख्येनें गरज होती; त्यासाठीं धंदेशिक्षणाची नवी योजना अंमलांत आली. तिचा उल्लेख मागें आलाच आहे. शाळेच्या वर्कशॉपमध्यें आणि कारखान्यांत युद्धोपयोगी वस्तूंचें उत्पादन करण्यासाठीं शाळेंतील विद्यार्थी पुढें आले. शहरी शाळांतील मुलांनाहि शेतीचें प्राथमिक शिक्षण देण्यांत येऊं लागलें. हेतु हा कीं हंगामाच्या दिवसांत शेतकऱ्यांस शेतीच्या कामांत विद्यार्थी व शिक्षक यांची मदत व्हावी. ( शेतांवरील बरेच तरूण सैन्यांत दाखल झाले असल्यामुळें शेतांवर मनुष्यांचा तुटवडा जाणवत होता. ) १९४३ सालीं केवळ रशिया या राष्ट्रांतच ४१ लक्ष विद्यार्थ्यांनीं सुट्टीच्या दिवसांत शिक्षकांच्या नेतृत्वाखालीं शेतांवर काम केलें. यांपैकीं प्रत्येक विद्यार्थ्यानें वर्षांतून सरासरी चाळीस दिवस काम केलें असें नमूद झालेलें आहे. शेतांवर व कारखान्यांत काम करणारे विद्यार्थी सामान्यपणें पांचव्या इयत्तेपासून दहाव्या इयत्तेपर्यंतचे (वय १३ ते १८) होते.

याहून लहान वयाचीं मुलेंहि देशाच्या संकटकालीं अहमहमिकेनें पुढें आलीं व त्यांनीं आपल्या वयाला साजेशी देशोपयोगी कामगिरी बजाविली. धातूंची मोड ( विशेषतः लोखंडाची ) गोळा करण्यासाठीं, युद्धनिधि जमा करण्यासाठीं, सैनिकांच्या कुटुंबांना मदत करण्यासाठीं, जखमी सैनिकांचें मनरंजन करण्यासाठीं, आणि अशाच तऱ्हेचीं इतर कामें करण्यासाठीं, लहान मुलांनीं "*तिमूर पथकें*" स्थापलीं. मॉस्को येथील शाळकरी मुलांनीं आगीचें बॉंब विझवणें, हिंवाळ्यांत सरपण जमवणें, वगैरे अनेक गोष्टी स्वयंस्फूर्तीनें केल्या. पायोनियर दलानें या सर्व मुलांच्या युद्धप्रयत्नांत संघटितपणा आणला.

कित्येक मोठाले विद्यार्थी जर्मन सैन्याच्या आघाडीमागें राहून त्यांना सतावीत राहाणाऱ्या गनिमी सैनिकांस जाऊन मिळाले आणि प्रौढ सैनिकांच्या बरोबरीनें हाल-अपेष्टा सहन करून आणि पराक्रमाची शर्थ करून त्यांनीं लढाईत प्रत्यक्ष भाग घेतला. शत्रुव्याप्त प्रदेशांत जर्मन सैनिकांनीं केलेले घोर अत्याचार आतां सर्वांना माहीत

झाले आहेत. अनेक विद्यार्थी आणि लहानगीं मुलें या क्रूर अत्याचारांना बळी पडलीं. गनिमी बालवीरांच्या शौर्याच्या कथा कित्येकांच्या वाचनांत आल्या असतील. जिचें नांव आतां सर्वतोमुखीं झालें आहे ती वीरबालिका *झोया* दहाव्या इयत्तेंत शिकणारी तरुण मुलगी होती.

युद्ध सुरू होतांक्षणीं हजारों शिक्षक सैन्यांत दाखल झाले. १९४३ सालीं शिक्षकांची संख्या १९४१ च्या तुलनेनें शेंकडा चाळीस टक्के घटली. म्हणून पुढें पुढें होतां होईल तों शिक्षकांना सैन्यांत दाखल होऊं द्यावयाचें नाहीं असें धोरण ठेवण्यांत आलें. तरीहि शिक्षकाची वाण भासणें अपरिहार्य होतें. ही वाण भरून काढण्यासाठीं राहिलेल्या शिक्षकांपैकीं अनेकांनीं स्वयंस्फूर्तपणें ( युद्धप्रयत्नांतील आपला वांटा म्हणून ) दुवक्त शिकविण्याचें अंगावर घेतलें; आणि मोठाले वर्ग सांभाळण्याची जबाबदारी उचलली. तसेंच शाळेबाहेरच्या वेळांत शिक्षकांनीं औद्योगिक उत्पादन, शेतकाम, हवाई हल्लाप्रतिबंधक कार्य इत्यादि अनेक तऱ्हेचीं कामें केलीं. लेनिनग्राद शहरास सतत दोन अडीच वर्षें वेढा पडला होता; हवाई हल्ले व तोफखाना यांची सारखी धुमश्चक्री चालू असतांही शहरांतील शाळा अव्याहत चालू होत्या. सैन्यांत दाखल झालेल्या आणि गनिमी सैनिकांस मिळालेल्या शिक्षकांपैकीं अनेकांनीं असामान्य शौर्य गाजविलें, आणि कित्येकांना *“सोविएत देशाचे वीर”* ( *Heroes of the Soviet Union* ) म्हणून गौरविण्यांत आलें आहे.

युद्धकाळांत अनेक स्त्रियांनीं नव्यानें रोजगार पतकरला; तेव्हां शिशुगृहांची जरूरी नेहमींपेक्षां कितीतरी पटीनें वाढणें अपरिहार्य होतें. तशांत कित्येक शिक्षिकांनीं नर्स म्हणून शुश्रूषापथकांत नांवें नोंदविलीं. त्यामुळें शिशुगृहांत काम करणाऱ्या शिक्षिकांची मोठीच उणीव भासूं लागली. ती भरून काढण्यासाठीं अनुभवी शिक्षिकांनीं शाळांतील प्रौढ मुलींना आपल्या हाताखालीं काम करण्याकरितां शिक्षण देऊन तयार केलें. नर्स, शिक्षिका, वगैरे व्यवसायांत तरुण विद्यार्थिनींनीं मोठ्या संख्येनें नांवें दाखल केलीं.

अशा रीतीनें देशरक्षणाच्या कामीं तरुण पिढीनें आपला भाग उचलला.

महायुद्धांत सोविएत देशाची झालेली प्रचंड मनुष्यहानि ध्यानांत आणली कीं सोविएत सरकारपुढें निराश्रित पोरक्या मुलांचा प्रश्न केवढ्या मोठ्या स्वरूपांत उभा

राहिला असेल याची थोडीफार कल्पना करतां येईल. प्रत्यक्ष युद्ध, विमानहल्ले व वेढे, गांवेंच्या गांवें उध्वस्त झालेलीं, अशा परिस्थितींत अनेक मुलांचे आईबाप आणि जवळचीं नातेवाईक माणसें मृत्युमुखीं पडून तीं निराधार बनलीं यांत आश्चर्य नाहीं. कित्येकांची मातापित्यांपासून ताटातूट झाली; कारण जर्मनांनीं त्यांना गुलाम अथवा कैदी म्हणून नेलें होतें. लढाईच्या सुरवातीसच हा पोरक्या मुलांचा प्रश्न उपस्थित झाला, आणि जसजसा युद्धकाल लांबला तसतसें त्याचें गांभीर्य वाढूं लागलें. जर्मन सैन्य माघार घेऊं लागल्यावरहि, पोरक्या मुलांच्या संख्येंत सारखी भरच पडत गेली. कारण परततांना जर्मन सर्व प्रदेश उध्वस्त करीत आणि प्रौढ मनुष्यांना ठार करीत. शिवाय गनिमी सोविएत सैनिकांच्या आश्रयानें राहिलेल्या मुलांची आतां त्यांत भर पडली.

या पोरक्या मुलांचा प्रश्न सोविएत देशानें कसा सोडविला ?

जागोजागच्या जनतेनेंच पोरक्या मुलांची प्रथम दखल घेतली. सामुदायिक शेतें, उद्योगकेंद्रें व इतर संघटना यांनीं आपापल्या प्रदेशांतील, आपल्या केंद्रांतील जुन्या नोकरांच्या मृत्यूमुळें निराधार झालेल्या व इतर मुलांची काळजी घेण्यासाठीं वसतिगृहें, ( *Children's Homes* ) स्थापलीं. उद्योगकेंद्रांतील कुटुंबें एक अथवा अनेक मुलांच्या संगोपनाची जबाबदारी व देखरेख करण्याचें काम उचलीत. अद्यापहि अशा प्रकारें लोकांनीं आपण होऊन चालविलेलीं शेंकडों वसतिगृहें चालू असून त्यांमध्यें हजारों मुलें राहात आहेत व त्यांचें शिक्षण होत आहे.

लवकरच सरकारनेंहि निराश्रित मुलांची सोय लावण्यासाठीं योजना आंखली. त्यांनीं मुख्यतः दोन प्रकारच्या संस्था उघडल्या. पहिल्या प्रकारच्या संस्थांत तीन वर्षाखालील मुलांची सोय होते, आणि दुसऱ्या प्रकारच्या वसतिगृहांत तीन वर्षांपासून पंधरा सोळा वयापर्यंतच्या निराश्रित मुलांची व्यवस्था करण्यांत आली आहे. या मुलांच्या संगोपनाची, शिक्षणाची आणि त्यांची सर्वतोपरी काळजी वाहाण्याची जबाबदारी सरकारनें घेतली आहे. मृत आईबापांच्या ऐवजीं समाजवादी सरकार या निराश्रित मुलांचे आईबाप बनलें आहे. १९४४ सालच्या अखेरपर्यंत केवळ रशिया या एका राष्ट्रांत अशा प्रकारचीं एकूण ३४७५ वसतिगृहें सुरू होतीं आणि त्यांमध्यें ३, ६०, ४५९ मुलांची व्यवस्था करण्यांत आली होती. १९४३ सालीं

सोविएत सरकारनें याप्रीत्यर्थ ९० कोटि रूबल खर्च केले, आणि १९४४ सालीं हा खर्च १७० कोटि रूबल इतका वाढला.

या सरकारी वसतिगृहांना ठिकठिकाणची जनता अनेकप्रकारे मदत करते. बुटाचे कारखाने मोफत बूट पुरवितात, कापडाच्या गिरण्या कापड पुरवितात, सामुदायिक शेतें धान्य पाठवितात, वगैरे. कित्येक उद्योगकेंद्रें विवक्षित वसतिगृहांना "आपलीं" असें मानून त्यांच्या व्यवस्थेंत आपुलकीनें लक्ष घालतात.

याशिवाय पोरक्या मुलांसाठीं आणखीही योजना आहेत. ( १ ) कांहीं कुटुंबांनीं निराश्रित मुलांना दत्तक घेतलें आहे. ज्या मुलांचे आईबाप दोघेंही मृत्यु पावल्याची खात्रीलायक नोंद आहे अशींच मुलें दत्तक घेण्याची परवानगी दिली जाते. दत्तक मुलाच्या नव्या घरीं त्याची नीट व्यवस्था आहे किंवा कसें हें पाहाण्यासाठीं सरकार-कडून वर्षातून कमोंत कमी तीन वेळां तरी चौकशी होते. केवळ रशिया या एका राष्ट्रांत २०,००० हून अधिक पोरकीं मुलें दत्तक घेण्यांत आलीं आहेत. ( २ ) ज्यांचे आईबाप दोघेंही मृत्युमुखीं पडल्याची खात्रीलायक नोंद नाहीं अशा मुलांना कित्येक कुटुंबांनीं आपल्याजवळ ठेवून घेतलीं आहेत. या प्रकाराला 'पालक योजना' ( *Guardianship* ) असें नांव आहे. या मुलांचें चौदा वर्षांपर्यंत संगोपन व शिक्षण करण्याची जबाबदारी पालकांवर असते. या मुलांकडेहि सरकारचें सतत लक्ष असतें. रशियांत अशी ६९,००० हून अधिक मुलें 'पालक' योजनेखालीं नांदत आहेत. ( ३ ) 'पालकयोजनेचा' दुसरा प्रकार ( *Patronage* ) पुढीलप्रमाणें आहे. या मुलांना ठेवून घेणाऱ्या कुटुंबांना त्यांच्या पालनपोषणासाठीं म्हणून सरकारकडून पैशांची नियमित मदत मिळते; आणि त्यांवर सरकारची देखरेख असते. 'पालक' कुटुंबानीं या मुलांचें संगोपन व शिक्षण घरच्या मुलांप्रमाणें करावयाचें असतें. सुमारें १,४०,००० पोरक्या मुलांना या तिसऱ्या योजनेमुळें कौटुंबिक जीवनाचा लाभ झाला आहे.

जर्मन अंमलाखालून मुक्त केलेल्या प्रदेशांत जीं निराधार मुलें सांपडलीं त्यांचा प्रश्न विशेष गंभीर स्वरूपाचा होता. त्या सर्वांनीं भयंकर अत्याचार व हालअपेष्टा स्वतांच्या डोळ्यांनीं पाहिल्या होत्या व प्रत्यक्ष अनुभवल्या होत्या. त्यांच्या कोंवळ्या मनावर झालेले परिणाम शक्य तितक्या लवकर बुजवून टाकणें अतिशय जरूरीचें होतें व आहे. त्यासाठीं मुलांचीं खास वसतिगृहें ( *Special Childrens*

*Homes* ), विश्रांतिस्थानें ( *Rest Homes* ) आणि सॅनाटोरियम स्थापण्यांत आलीं आहेत. एकट्या रशिया या राष्ट्रांत अशा १२९ संस्था असून त्यांमध्यें १७,००० हून अधिक मुलें नांदत आहेत. वरील सर्व योजनांविषयीं येथें केवळ रशिया या एकाच राष्ट्राचे आंकडे दिले आहेत; परंतु यूक्रेन, श्वेतरशिया या पूर्वी जर्मनव्याप्त असलेल्या राष्ट्रांतहि निराश्रित मुलांसाठीं अशाच तऱ्हेच्या योजना अंमलांत आलेल्या आहेत. सर्व ठिकाणांहून स्थानिक जनतेचा सरकारी योजनांना सक्रिय पाठिंबा व सहकार्य मिळतें. उदाहरणार्थ यूक्रेनपासून हजारों मैलांवर असलेल्या मध्य-आशियांतील उज्बेक राष्ट्रानें शेंकडों यूक्रेनियन मुलांना आपल्या पालकत्वाखालीं ठेवून घेतलें. या सर्व योजनांना तरुण कम्युनिस्ट संघ या तरुणांच्या संस्थेचें विशेष साहाय्य लाभलें आहे. या संघानें निराश्रित मुलांना मदत करण्यासाठीं मोठा फंड जमविला असून संघातर्फे महिना १०० रूबलच्या ४५,००० हून अधिक शिष्यवृत्ती देण्यांत येत आहेत.

युद्धकालांत कांहीं नवीन शिक्षणसंस्था अस्तित्वांत आल्या व कांहीं जुन्या शिक्षणसंस्थांचा व्याप बराच वाढला. त्यापैकीं पुढील संस्था विशेष महत्त्वाच्या आहेत.

### १ नव्या धंदेशाळा ( *Special Trade Schools* )

लाल सेनेंतील सैनिकांचीं अथवा गनिमी सैनिकांचीं मुलें व जर्मनांनीं ठार मारलेल्या आईबापांचीं मुलें, यांच्यासाठीं या नव्या धंदेशाळा उघडण्यांत आल्या आहेत. येथें सर्वसाधारण दुय्यम शिक्षणानंतर एखाद्या विशिष्ट धंद्याचें शिक्षण देण्यांत येतें. येथें सोळा वर्षांपर्यंतचीं मुलें घेण्यांत आलीं असन त्यांचा सर्व खर्च सरकार सोसतें. कित्येक मुलांच्या शिक्षणांत बराच काळ खंड पडला होता. त्यांचे अभ्यास लवकर करून घेऊन त्यांना इतरांच्या बरोबर आणण्यांत येत असे. हें शिक्षण संपल्यावर लायकीप्रमाणें या मुलांची उच्च शिक्षणाची सोय करण्यांत येते.

### २ सुवोरोव लष्करी शाळा ( *Suvorov Military Schools* )

या नव्या शिक्षणसंस्था १९४३ सालापासून सुरू झाल्या आणि त्यामध्यें

सैनिकांचीं मुलें, निराश्रित मुलें अथवा ज्यांना पुढें लष्करी पेशा स्वीकारावयाचा आहे अशीं मुलें घेण्यांत येत असत. विद्यार्थ्यांचा सर्व खर्च सरकार सोसतें. युद्धकाळांत या शाळांचा अभ्यासक्रम सैनिकी थाटाचा असे. वयाच्या पंधराव्या वर्षापर्यंत सर्वसाधारण दुय्यम शिक्षण आणि लष्करी शिक्षणाची पूर्व तयारी करून घेतली जाई. ज्यांना पुढें दुसरा एखादा पेशा स्वीकारावयाचा असेल त्यांस पंधराव्या वर्षीं तसें करण्यास मुभा होती. सर्व कार्यक्रम व शिस्त लष्करी शाळेंतल्यासारखी होती. लष्करी शिक्षण, शारीरिक शिक्षण आणि तालीम ( *Gymnastics* ) यांवर विशेष भर होता. युद्ध संपल्यावर आतां या शाळांत दशवार्षिक शिक्षणावर अधिक भर असून सैनिकी शिक्षणाचें महत्त्व कमी करण्यांत आलें आहे.

## ३ संध्याकाळच्या शाळा (*Evening Schools*)

युद्धकाळांत अनेक विद्यार्थ्यांनीं आपलें दुय्यम शिक्षण पंधरा सोळाव्या वर्षीं सोडलें आणि युद्धकालीन धंदेशिक्षणाच्या योजनेंत सामील होऊन रोजगारास लवकर सुरवात केली. अशा तरुण मुलांसाठीं या संस्था उघडण्यांत आल्या. या शाळांत सर्वसाधारण बौद्धिक शिक्षण आणि विशिष्ट व्यवसायांतील अधिक उच्च दर्जाचें शिक्षण मिळण्याची व्यवस्था करण्यांत आली. एकट्या रशिया या राष्ट्रांतच १९४४ सालीं अशा प्रकारच्या एक हजाराहून अधिक शाळा होत्या व त्यांमध्यें दीड लक्षांहून अधिक तरूण शिकत होते; १९४५ सालीं सोविएत देशांत एकूण चार लक्ष विद्यार्थी त्याचा फायदा घेत होते. अशाच तऱ्हेच्या, परंतु उच्च शिक्षणाच्या संस्थांचा, लोकशाळांचा ( *People's Universities* ) उल्लेख मागें आला आहे. या शाळांतील प्रौढ विद्यार्थ्यांची संख्याहि युद्धकाळांत कितीतरी पटीनें वाढली.

## ४ पत्रव्यवहारानें शिक्षण ( *Correspondence Course Schools* )

पत्रव्यवहारानें उच्च बौद्धिक, अथवा दुय्यम आणि उच्च व्यावसायिक शिक्षण देण्याच्या सोयीचा उल्लेख मागें आला आहे. युद्धकाळांत अशा संस्थांची संख्या आणि त्याचा फायदा घेणाऱ्या प्रौढ विद्यार्थ्यांची संख्या या दोन्ही वाढल्या. १९४१ सालीं सोविएत देशांत अशा तऱ्हेच्या २९८ संस्था होत्या, तर १९४५ सालीं

त्यांची संख्या ३९६ पर्यंत वाढली. इन्स्टिटयूट ऑफ इंडस्ट्री या औद्योगिक संस्थेतर्फे चालविण्यांत येणाऱ्या, पत्रव्यवहारानें शिक्षण देणाऱ्या शिक्षणसंस्थेच्या सध्यां पांच शाखा सुरू असून तिच्यामार्फत निरनिराळ्या वीस अभ्यासक्रमांचें शिक्षण देण्यांत येतें; आणि सुमारें ३५०० विद्यार्थी या संस्थेकडून उच्च शिक्षण घेतात.

कॉलेजें व विश्वविद्यालयें या उच्च शिक्षणसंस्थांवरहि युद्धाचा मोठाच परिणाम झाला. युद्धव्याप्त प्रदेशांतून कॉलेजें हालविण्यांत येऊन तीं दूरवर आंतल्या भागांत नेण्यांत आलीं. अनेक विद्यार्थी सैन्यांत दाखल झाले; दुसऱ्या कित्येकांनीं आपला अभ्यासक्रम झटपट आटपून युद्धोपयोगी कारखान्यांत तज्ज्ञांचें काम पतकरलें. युद्ध-काळीं डॉक्टर, इंजिनियर इत्यादि पेशांच्या लोकांची फार मोठ्या प्रमाणांत जरूरी असल्यामुळें अभ्यासक्रमांच्या मुदती कमी करण्यांत आल्या. थोडक्या वेळांत अधिक शिक्षण घेऊन लौकरांत लौकर युद्धप्रयत्नाचा भार वाहातां यावा यासाठीं असें करणें भाग होतें. कित्येक अभ्यासक्रमांचें स्वरूप तें युद्धोपयोगी होईल अशा प्रकारें बदल-ण्यांत आलें. लष्करी शिक्षणावर अधिक भर देण्यांत येऊं लागला.

तरुणांची सैन्यांत अथवा युद्धप्रयत्नांत भरती झाली; अभ्यासक्रम लहान मुदतीचे झाले; नवीन विद्यार्थ्यांची संख्या कमी झाली; या सर्व कारणांमुळें उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या बरीच घटली. विशेषतः पुरुष विद्यार्थ्यांच्या बाबतींत ही संख्या फार कमी झाली. मॉस्को येथील कॉलेजांत विद्यार्थिनींचें प्रमाण विद्यार्थ्यांच्या चौपट झालें होतें. हीच परिस्थिति इंग्लंड वगैरे इतर युध्यमान राष्ट्रांतहि होती. पण पूर्वी मागासलेलीं असलेल्या मध्यआशियांतील राष्ट्रांत मात्र कॉलेजच्या विद्यार्थ्यांना सैन्यांत दाखल होण्यास मना करण्यांत येत असे.

कित्येक होतकरू तरुण शास्त्रज्ञ या युद्धांत मारले गेले; आणि जर्मनव्याप्त प्रदेशांत मागें राहिलेल्या अनेक वृद्ध शास्त्रज्ञांना जर्मनांनीं हालहाल करून ठार मारलें. नाझी आक्रमकांचा क्लब, प्रदर्शनें इत्यादि सांस्कृतिक विकासाच्या संस्थांवर आणि शिक्षण-संस्थांवर, विशेषतः कॉलेजें, विश्वविद्यालयें, संशोधन संस्था, ग्रंथालयें वगैरे उच्च शिक्षणसंस्थांवर, विशेष रोंख होता. या सर्व ज्ञानमंदिरांची त्यांनीं पद्धतशीर होळी केली. पण आघाडीमागें असलेल्या सोविएत शास्त्रज्ञांचें संशोधनकार्य अविरत चालू राहिलें आणि युद्धप्रयत्नांना साहाय्य करण्यासाठीं त्यांनीं आपला सर्व

काळ व शक्ति वेंचली. शत्रूच्या वेढयांत असलेल्या लेनिनग्राद विश्वविद्यालयातर्फे १९४२ सालीं सुद्धां ख–ज्योतिषविषयक वार्षिक ग्रंथ ( पंचांग ) प्रसिद्ध व्हावयाचा तो झालाच !

१९४३ सालीं युद्धाचें पारडें फिरल्यावर कॉलेजांतील अभ्यासक्रमांची मुदत पूर्ववत् करण्यांत आली; शत्रूच्या तावडींतील प्रदेश मुक्त होतांच कॉलेजें पुन्हां उघडलीं; आणि विद्यार्थ्यांची संख्या वाढूं लागली. पुढील आंकडे उच्च शिक्षण-संस्थांच्या संख्येंतील युद्धकालीन चढउतार दाखवितात.

उच्च शिक्षणसंस्थांची संख्या.

| साल | संख्या | साल | संख्या |
|---|---|---|---|
| १९४० | ७८२ | १९४३ | ५१५ |
| १९४१ | ५०३ | १९४४ | ७१७ |
| १९४२ | ४६० | १९४५ | ७७२ |

या वर्षी ( १९४६ सालीं ) कॉलेजांची संख्या ८०६ पर्यंत ( युद्धपूर्व संख्येहून अधिक ) वाढली आहे. १९४२ सालीं विद्यार्थ्यांची संख्या निम्म्यांहून अधिक घटली. १९४५ सालीं ती युद्धापूर्वीइतकी झाली, आणि या वर्षी ( १९४६ सालीं ) ती पूर्वीपेक्षां अधिक ६,५०,००० झाली आहे. कॉलेजांत प्रविष्ट होणाऱ्या नव्या विद्यार्थ्यांची संख्या या वर्षी १,९५,००० इतकी आहे व त्यांपैकीं ३०,००० विद्यार्थी लढाईवरून परतलेले सैनिक तरूण आहेत.

व्याप्त प्रदेशांत जर्मनांनीं शाळा व कॉलेजें यांचा सैन्याच्या कार्यालयांसाठीं व बराकीसाठीं उपयोग केला होता आणि माघार घेतांना इमारती, उपकरणें, पुस्तक-संग्रह, फारकाय खुर्च्या बाकेंसुद्धां, त्यांनीं नष्ट केलीं. सोविएत आघाडी पुढें सरकूं लागली आणि मुक्त प्रदेशांत नागरिक येऊन राहूं लागले, तसतसें पुनर्रचनेचें कार्य वेगानें सुरू झालें. कांहीं महिन्यांच्या आंत, कित्येक ठिकाणीं कांहीं दिवसांच्या

आंतच, शाळा पुन्हा सुरू झाल्या. धड असलेल्या इमारतींमधील सर्वांत चांगली इमारत प्रथम शाळेसाठीं राखून ठेवण्यांत येत असे. विद्यार्थी व शिक्षक यांनीं शाळेच्या इमारती दुरुस्त करण्याचें काम प्रथम हातीं घेतलें. नागरिकांनीं आपला फुरसतीचा सर्व वेळ या कामीं दिला. अशा रीतीनें शक्य तितक्या लवकर मुलांच्या शिक्षणाची सोय करण्यांत आली. हें सर्व किती झपाट्यानें करण्यांत आलें याची कल्पना पुढील उदाहरणांवरून येईल. १९४४ सालच्या पूर्वार्धांतील चढाईंत श्वेतरशियाचा बराच प्रदेश मुक्त झाला; आणि १९४४ सालच्या ऑगस्ट महिन्यापूर्वींच युद्धापूर्वीच्या १२,००० शाळांपैकीं १०,००० शाळा सुरू झाल्या. १९४३ सालीं शत्रूच्या तावडींतून सोडविण्यांत आलेल्या प्रदेशांत अवघ्या एका वर्षाच्या आंत ४५ लक्ष मुलांच्या शिक्षणाची सोय करण्यांत आली. क्रायमिया द्वीपकल्पाचें पुढील उदाहरण पाहा. या प्रदेशांतील १२६४ शाळांत १९४१ सालीं २ लक्षांवर मुलें शिकत होतीं. जर्मनांनीं यांपैकीं ५४२ शाळा साफ उध्वस्त केल्या आणि राहिलेल्यांची बरीच मोडतोड केली. क्रायमियाची राजधानी स्वतंत्र झाल्यापासून अवघ्या अकरा दिवसांच्या आंत ८०० हून अधिक शाळा सुरू झाल्या व ½ लक्ष विद्यार्थ्यांनीं नांवें नोंदविलीं. मुक्त होणाऱ्या प्रदेशांतील शैक्षणिक पुनर्रचनेच्या योजना आधींपासून तयार ठेवण्यांत येत, म्हणूनच इतक्या झपाट्यानें या गोष्टी होऊं शकल्या.

व्यावसायिक शिक्षणाच्या दुय्यम संस्था ( टेक्निकुम ) आणि उच्च शिक्षणसंस्था यांमध्यें दाखल होणाऱ्या विद्यार्थ्यांत शेंकडा १५ टक्के विद्यार्थी सैन्यांतून निवृत्त झालेले सैनिक आहेत. युद्धकाळांत त्यांच्या शिक्षणांत खंड पडला होता, आतां त्यांनीं आपल्या अभ्यासास पुन्हा सुरवात केली आहे. त्यांच्यासाठीं खास अभ्यासक्रम तयार करण्यांत आले आहेत. हेतु हा कीं, शक्यतों लवकर शिक्षण संपवून त्यांना आपापल्या व्यवसायांत पडतां यावें. युद्धकालीन अनुभव जमेस धरून वैद्यक, इंजिनियरिंग इत्यादि विषयांच्या अभ्यासक्रमांत कांहीं अंशीं फेरबदल करण्यांत आले आहेत.

## *नवी पंचवार्षिक योजना* (सन १९४६–५०)

महायुद्ध १९४५ सालीं संपलें. त्यानंतर अवघ्या एक वर्षाच्या अवधींत सोविएत देशानें युद्धोत्तर काळांतील प्रगतीची पहिली पंचवार्षिक योजना (सन १९४६ ते ५० )

योजून तिच्या अंमलबजावणीस आरंभ केला आहे. या योजनेच्या शैक्षणिक कार्यक्रमांतील कांहीं गोष्टींची कल्पना पुढें दिली आहे. त्यावरून पुढील प्रगतीची दिशा ध्यानीं येईल.

या पांच वर्षांच्या आंत प्राथमिक व दुय्यम शाळांची संख्या युद्धापूर्वीच्या संख्येइतकी होऊन त्यामध्यें थोडीशी भर पडेल. सप्तवार्षिक सक्तीचें शिक्षण खेडोपाडींसुद्धां सर्वत्र अंमलांत येईल. या कार्यक्रमाच्या यशस्वितेसाठीं प्राथमिक व दुय्यम शिक्षकांची फार मोठ्या प्रमाणांत जरूरी आहे. म्हणून अध्यापनसंस्थाहि वाढविण्यांत येत आहेत. तसेंच शिशुगृहें, बालोद्यान शाळा यांच्या संख्येंतहि वाढ होणार आहे. १९४६ सालच्या अंदाजपत्रकांत शिक्षणखात्यावर एकूण खर्चाच्या शेंकडा १६ टक्के खर्च होणार आहे.

फॅक्टरी, रेल्वे आणि धंदेशाळा यांत शिकून प्रतिवर्षीं बाहेर पडणाऱ्या विद्यार्थ्यांत १२ लक्षांपर्यंत वाढ होणार आहे आणि शाळांची संख्या २७०० वरून ६००० वर जाणार आहे. या पांच वर्षांच्या अवधींत २३ लक्ष यंत्रकुशल कामगार व शेतकरी तयार होतील. तसेंच १ कोटि ३९ लक्ष कामगार शेतकऱ्यांना त्यांच्या कामाचें अधिक यांत्रिक शिक्षण मिळणार असून ७७ लक्ष कामगार शेतकऱ्यांना किमान यांत्रिक शिक्षण मिळणार आहे. शेती आणि उद्योगधंदे यांमधील कामांत अधिकाधिक यंत्रें वापरलीं जावींत आणि मानवी श्रम हलके व्हावेत हें उद्दिष्ट या योजनेंत स्पष्टपणें मांडण्यांत आलें आहे. युद्धकाळांत उघडलेल्या धंदेशिक्षणाच्या शाळांतहि धंदे-शिक्षणाचे विद्यार्थी घेण्यांत येत आहेत. त्यांमधून पुढील पांच वर्षांत ४५ लक्ष यंत्रकुशल कामगार तयार होणार आहेत.

दुय्यम व्यावसायिक शिक्षण आणि यांत्रिक शिक्षण यांच्या संस्थांत ( टेक्निकुम ) वाढ होत आहे. सध्यां एकूण ३३२८ टेक्निकुम आहेत. ( त्यांपैकीं ३०० या वर्षीं उघडलेल्या आहेत. ) आणि त्यांमध्यें १०, २७,००० विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. या वर्षी या संस्थांत ३,८०,००० नवीन विद्यार्थ्यांस प्रवेश मिळाला. पुढील पांच वर्षांत १३ लक्षांहून अधिक दुय्यम दर्जाचे तज्ज्ञ तयार व्हावयाचे आहेत.

उच्च शिक्षणसंस्था व विद्यार्थी यांचे या वर्षाचे आंकडे मागें दिलेच आहेत. तांत्रिक शिक्षणाच्या कॉलेजांत गेल्या दोन वर्षांत वाढ झाली असून ती तशीच चालू

राहाणार आहे. १९५० सालीं कॉलेजांतील विद्यार्थ्यांची संख्या ६,७४,००० पर्यंत जावयाची आहे. या वर्षाचा आंकडा ( ६,५०,००० ) ध्यानांत घेतल्यास पुढील पांच वर्षांत ही संख्या वरील ठरविलेल्या मर्यादेच्या पलीकडे सहज जाईल. ( बहुधा ७ लक्षापर्यंत जावी. ) या पांच वर्षांत एकूण ६ लक्ष तरूण उच्च प्रतीचे तज्ज्ञ व्हावेत असा अंदाज आहे. आणि १९५० सालानंतर उच्चशिक्षण घेऊन दरवर्षी १॥ लक्षांहून अधिक तरूण व्यवसायांत पडावेत अशी अपेक्षा आहे.

याच बरोबरीनें सांस्कृतिक विकासाच्या इतर साधनांतहि वाढ व्हावयाची आहे. १९४० सालीं २८,००० सिनेमागृहें होतीं; १९५० मध्यें ४६,७०० होणार आहेत. यांपैकीं कांहीं सिनेमांत घनदर्शी ( *Three Dimensional* ), दृश्य वस्तूंची लांबी, रुंदी व जाडी दाखविणारे, चित्रपट दाखविण्याची सोय करण्यांत येणार आहे. १५० हून अधिक नवीन अद्यावत् नाटयगृहें बांधण्यांत येणार असून त्यांपैकीं ४५ नाट्यगृहें लहान मुलांसाटीं तयार व्हावयाचीं आहेत. तसेंच क्लब आणि ग्रंथालयें यांची संख्या २,८४,००० ( १९३९ च्या दुप्पटीहून अधिक ) इतकी वाढावयाची आहे.

युद्धपूर्व कालांत योजलेल्या पंचवार्षिक योजनांचें फळ ध्यानांत घेतां युद्धकाळांत पडलेला खंड भरून काढून १९५० सालीं सोविएत शिक्षणसंस्था प्रगतीच्या मार्गावरील पुढील पाऊल टाकतील असें म्हणावयास हरकत नाहीं.

परिशिष्ट १

# पॉलिटेक्निकल शिक्षण

सोविएत रशियांत १९२९ सालापासून जी शिक्षणयोजना सुरू झाली तिच्यामध्यें पॉलिटेक्निकल शिक्षणाचा समावेश प्रामुख्यानें करण्यांत आला होता.

पॉलिटेक्निकल शिक्षणाची कल्पना फार जुनी आहे व अनेक विचारवंतांनीं अशा प्रकारच्या शिक्षणावर पूर्वीं भर दिलेला आहे. तसेंच आधुनिक शिक्षणशास्त्रांतील "कृतींमधून शिक्षण" (*Learning through Activity*) या मूलभूत तत्त्वाचा त्याला खंबीर आधार आहे. शिक्षण कसें असावें याविषयीं लिहितांना मार्क्स म्हणतो: "शिक्षणामध्यें तीन गोष्टींचा समावेश झाला पाहिजे. [ १ ] बौद्धिक शिक्षण [ २ ] शारीरिक शिक्षण आणि [ ३ ] *पॉलिटेक्निकल शिक्षण*; म्हणजे उत्पादनामागील सर्वसामान्य तत्त्वांचें ज्ञान असणें आणि औद्योगिक व्यवसायांत वापरलीं जाणारीं साधीं हत्यारें हाताळतां येणें." मार्क्सपूर्वी व नंतर आजतागायत अशासारखे अथवा हेच विचार अनेक समाजवादी व इतर विचारवंतांनीं प्रकट केले आहेत. या तत्त्वांवर आधारलेल्या कांहीं शाळाही जर्मनी व इतर देशांत चालविण्यांत आल्या होत्या.

सोविएत शिक्षणतज्ज्ञांच्या मतें पॉलिटेक्निकल शिक्षणांत कशाचा अंतर्भाव होतो? संपत्तीच्या उत्पादनाच्या मुळांशीं असलेलीं शास्त्रीय तत्त्वें, उत्पादनाच्या

वेगवेगळ्या तऱ्हा व त्यांचे परस्पर संबंध आणि त्यामुळें वैयक्तिक व सामाजिक जीवनावर होणारा परिणाम, देशांतील प्रचलित अर्थव्यवस्था आणि प्रत्येक उद्योग-धंद्याचें तिच्यामधील स्थान, या सर्वांची माहिती देणें हा या शिक्षणाचा एक भाग होता. याबरोबरच सामान्य हत्यारें वापरण्याची संवय होऊन आणि कारखाने, सामुदायिक शेतें इत्यादि उद्योगकेंद्रांना प्रत्यक्ष भेटी देऊन उत्पादनाला लागणाऱ्या मानवी श्रमांचें प्रात्यक्षिक व स्वानुभवानें ज्ञान होणें व त्यांचें महत्त्व समजणें, हा या शिक्षणाचा दुसरा महत्त्वाचा भाग होता.

पॉलिटेक्निकल शिक्षण देण्याचा उद्देश विद्यार्थ्याला विशिष्ट धंद्यांत वाकबगार करावें असा नसून तो सर्वसाधारण सप्तवार्षिक शिक्षणाचाच भाग होता ही गोष्ट येथें प्रथम स्पष्ट केली पाहिजे. यामधील पहिल्या भागाचें शिक्षण वर्गांत शिकविलें जात असे. विद्युत्, रासायनिक, लोखंड, पोलाद इत्यादि मोठे कारखाने; आगगाड्या, जहाज-बांधणी, इत्यादि वाहातुकींचे उद्योग; आणि सामुदायिक शेती; या प्रमुख उद्योगधंद्यांचें ज्ञान व प्रत्यक्ष माहिती करून देण्यांत येत असे. दुसऱ्या भागाच्या शिक्षणासाठीं शाळेला जोडून वर्कशॉप चालविलेलें असे. प्रत्येक शाळा कोठल्या ना कोठल्या तरी कार-खान्याशीं अगर दुसऱ्या एखाद्या उत्पादनकेंद्राशीं संलग्न असल्यामुळें तिला असें वर्कशॉप सुसज्जित करणें सुलभ असतें. तसेंच या कारखान्यांतील प्रत्यक्ष उत्पादन पद्धति पाहून प्रसंगीं त्यांत भाग घेण्याची व्यवस्था होती. शिवाय शाळा असलेल्या टापूं-तील सर्व उत्पादन केंद्रांना भेटी देण्यासाठीं मुलांना नेण्याची सोय केली जाते व त्यांमधील निरनिराळ्या विभागांचें मुख्य कार्य स्पष्ट केलें जातें. प्रत्यक्ष वर्कशॉपम-धील शिक्षणाचा वेळ एकंदर वेळापत्रकाच्या शेंकडा १० ते १६ टक्क्याहून अधिक नव्हता. वर्कशॉपमध्यें मुलांनीं तयार केलेल्या वस्तु विकून त्यापासून शिक्षणाचा खर्च कांहीं अंशीं तरी भागावा अशी बिलकूल अपेक्षा नव्हती. कारखान्यांत अथवा शेतावर प्रात्यक्षिकासाठीं जाणाऱ्या विद्यार्थ्यांना नेहमींच्या कामगारांप्रमाणें राबवितां कामा नये अशी सक्त ताकीद होती व आहे.

या शिक्षणानें सोविएत शिक्षणतज्ज्ञांना काय साधावयाचें होतें ?

समाजाचें जीवन आणि त्याचा पाया जे मानवी श्रम, त्यांचा शिक्षणाशीं निकटचा संबंध यावा आणि बौद्धिक व शारीरिक श्रमांमधील उच्चनीचतेची कल्पना समूळ

नाहींशी व्हावी हाच या शिक्षणाचा मुख्य उद्देश आहे. एखाद्या विशिष्ट धंद्यांत कौशल्य अथवा निदान त्याची प्राथमिक तयारी करून देणें, हा या शिक्षणाचा मुळींच हेतु नाहीं. धंदा अथवा व्यवसाय निवडणें ही गोष्ट सप्तवार्षिक शिक्षण संपल्यावरच होते. विद्यार्थी पुढें कोणताही व्यवसाय निवडोत, त्यांना तो व्यवसाय अधिक परिणामकारक रीतीनें करतां यावा याकरितां आधीं एकंदर समाजजीवनाच्या पायाविषयीं नीट ज्ञान असलें पाहिजे. प्रत्यक्ष आयुष्यांत पाऊल टाकण्यापूर्वी आवश्यक असलेली सर्वसाधारण पूर्वतयारी करून देणें हें सप्तवार्षिक शिक्षणाचें कार्य आहे; आणि त्यासाठीं बौद्धिक शिक्षणाला पॉलिटेक्निकल शिक्षणाची जोड दिली आहे. पॉलिटेक्निकल शिक्षण म्हणजे जसें धंदेशिक्षण नव्हे, तसेंच आपल्याकडील शाळांत चालू असलेल्या सुतारकाम, बागकाम इत्यादि हस्तव्यवसायांशींही त्याचें साम्य नाहीं. आपल्याकडील हस्तव्यवसायांचा बौद्धिक शिक्षणाशीं कांहींच संबंध नसतो. पण सोविएत शाळांत बौद्धिक विषय शिकवितांना प्रत्यक्ष आयुष्यांतील अनुभवांशीं आणि भोंवतालच्या प्रदेशांतील जीवनाशीं त्यांचा पदोपदीं संबंध जोडला जातो. तसेंच पॉलिटेक्निकल शिक्षण देतांना बौद्धिक विषयांकडे लक्ष वेधण्यांत येतें. अशा रीतीनें सर्वांगीण शिक्षणाचें ध्येय साधण्यांत येतें.

अशा प्रकारच्या शिक्षणाची आवश्यकता आपल्याला सहज पटते. कारण बहुसंख्य समाजाचें जीवन व सुशिक्षित वर्ग यांमध्यें किती अफाट अंतर निर्माण होतें याची कल्पना हिंदुस्थानांत सर्वांस अनुभवानें आलेली आहे. ज्या श्रमजीवि जनतेच्या–शेतकरी व कामकरी यांच्या–श्रमांवर सर्व समाजाची मुख्यतः उभारणी होते, त्यांच्या सामान्य जीवनापासून शिक्षणाची पुरी फारकत झाल्यामुळें असें अंतर निर्माण झालें आहे. सोव्हिएत समाजांत शिक्षणाचा उद्देश समाजापासून तुटलेला ( आणि त्याला भारभूत होणारा ) सुशिक्षित वर्ग निर्माण करणें असा नसून सामाजिक जीवनाचा आपल्यावर पडणारा भार जाणतेपणानें उचलणारा बुद्धिमान् नागरीक तयार करणें हा आहे. पांढरपेशा बुद्धिजीवि वर्ग व श्रमजीवि जनता यांमधील भेद नाहींसा होऊन सर्व श्रमजीवि समाजच उत्तरोत्तर सुसंस्कृत व्हावा हें त्या समाजाचें ध्येय आहे. अर्थातच या समाजांत रिकामटेकड्या, ऐतखाऊ, सुसंस्कृत वर्गाला स्थान नाहीं. सामाजिक जीवनाच्या ‘ धकाधकीपासून अलिप्त ’ राहून, कोणतेही श्रम न करतां, केवळ कलाविलासांत अथवा सौंदर्याराधनेंत दंग होऊन राहाणाऱ्या किंवा तत्त्वज्ञानांत गुंग

होऊन राहाणाऱ्या 'सुशिक्षित' व 'सुसंस्कृत' वर्गाला तेथें जागा नाहीं. सर्व प्रकारच्या शिक्षणाचे, मग तें बौद्धिक असो, शास्त्रीय असो, वा कलाविषयक असो, पाय बहुसंख्य जनतेच्या जीवनाच्या भूमीवरच खंबीरपणें उभे असले पाहिजेत असा त्या समाजाचा कटाक्ष आहे. आणि म्हणून उत्तम चित्रकार असो, कलावंत लेखक असो, वा अभिनयकुशल सिनेमातारका असो, सर्वांना सुरवातीच्या सप्तवार्षिक शिक्षणांत पुढील जीवनाची ही अशी पूर्वतयारी करून दिली जाते.

१९३७ मध्यें या शिक्षणांतील वर्कशॉपमधील कामाचा भाग काढून टाकण्यांत आला असला तरी त्यामुळें या मूलभूत शिक्षणविषयक दृष्टिकोनांत बिलकूल फरक झालेला नाहीं.

हा हस्तव्यवसायासंबंधींचा भाग कां वगळण्यांत आला? देशाची औद्योगिक प्रगति खूप झपाट्यानें झाली होती. यामुळें साधीं हत्यारें वापरण्याची संवय करणें कांहींसें अनावश्यक झालें. उलट, शास्त्रीय ज्ञान अधिक उच्च दर्जाचें असण्याची आवश्यकता वाढत होती. कारण शारीरिक श्रमांची जागा अधिकाधिक प्रमाणावर यंत्रांनीं घेतली होती; आणि हीं यंत्रें वापरण्यासाठीं निवळ शारीरिक श्रमापेक्षां शास्त्रीय ज्ञानाची अधिक गरज होती. तरीसुद्धां ज्या विद्यार्थ्यांस हस्तव्यवसाय व यंत्रव्यवसाय यांची विशेष आवड असेल त्यांच्यासाठीं वर्कशॉप सुसज्ज असे; आणि अधिकाधिक मुलांनीं त्याचा फायदा करून घ्यावा असा प्रयत्न शिक्षकांनीं करावा अशी अपेक्षा होती. देशाच्या वाढत्या विकासाला अनुरूप असाच हा फेरबदल होता.

## पॉलिटेक्निकल शिक्षण आणि वर्धा योजना

जातां जातां सोविएत पॉलिटेक्निकल शिक्षण आणि वर्धा शिक्षण योजना यांचा तुलनात्मक विचार करणें अस्थानीं ठरणार नाहीं. * वर्धा शिक्षण योजनेंत सोविएत शिक्षणांतील उणीवा काढून टाकलेल्या आहेत व त्यामुळें ती हिंदुस्थानला अधिक उपयुक्त ठरेल अशा प्रकारचे उद्गार नेहमीं कानावर पडतात. त्यांमध्यें कितीसें तथ्य आहे?

आधार *—( 1 ) *Basic National Education–Dr. Zakir Hussein.*
( 2 ) *The Latest Fad–Acharya Kirpalani*

म. गांधींनीं या योजनेची मूळ कल्पना पुढें मांडल्यापासून *डॉ. झकीर हुसेन* (दिल्ली येथील *जमिया मिलिया* विद्यालयाचे विद्वान् प्रिन्सिपॉल) यांच्या समितीनें तिला मूर्त स्वरूप देईपर्यंत तिच्यांत बराच बदल झाला. सुप्रसिद्ध *सार्जंट योजनेंतील* सक्तीचा प्राथमिक शिक्षणक्रम कांहींसा वर्धा योजनेवर आधारलेला आहे.

प्राथमिक सात वर्षांचें शिक्षण सक्तीचें व मोफत असावें; तें मातृभाषेंत देण्यांत यावें; हिंदी अथवा उर्दू ही राष्ट्रभाषा म्हणून शिकविण्यांत यावी; इत्यादि वर्धा योजनेंतील सूचना इतर कोणत्याही बहुभाषी देशांतील सार्वत्रिक शिक्षणाच्या योजनेसारख्याच आहेत. तेव्हां त्यांमध्यें वर्धा योजनेचें वैशिष्ट्य नाहीं हें उघड आहे. इतर गोष्टींचा विचार करतां वर्धा योजनेंत *मुख्य उणीव* ही दिसते कीं त्या योजनेंत खेडेगांवांतील प्राथमिक शिक्षणाशिवाय इतर शिक्षणक्रमांचा विचार केलेला नाहीं. हिंदुस्थानच्या भावी शिक्षणपद्धतीचें व शिक्षणक्रमांचें संपूर्ण चित्र या योजनेंत दिसत नाहीं. यामुळें हिंदुस्थानची शैक्षणिक व सांस्कृतिक प्रगति कोणत्या दिशेनें होत जाईल याबद्दल या योजनेवरून नक्की निष्कर्ष काढतां येणें अशक्य आहे. यामुळें एक मोठा धोकाहि संभवतो. पण त्याचा विचार करण्यापूर्वी वर्धा योजनेंतील इतर महत्त्वाच्या विशेषांचा विचार करूं.

ज्या दोन मुख्य तत्त्वांवर वर्धा योजना उभारण्यांत आली तीं पुढीलप्रमाणें: [ १ ] प्रत्येक मुलाला देण्यांत येणारें सक्तीचें प्राथमिक शिक्षण एखाद्या ग्रामीण व्यवसायाभोवतीं (उदाहरणार्थ शेतकी, सूत काढणें, कापड विणणें, लाकूडकाम, कागद बनविणें इत्यादि) गुंफण्यांत यावें व प्राथमिक शिक्षणाच्या शेवटीं विद्यार्थी त्या व्यवसायांत वाकबगार व्हावा. [ २ ] शाळेंत तयार झालेल्या वस्तु विकून जें उत्पन्न होईल त्यामधून शाळेचा दैनंदिन खर्च (शिक्षकाचें वेतन) निघावा; व अशा प्रकारें शिक्षण स्वावलंबी व्हावें. सार्जंट योजनेंत या दुसऱ्या मुद्यावर मुळींच भर दिलेला नाहीं आणि डॉ. झकीर हुसेनही तो आवश्यक धरीत नाहींत. आचार्य कृपालानी यांचा मात्र तसा आग्रह आहे! या दुसऱ्या तत्त्वाविषयीं सोविएत दृष्टिकोन किती भिन्न आहे हें आपण वर पाहिलेंच आहे.

पहिल्या तत्त्वाविषयींही सोविएत योजना अगदीं निराळी आहे. सोविएतमधील सक्तीचें सप्तवार्षिक शिक्षण हें धंदेशिक्षण नसून सर्वसाधारण बौद्धिक व सांस्कृतिक शिक्षण आहे. सोविएत मुलें १५ व्या वर्षी विशिष्ट धंदा अगर व्यवसाय आवडी-

प्रमाणें व लायकीप्रमाणें निवडतात. उलट वर्धा योजनेंत सातव्या वर्षापासून व्यवसाय शिकविला जातो. अर्थात् आवडीचा प्रश्नच उद्भवत नाहीं ! तसेंच सर्व शिक्षण एका विशिष्ट व्यवसायाभोंवतीं गुंफावयाचें असल्यामुळें बौद्धिक शिक्षणाचा दर्जा कमी झाल्यावांचून राहाणार नाहीं. दररोजच्या सव्वा पांच तासांच्या वेळापत्रकांत व्यवसायशिक्षणाला सव्वा तीन तास असून इतर विषयांना फक्त दोनच तास आहेत; ही गोष्टही हेंच दर्शविते. तसेंच हें सव्वा तीन तासाचें व्यवसायशिक्षण अगदीं अल्प-वयांत ( सातव्या वर्षी ) सुरू होणार आहे. वर्धा योजनेचा हेतु एका विशिष्ट व्यव-सायाचें शिक्षण देऊन त्याच्या अनुषंगानें इतर शिक्षण द्यावें असा आहे. तर सोविएत शिक्षणाचा हेतु सर्वसाधारण बौद्धिक शिक्षण देऊन पुढील नागरिक जीवनाची पूर्वतयारी करून देण्याचा आहे. सार्जेंट योजनेंत ११ व्या वर्षापासून व्यवसायशिक्षण देण्यांत येणार आहे. अर्थातच वरील टीका सार्जेंट योजनेलाही कांहीं प्रमाणांत लागू पडते.

वर्धा योजनेंत शिक्षण स्वावलंबी व्हावें, शिक्षणाचा खर्च विद्यार्थ्यांनीं केलेल्या व्यवसायापासून भरून निघावा, यावर भर दिला आहे याचें एक मुख्य कारण सध्यांच्या राजवटींत शिक्षणाची अक्षम्य हेळसांड होते हेंच असलें पाहिजे. राजकीय पारतंत्र्यांत असलेल्या हिंदी जनतेला सार्वत्रिक शिक्षणासाठीं पैशांचा अभाव विशेष जाणवतो. स्वातंत्र्यसंपादनानंतरसुद्धां हा प्रश्न सहज सुटेल असें म्हणतां येणार नाहीं. परंतु भावी पिढीच्या शिक्षणाकरतां लागणारा पैसा उभारण्यासाठीं लहान मुलांना राबवावें असें कोणीही म्हणणार नाहीं; तो पैसा सध्यांच्या पिढीनें, अवश्य झाल्यास आपलें पोट बांधूनही, दिला पाहिजे; हें कोणालाही मान्य व्हावें. सार्जेंट योजनेच्या स्वरूपांत वर्धायोजना बरीच बदलली आहे; आणि वर उल्लेखिलेल्या दोन तत्त्वांना खूप मुरड घातल्यास, हिंदुस्थानचें मोठ्या प्रमाणावर औद्योगीकरण होईपर्यंतच्या काळांत ती योजना उपयुक्त ठरणें शक्य आहे.

परंतु प्रथमच उल्लेख केल्याप्रमाणें वर्धा योजनेंत सार्वत्रिक शिक्षणाच्या देशव्यापी योजनेचें चित्र नसल्यामुळें प्रत्यक्ष अंमलांत आल्यावर वर्धा योजना अत्यंत प्रतिगामी ठरण्याचा संभव आहे. डॉ. झकीर हुसेन यांनीं लिहिलेल्या प्रतिवृत्तांत, वर्धा योजनेचा औद्योगीकरणाला तत्त्वतः विरोध नाहीं, असें नमूद केलें आहे हें खरें. परंतु प्राध्यापक कुमारअप्पा, आचार्य कृपालानी, श्री. बाळासाहेब

खेर यांसारखे या योजनेचे पुरस्कर्ते वेळोवेळीं जे उद्गार काढतात त्यावरून मात्र वर्धा योजना प्रत्यक्ष व्यवहारांत औद्योगिक सुधारणेला विरोधी ठरण्याचा संभव आहे असें वाटल्यांवाचून राहात नाहीं. *

यांत्रिक प्रगतीमुळें बेकारी वाढणें अपरिहार्य आहे, कामाचे तास कमी झाल्यास कामगार व शेतकरी यांना फुरसतीचा अधिक वेळ मिळेल आणि तो वेळ ते दुराचरणांत घालवतील अशा प्रकारचीं अशास्त्रीय आणि बहुजनसमाजाला उपमर्दकारक विधानें ते सर्रासपणें करतात. आचार्य कृपालानी यांनीं १९३९ सालीं लिहिलेल्या पुस्तकांत मर्यादित यंत्रीकरणाला आपला विरोध नाहीं असें म्हटलें असलें, तरी १९४५ सालच्या ऑगस्ट महिन्यांत अलाहाबाद येथील भाषणांत कामाचे तास कमी करण्याविषयीं त्यांनीं असेंच विधान केलें ! शास्त्रीय ज्ञानाच्या जोरावर निसर्गावर अधिकाधिक प्रभुत्व मिळवावें, केवळ जीवनकलहार्थ खर्च होणारा वेळ कमी करावा, यामुळें वाढणारा फुरसतीचा वेळ सुसंस्कृतपणें घालवून मानसिक विकास साधावा, आणि अशा रीतीनें जीवन उत्तरोत्तर खऱ्या अर्थानें समृद्ध करावें, या हेतूनें मानवाचे प्रयत्न अविरत चालू आहेत. उत्तम रीतीनें उपजीविका करण्यासाठीं प्रत्येकाला आपल्या आवडी-प्रमाणें व समाजाच्या परिस्थितीप्रमाणें एखादा व्यवसाय करतां यावा आणि फुरसतीच्या वेळांत सांस्कृतिक विकास साधतां यावा असा शिक्षणाचा दुहेरी हेतु असला पाहिजे. असें असूनही वर्धा योजनेचे जबाबदार पुरस्कर्ते वरील विधानें करतांना आढळून येतात. तेव्हां ही योजना मूलतः जरी औद्योगीकरणाला विरोधी नसली तरी प्रत्यक्षांत उतरतांना मात्र ती तशी ठरण्याचा धोका आहे.

* प्रा. कुमारअप्पा आणि श्री. खेर यांनीं, १९४५ सालीं, पुणें येथें दिलेल्या व्याख्यानांचा उल्लेख येथें केला आहे.

परिशिष्ट २

# फी योजना

सर्व शिक्षण मोफत मिळालें पाहिजे असें धोरण सोविएत सत्तेच्या अगदीं आरंभापासून सोविएत देशांत ठेवण्यांत आलें होतें. १९४० सालीं फी योजना जाहीर झाली तेव्हां साहाजिकच अनेक शिक्षणप्रेमी लोकांस आश्चर्याचा धक्का बसला. या अनपेक्षित फेरफाराचा थोड्या अधिक विस्तारानें विचार करणें आवश्यक आहे.

सोविएत यूनियनमध्यें आठ वर्षांपासून पंधरा वर्षांपर्यंतचा सात वर्षांचा ( प्राथमिक व दुय्यम ) शिक्षणक्रम सक्तीचा व मोफत आहे. यानंतर मुलें लागलीच धंदेशिक्षणाच्या संस्थांत प्रवेश करतात अगर वरिष्ठ दर्जाचें दुय्यम शिक्षण घेऊन विश्वविद्यालयीन शिक्षणाकडे वळतात अगर दुय्यम दर्जाच्या व्यावसायिक शिक्षणाकडे वळतात. १९४० सालीं सुरू झालेल्या फी योजनेप्रमाणें पुढील शिक्षणक्रमांसाठीं फी घेणें सुरू झालें.

१ वरिष्ठ दुय्यम शिक्षण ( वय १५ ते १८ ) वार्षिक फी १५० ते २०० रूबल.

२ टेक्निकुममधील दुय्यम शिक्षण (वय १५ पासून पुढें) वार्षिक फी १५० ते २०० रूबल.

३ विश्वविद्यालयीन व कॉलेजांतील उच्च शिक्षण ( वय १८ पासून पुढें ) वार्षिक फी ३०० ते ४०० रुबल.

४ संगीत, चित्रकला, इत्यादि कलांचें उच्च शिक्षण ( वय १८ पासून पुढें ) वार्षिक फी ५०० रूबल.

प्राथमिक व दुय्यम शिक्षणानंतरचे कोणते शिक्षणक्रम अद्यापही मोफत आहेत ? सक्तीच्या सात वर्षांच्या शिक्षणानंतर ज्या विद्यार्थ्यांना ताबडतोब औद्योगिक, शेतकी-विषयक अथवा धंदेशिक्षणाच्या शाळांत जावयाचें असेल त्यांचा २ ते २½ वर्षांचा अभ्यासक्रम मोफत आहे. तसेंच कामगार शाळा व कामगारांच्या उच्च शिक्षणसंस्था, शेतकऱ्यांच्या अथवा इतर धंद्यांतील लोकांच्या याच प्रकारच्या संस्था, यांमध्येंही फी घेण्यांत येत नाहीं. अर्थात् फी द्यावी लागणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या एकंदरींत बरीच कमी आहे. त्यांतहि कोणत्याही देशांत उच्च शिक्षण घेणारे विद्यार्थी इतर विद्यार्थ्यांच्या मानानें थोडे असतात हें लक्षांत घेतल्यास फी लागू असणाऱ्या विद्यार्थ्यांमधील बरेचसे विद्यार्थी वार्षिक १५० ते २०० रूबल फी देणारे असले पाहिजेत हें उघड आहे.

या नवीन फरकामुळें पुढील प्रश्न उद्भवतात. सर्वांना लायकीप्रमाणें शिक्षण घेण्याची संधि मिळावी या मूलभूत धोरणाला यामुळें बाध येत नाहीं काय ? केवळ फी देण्याची ऐपत असल्यामुळें संपन्न आईबापांच्या बुद्धिमंद मुलांना उच्च शिक्षणाचा फायदा घेतां येऊन गरीब व हुशार मुलांचा कोंडमारा होणार नाहीं का ? आणि असें जर घडणार असेल तर श्रीमंत पालकांच्या मुलांनीं पांढरपेशे व बुद्धिजीवि व्यवसाय करावे व गरीब मुलांना तशी संधि मिळणें अशक्य व्हावें अशी परिस्थिति निर्माण होणार नाहीं काय ?

गरीब मुलांच्या मार्गांत फीयोजनेमुळें अडथळा येत नाहीं. ⅔ विषयांत "अत्युत्तम" आणि इतर विषयांत "उत्तम" असे गुण मिळविणाऱ्या मुलांना फी माफ होते व शिष्यवृत्तीही देण्यांत येते; मग तीं गरीब असोत वा श्रीमंत असोत. पालकांचें उत्पन्न कमी असल्यामुळें फी देणें परवडणार नाहीं अशा मुलांना व

निराश्रित मुलांना फी माफ असते. त्यांना "उत्तम" गुण मिळविण्याची वरील अट लागू नसते; मात्र त्यांची प्रगति समाधानकारक असावी लागते आणि त्यांनीं वार्षिक परीक्षा पास होणें आवश्यक असतें. पण ही अट ( समाधानकारक प्रगति व परीक्षा पास होणें ) सर्वांनाच, श्रीमंत मुलांना सुद्धां, पाळावी लागते. तेव्हां ज्यांना फी देणें शक्य आहे अशाच पालकांच्या मुलांना, त्यांची प्रगति उत्तम नसून केवळ समाधानकारक असल्यास, फी द्यावी लागते. तसेंच कामगार संघ, सामुदायिक शेतें, आणि अन्य उद्योगकेंद्रें आपल्यातर्फे उच्च शिक्षणसंस्थांत विद्यार्थी पाठवितात व त्यांना त्यांच्या गरजेप्रमाणें शिष्यवृत्ति देतात; आणि ही प्रथा सोविएत यूनियनमध्यें मोठ्या प्रमाणांत रूढ आहे ही गोष्ट येथें नमूद करणें अवश्य आहे.

महत्त्वाची गोष्ट अशी कीं बहुसंख्य पालकांना फी देणें शक्य आहे. ज्या वर्षी फी योजना अंमलांत आली त्या १९४० सालीं, सोविएत देशांतील सरासरी वार्षिक उत्पन्न ४०७० रूबल होतें. तसेंच त्या देशांत मिळवत्या स्त्रियांचें प्रमाण मोठें आहे. मूल पंधरा वर्षांचें होईपावेतों पालकांना फी द्यावी लागत नाहीं. तेथपर्यंत दोघांच्याही पगाराचें मान वाढलेलें असणार. तेव्हां उत्पन्नांतील विषमता ध्यानांत घेतली तरीहि ज्या कुटुंबांतील मूल पंधरा वर्षांचें असेल त्या कुटुंबांचें वार्षिक उत्पन्न त्यावेळीं सामान्यतः ६००० रूबलहून कमी नसावें, असा *मिसेस बी. किंग* या सोविएत यूनियनविषयीं माहितगार असलेल्या शिक्षणतज्ज्ञ इंग्रज लेखिकेचा अंदाज आहे. अशा कुटुंबाला वरील फी देणें मुळींच अशक्य नाहीं. फीयोजना जाहीर करतांना सोविएत सरकारनें सोविएत जनतेच्या वाढलेल्या उत्पन्नाचा उल्लेख करून असें म्हटलें आहे कीं, दिवसेंदिवस उच्च शिक्षणावर सरकारला अधिकाधिक पैसा खर्च करावा लागत आहे. जीं मुलें या उच्च शिक्षणाचा लाभ घेतात त्यांच्या आईबापांनीं या खर्चाचा भार अंशतः तरी उचलावा, आणि तसें करणें आज त्यांना शक्य आहे, म्हणून फीयोजना सुरू केली आहे.

फीयोजनेमुळें होणाऱ्या संभाव्य परिणामांचा विचार करतांना सोविएत समाजांत शारीरिक व बौद्धिक श्रमांच्या व्यवसायांचे परस्पर संबंध कसे आहेत याकडे लक्ष वेधणें आवश्यक आहे. सोविएत समाजांत या दोन प्रकारच्या व्यवसायांतील उच्च-नीचत्व लोपलें आहे. तेथें कारखान्यांत अगर शेतावर काम करणें, हें, शिक्षकाचें अगर कारकुनाचें काम करणें, याहून कमी प्रतीचें समजलें जात नाहीं. उलट श्रम

करणें ही गोष्ट मानाची समजली जाते. सोविएत समाजांत पांढरपेशे व्यवसाय अधिक सुखाचे, उत्पन्नाचे व शाश्वतीचे नाहींत. आणि म्हणून अधिक मानाचेहि नाहींत. प्रत्येक सोविएत नागरिकाला आपल्या योग्यतेनुरूप काम मिळेल याची खात्री असते व उत्पन्नाचें प्रमाण, व्यवसाय पांढरपेशा आहे कीं नाहीं यावर अवलंबून नसतें. सर्व प्रकारच्या शिक्षणक्रमांत सांस्कृतिक विकासाची भरपूर तरतूद असते; आपआपल्या व्यवसायांत पडल्यावर सर्वांना ( मग त्यांचे व्यवसाय पांढरपेशे असोत वा नसोत ) आपला फुरसतीचा वेळ उत्तम तऱ्हेनें घालविण्यासाठीं सर्व साधनें व सोयी सारख्याच प्रमाणांत उपलब्ध असतात. त्यामुळें पांढरपेशे व्यवसाय करणारे लोक सुसंस्कृत व म्हणून उच्च दर्जाचे, आणि श्रमाचे व्यवसाय करणारे लोक अडाणी व म्हणून हीनदर्जाचे, असा भेद तेथें राहिलेला नाहीं. अर्थात् केवळ खोट्या प्रतिष्ठेच्या कल्पनेनें आपल्या मुलाचा पांढरपेशा व्यवसायाकडे जाण्या कल नसतांना आणि यांत्रिक व्यवसाय करून चांगलें उत्पन्न मिळणें शक्य असतांना, त्यानें पांढरपेशा व्यवसायांत पडावें म्हणून त्यास मुद्दाम उच्च शिक्षणसंस्थांत घालण्यास सोविएत पालक प्रवृत्त होणार नाहीं.

असें असलें तरी फीयोजनेचा आणखी एक तात्कालिक उद्देशहि होता.

१९४० सालापूर्वी सात वर्षांचें सक्तीचें शिक्षण संपल्यावर पुष्कळशीं मुलें लागलीच धंदेशिक्षणाकडे न वळतां आणखी तीन वर्षांचें वरिष्ठ दुय्यम शिक्षण घेण्याचें ठरवीत. अशा रीतीनें आपला धंदा अगर व्यवसाय निश्चित करणें तीन वर्षें लांबणीवर टाकण्याची प्रवृत्ति बळावत होती. शांततेच्या काळांत यामुळें तोटा झाला नसता. ( उलट सक्तीचें शिक्षण सात वर्षांऐवजीं दहा वर्षांचें करण्यांत यावें, या सोविएत शिक्षणखात्याच्या धोरणाला ही प्रवृत्ति पोषकच होती. युद्धाचा धोका उत्पन्न झाल्यावर सक्तीच्या शिक्षणाचा काल वाढविण्याची योजना स्थगित करावी लागली. ) युद्धाचीं चिन्हें दिसूं लागल्यावर ही प्रवृत्ति पुढील कारणांस्तव चालूं देणें इष्ट नव्हतें.

युद्धोत्पादनाकरितां नवीन कारखाने व उद्योगधंदे थोड्या अवधींत उघडणें आवश्यक होतें; यासाठीं नवीन यंत्रकुशल कामगारवर्गाची मोठ्या प्रमाणांत जरूर भासूं लागली. परंतु बेकारी साफ नाहींशी झाली असल्यामुळें आणि शेतकऱ्यांच्या उत्पन्नाचें मान वाढतें असल्यामुळें सोविएत यूनियनमध्यें राखीव कामगारवर्ग अस्तित्वांतच नव्हता. या असमाधानकारक परिस्थितीला तोंड देण्यासाठीं फीयोजना व धंदेशिक्षणाची नवीन

योजना अंमलांत आल्या. पूर्वी उच्च शिक्षणाकडे जात्या कल नसूनही, केवळ पुढचा विचार न केल्यामुळें, जीं मुलें आपोआप आणखी तीन वर्षे धंदेशिक्षणाकडे वळण्याचें लांबवीत असत, त्यांना फीयोजनेमुळें आपल्या व्यवसायाची लौकर निवड करण्यास चालना मिळाली. आणि युद्धकालीन धंदेशिक्षणाच्या व्यापक योजनेमुळें (या शिक्षणासाठीं फी तर नव्हतीच, उलट राहाण्याजेवण्याचा वगैरे सर्व खर्च सरकार करणार होतें.) व्यवसायाची निवड करणेंही सोपें झालें. अशा रीतीनें उच्च शिक्षणाकडे ओढा नसलेल्या मुलांचा तीन वर्षांचा काल व शक्ति यांचा अपव्यय टळला; त्यांचा ओघ धंदेशिक्षणाकडे वळला आणि देशाच्या युद्धकालीन उत्पादनाच्या मार्गांत असलेला सर्वांत मोठा अडथळा दूर झाला.

युद्धामुळें दुसरा एक प्रश्न प्रामुख्यानें पुढें आला होता. उच्च शिक्षण घेऊन निर्माण होणारे इंजिनियर, डॉक्टर, यंत्रतज्ज्ञ, अधिकारीवर्ग इत्यादि लोकांची कार्यक्षमता अगदीं पहिल्या प्रतीची असणें अधिकाधिक जरूर भासूं लागलें. अशा वेळीं ज्यांचा उच्च शिक्षणाकडे कल नाहीं अथवा ज्यांच्या अंगीं तेवढी चिकाटी नाहीं अशा साधारण बुद्धीच्या विद्यार्थ्यांवर उच्च शिक्षणासाठीं इतका पैसा व श्रम खर्च करणें योग्य नव्हतें. उच्च शिक्षणाचा दर्जा वाढावा याकरितां अशा विद्यार्थ्यांना उच्च शिक्षणापासून परावृत्त करून जे विद्यार्थी लायक असतील व ज्यांना तेवढी चिकाटी असेल त्यांनींच उच्च शिक्षण घ्यावें असे प्रयत्न करणें आवश्यक होतें. फीयोजना ही या प्रयत्नांचा एक भाग होती हें तिची अंमलबजावणी करण्याच्या पद्धतीवरून दिसून येतें.

फीयोजनेचे परिणाम पाहाणें बोधप्रद होईल. १९४० सालीं शिक्षण घेणाऱ्या एकूण ३ कोटि ४० लक्ष मुलांपैकीं फीयोजना ज्यांना लागू पडते अशा शिक्षण-संस्थांत फक्त १९ लक्ष मुलें होतीं. या सर्वांनीं फी दिली असेलच असें नाहीं; कारण पुष्कळांना फीविषयक सवलतींचा फायदा मिळाला असला पाहिजे. फीचें प्रमाण त्या त्या विद्यार्थ्यांवर शिक्षणाप्रीत्यर्थ होणाऱ्या खर्चाच्या एकदशांशाहून कमी आहे. १९४० सालचे वरील आंकडे पाहिले तर फीचें एकंदर उत्पन्न या शिक्षणक्रमासाठीं होणाऱ्या खर्चाच्या अवघे ३·६ टक्के आहे. बाकीचा शेंकडा ९६·४ टक्के खर्च सरकारी तिजोरींतून होतो. तेव्हां फीयोजना सुरू करण्यांत, ज्यांना शक्य असेल त्यांनीं उच्च-शिक्षणाच्या खर्चाचा बोजा अंशतः तरी सोसावा, असा एक उद्देश असला तरी

कोणतीही सोविएत शिक्षणसंस्था फीच्या उत्पन्नावर यत्किंचितही अवलंबून नाहीं, ही गोष्ट स्पष्ट दिसते. फी देणाऱ्या विद्यार्थ्यांना प्रत्येक वार्षिक परीक्षेंत पास व्हावें लागतें, नेहमीं प्रगति समाधानकारक ठेवावी लागते, व प्रवेश परीक्षेंत पास झाल्याशिवाय विश्वविद्यालयांत प्रवेश मिळत नाहीं. शिक्षणसंस्था फीच्या उत्पन्नावर अवलंबून नसल्यामुळें तिला फी देणाऱ्या मुलांची कदर बाळगण्याचें कारण नाहीं आणि म्हणून परीक्षेचा दर्जा खालावणें शक्य नाहीं. यामुळें नालायक विद्यार्थी पुढें जाण्याचा संभव उरत नाहीं.

फीयोजना सुरू झाल्यावर पहिल्या सहामाहींत मॉस्को येथील संगीतविषयक उच्च शिक्षणसंस्थेंतील ( *State Conservatoire* ) ८५० विद्यार्थ्यांतून फक्त दोघांनीं आपलीं नांवें काढून घेतलीं. एकंदरीत शेंकडा पांचसहा टक्क्यांहून अधिक विद्यार्थ्यांनीं नांवें काढून घेतलीं नाहींत असें दिसून आलें. विद्यार्थ्यांच्या पूर्वीच्या संख्येवर फी योजनेचा फारच थोडा परिणाम झाला असा याचा अर्थ आहे, आणि वरील माहितीवरून ही मुलें उच्च शिक्षणाकडे कल नसल्यामुळें सोडून गेलीं असावीं असें म्हणण्यालाही जागा आहे.

असें असलें तरीही साधारण बुद्धिमत्तेचा श्रीमंत विद्यार्थी आणि साधारण दर्जाचा सामान्य विद्यार्थी यांमध्यें भेदभाव होण्याचा संभव तत्त्वतः तरी समूळ नष्ट होत नाहीं ही गोष्ट नमूद केली पाहिजे. परंतु फी घेण्याच्या धोरणापासून दुष्परिणाम होतात असें दिसून आल्यास त्यावर सर्वत्र कडक टीका झाल्यावांचून राहाणार नाहीं. सोविएत वर्तमानपत्रें, कामगार संघ, शिक्षकवर्ग, आणि सोविएत सभा अशा बाबतींत अतिशय जागरूक असतात. त्या त्या व्यवसायाकडे जात्या कल असलेलीं बुद्धिमान् मुलें तिकडे वळावीं आणि अशा रीतीनें समाजाचा अधिकांत अधिक विकास व्हावा असा सोविएत समाजपद्धतीचा कटाक्ष आहे. ही अपेक्षा पुरी होण्याच्या मार्गात फीयोजना आडवी येते असें ज्याक्षणीं दिसून येईल, त्याक्षणीं, ती सोडून देण्यास सोविएत सरकार कचरणार नाही, असें आजपर्यंत सोविएत शिक्षणपद्धतींत परिस्थितीप्रमाणें वेळोवेळीं करण्यांत आलेल्या फेरफारांवरून वाटतें. *

* नवीनच मिळालेली पुढील माहिती याला दुजोरा देते. उज्बकिस्तान, काझाकिस्तान, ताजिकिस्तान, अझरबैजान वगैरे राष्ट्रांत उच्च शिक्षणासाठीं फी घेण्यांत येत नाहीं. तसेंच युद्धामुळें उध्वस्त झालेल्या राष्ट्रांत, ( युक्रेन, बाल्टिक देश, श्वेतरशिया, मोल्डेविया, फिनिश कॅरेलिया ) फी योजना अंमलांत आलेली नाहीं. मध्य आशियांतील मुस्लिम राष्ट्रांत विद्यार्थिनींना फीविषयक विशेष सवलती मिळतात.

परिशिष्ट ३

# मुलांमुलींचें अलग शिक्षण

सन १९४३ च्या सप्टेंबर महिन्यांत सोविएत शिक्षणपद्धतींत एक अगदीं अनपेक्षित बदल घडून येण्यास सुरवात झाली; आणि त्यामुळें शिक्षणाकडे लक्ष पुरविणाऱ्या जगांतील सर्व लोकांना विस्मयाचा मोठाच धक्का बसला. या सालापर्यंत सोविएत देशांत सर्वत्र सहशिक्षणाची पद्धति अंमलांत होती; आणि इतर देशांप्रमाणें सहशिक्षणाला केवळ परवानगी नसून ती प्रत्यक्ष व्यवहारांत उतरली होती. सोविएत शिक्षणयोजनेचें एक मूलभूत तत्त्व या दृष्टीनें जगांतील शिक्षणशास्त्रज्ञ या गोष्टीकडे पाहात असत. परंतु या वर्षापासून सहशिक्षणाचें धोरण सोडून देण्यांत येऊन बारा वर्षांवरील मुलांमुलींना वेगळया शाळांत शिक्षण देण्याचा उपक्रम सुरू झाला. हा बदल इतका मूलभूत महत्त्वाचा आहे; म्हणून त्याचा विचार कांहींसा साकल्यानें करण्याचें योजिलें आहे.

वयाच्या दहाव्या वर्षापासून अठराव्या वर्षापर्यंत मुलगे व मुली यांची शारीरिक, बौद्धिक व मानसिक वाढ निरनिराळ्या गतीनें होते. म्हणून त्यांचें शिक्षण वेगळया

शाळांतून होणें, शिक्षणशास्त्राच्या दृष्टीनें-मुलांच्या सर्वांगीण विकासाच्या दृष्टीनें-इष्ट आहे, असें अनेक नामवंत शिक्षणशास्त्रज्ञांचें म्हणणें आहे. अठरा वर्षें पुरीं झाल्यावर मुलगे व मुली यांची वाढ बहुतेक पुरी होते; यामुळें यानंतर त्यांच्या ज्ञानग्रहणाच्या शक्तींत फारशी तफावत पडत नाहीं. अर्थात १८ वर्षानंतर सहशिक्षण अनिष्ट नाहीं, असें म्हणावयास हरकत नाहीं. तसेंच स्त्री-पुरुषांचा समान दर्जा व समान हक्क मान्य केले तरी त्यांच्या जीवनांत नैसर्गिक भिन्नतेमुळें फरक पडतो, यांत शंका नाहीं. शिक्षणाचें मुख्य उद्दिष्ट भावी जीवनाची सर्वांगीण तयारी हें असल्यामुळें वरील नैसर्गिक भिन्नतेस अनुरूप असा फरक शिक्षणांत असणें आवश्यक आहे असेंही कित्येक शिक्षणशास्त्रज्ञांचें मत आहे.

हें सर्व मान्य करूनही असें निश्चितपणें म्हणतां येईल कीं सोविएत शिक्षणाच्या पहिल्या अवस्थेंत सहशिक्षणामुळें प्रचंड फायदाच झाला. एक तर मुलें व मुली एकत्र शिकूं लागल्यामुळें स्त्रीपुरुषांचा समान दर्जा व समान हक्क प्रस्थापित करून ते दृढमूल करतां आले. असें करण्यासाठीं सहशिक्षणच आवश्यक होतें. दुसरा फायदा असा झाला कीं, स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीनें व्यावसायिक व औद्योगिक शिक्षण घेतां येऊन समानतेची कल्पना प्रत्यक्षांत उतरवितां आली. तिसरी गोष्ट अशी कीं, यावेळीं निरक्षरता व अज्ञान यांचें शक्य तितक्या कमी वेळांत उच्चाटन करणें हें मुख्य कार्य होतें. इमारती, उपकरणें व शिक्षक यांचा त्यावेळीं इतका तुटवडा होता कीं त्यावेळीं निरनिराळ्या शाळा उघडण्यासाठीं थांबल्यानें स्त्रियांच्या शिक्षणप्रगतीला विनाकारण विलंब लागला असता. एखाद्या गांवीं मुलींची वेगळी शाळा स्थापन होईपावेतों मुलींचें शिक्षण थांबविणें हास्यास्पद ठरलें असतें. सहशिक्षणापासून आणखी एक मोठा फायदा झाला. झारशाहींतील मुलींच्या शाळांत शिक्षणाचें स्वरूप अत्यंत प्रतिगामी व निकृष्ट प्रतीचें होतें. आपल्याकडेही थोड्याफार प्रमाणांत हीच गोष्ट आढळते. ही अनिष्ट प्रथा नाहींशी करण्याचा सर्वांत सोपा उपाय म्हणजे मुलांमुलींच्या एकत्र शाळा असणें हा होता. यावरून असें स्पष्ट दिसून येईल कीं, क्रांतीनंतरच्या काळांत सहशिक्षणामुळेंच सोविएत देशाची झपाट्यानें प्रगति होऊं शकली.

दुसरी पंचवार्षिक योजना पुरी झाल्यावर सर्व सोविएत देशांत सर्व ठिकाणीं सात वर्षांचें सक्तीचें शिक्षण संपूर्णपणें अंमलांत आलें व कित्येक ठिकाणीं दहा वर्षांच्या शिक्षणाला सुरवात होऊं लागली. सन १९३७ नंतरच्या कांहीं वर्षांत सहशिक्षणापासून

होणारे तोटे हळु हळु सोविएत शिक्षणतज्ज्ञांच्या अवलोकनास येऊं लागले. एकाच वयाचीं मुलें व मुली हीं मानसिक व शारीरिक वाढीच्या दृष्टीनें निरनिराळ्या अवस्थांमध्यें असतात. यामुळें मिश्र वर्गांमध्यें वैधर्म्य उत्पन्न होतें व अध्यापन व्हावें तितकें कार्यक्षम होऊं शकत नाहीं असें दिसून आलें. अशा वर्गांत शिस्तही असावी तशी राहात नाहीं असा अनुभव आला. विशेषतः युद्धकालांत ( १९४० नंतर ) या गोष्टी अधिक तीव्रतेनें जाणवूं लागल्या. या काळांत मुलांना लष्करी शिक्षण हा विषय आवश्यक म्हणून शिकविणें भाग होतें. तो शिकवितांना मिश्र वर्गामुळें अनेक अडचणी येतात आणि त्यामुळें लहानसा भाग शिकविण्यालाही विनाकारण खूप वेळ लागतो आणि एकंदर शिक्षणाचा दर्जा खालावतो असें दृष्टोत्पत्तीस आलें. तीच गोष्ट युद्धविषयक तांत्रिक विषयांसंबंधीं. हे दोन्ही विषय उत्तम रीतीनें कमीतकमी वेळांत आत्मसात् करून प्रावीण्य मिळविणें त्याकाळीं अतिशय निकडीचें होतें. मध्यंतरीच्या काळांत सहशिक्षणापासून होणारा आणखी एक तोटा अनुभवाला आला होता. शाळेंतून हस्तव्यवसाय काढून टाकल्यानंतर फारच थोडया मुली अभ्यासक्रमाबाहेरील मंडळांत सामील होऊन आपण होऊन, शिवणकाम, घरकाम, बालसंगोपन इत्यादि विषयांचें ज्ञान मिळविण्याचा प्रयत्न करीत. मिश्र वर्गांत लैंगिक ज्ञान देणेंहि कठीण होत असे. सहशिक्षणापासून उत्पन्न होणाऱ्या या सर्व अडचणी व गैरसोयी या काळांत विशेष तीव्रतेनें अनुभवाला आल्या व म्हणून मॉस्को येथील कांहीं शाळांत प्रथम सहशिक्षण बंद करण्यांत येऊन मुलांमुलींसाठीं वेगवेगळ्या शाळा उघडण्यांत आल्या. हा प्रयोग अतिशय यशस्वी झाला. मुलें व मुली दोघांचीही शिक्षणप्रगति अधिक समाधानकारक झाली व शिस्तीचें प्रमाणही खूप वाढल्याचें अनुभवास आलें. या नवीन प्रयोगावर मोठी कडाक्याची चर्चा झाली आणि वर्तमानपत्रें व स्त्रियांचे प्रतिनिधी यांनीं त्यांत महत्त्वाचा भाग घेतला. शेवटीं १ सप्टेंबर १९४३ पासून सहशिक्षणाची पद्धति बंद करून बारा ते अठरा वर्षांपर्यंतचें शिक्षण देण्यासाठीं वेगवेगळ्या शाळा उघडाव्या असा निर्णय घेण्यांत आला. प्रथम ७२ मोठ्या शहरांत ही योजना अंमलांत येणार होती व हळुहळु सर्व देशभर तिचा प्रसार होणार आहे.

याप्रमाणें जरी सहा वर्षांचे शाळेंतील शिक्षण अलग देण्यांत येत असलें तरी उच्च शिक्षणसंस्थांमध्यें सहशिक्षणाची प्रथाच चालू राहाणार आहे. तसेंच या सहा वर्षांच्या शिक्षणक्रमांत बौद्धिक विषय सारखेच असून त्यांचा अभ्यासक्रमही एकच

आहे. फरक एवढाच कीं शरीरशास्त्राचें शिक्षण वेगळें असेल. तसेंच मुलांना अधिक मेहनतीचें शारीरिक शिक्षण व लष्करी शिक्षण दिलें जातें आणि मुलींना बालसंगोपन, शुश्रूषा, प्रथमोपचार (फर्स्ट अेड) इत्यादि विषयांचें शिक्षण दिलें जातें. कांहीं विषयांची निरनिराळ्या इयत्तांमध्यें होणारी विभागणी मुलांच्या व मुलींच्या वाढीला अनुरूप अशी केलेली आहे. परंतु परीक्षेचा दर्जा एकच असावा यासंबंधीं दक्षता घेतली जाते. साधारणपणें मुलींच्या शाळांतील शिक्षण कमी प्रतीचें असतें असा आपल्याकडील अनुभव आहे. कधीं कधीं कमी प्रतीची निराळी अंतिम परीक्षा ठेवून (व्ह. फा.) याचें समर्थनही केलें जातें! असा प्रकार घडूं नये यासाटीं वरील काळजी घेण्यांत येत आहे. शिवाय अनेक मुली पुढें विश्वविद्यालयीन शिक्षणासाठीं जाणाऱ्या असतात व त्यासाठीं त्यांना व मुलांना एकच प्रवेशपरीक्षा असते. यामुळें मुलींच्या शाळांतील शिक्षण खालावेल ही भीति नष्ट झाली आहे.

मुलें व मुली एकत्र आल्यामुळें त्यांचे परस्पर संबंध अधिक निरोगी व खेळीमेळीचे होतात. उलट त्यांना अलग ठेवल्यास त्यांचा स्वभाव कांहीं अंशीं खुरटतो व त्यांच्या सर्वांगीण विकासाच्या दृष्टीनें हें हानिकारक ठरतें असा अनुभव आहे. वरील प्रमाणें मुलांमुलींच्या शाळा अलग केल्यामुळें अशा प्रकारचा अनिष्ट परिणाम घडूं नये, या हेतूनें शाळेबाहेरील सर्व बाबतींत, छंदमंडळें, क्लब, लालकोने, सहली, बालवीरसंस्था यांमध्यें, मुलांमुलींना एकत्र येण्यास सर्वतोपरी उत्तेजन देण्यांत यावें आणि शिक्षकवर्गानें अशी खबरदारी घ्यावी असा सोविएत शिक्षणाधिकाऱ्यांचा कटाक्ष आहे. शाळेंत शिक्षकवर्ग मिश्र असतो व मुलांमुलींमध्यें परस्परांविषयीं आदर व निरोगी दृष्टिकोन निर्माण करणें हें त्यांचें कर्तव्य समजण्यांत येतें.

या अलग शाळांच्या पद्धतीमुळें मुख्य प्रश्न असा उपस्थित होतो कीं, स्त्रीपुरुषांच्या समान हक्काला या प्रथेनें बाध येणार नाहीं का ? हा प्रश्न अत्यंत महत्त्वाचा आहे, यांत शंका नाहीं. त्यांचा विचार करतांना पुढील गोष्टी ध्यानांत घेणें अवश्य आहे. सोविएत समाजांत स्त्रियांचा पुरुषांच्या बरोबरीचा हक्क व दर्जा कायद्यानें मान्य केला आहे, इतकेंच नव्हे, तर अपवादभूत अतिकष्टाचे व्यवसाय सोडल्यास स्त्रियांना सर्व व्यवसाय खुले आहेत; आणि समान शिक्षण व समान वेतन मिळत असल्यानें या समान हक्काची प्रत्यक्ष अंमलबजावणी करणें शक्य झालें आहे. तसेंच प्रसूतीपूर्वी व प्रसूतीनंतर भरपगारी रजा, बालसंस्थांची सोय, सामुदायिक

